# विदर्भ संशोधनाचा इतिहास




लेखक

नारायण नागोराव हूड

बी. ए., एल्‌एल्‌. बी.

यवतमाळ


प्रस्तावना लेखक

प्राचार्य वा. वि. मिराशी

[ ७ जुलै १९५३ ]

मूल्य पांच रुपये

पान ३६ पासून पुढे १११ पानापर्यंत प्रत्येक, पानाच्या वरच्या डाव्या कोपऱ्यांत '**विदर्भ संशोधनाचा इतिहास**' असा मजकूर पाहिजे. याबद्दल खुलासा ग्रंथाच्या भूमिकेंत पाहावा.

**एकूण पृष्ठें ३०८**

# अनुक्रमणिका







# आधारभूत ग्रंथ

## मराठी

[ येथे ठळक ग्रंथांची यादी दिलेली आहे. कांही संदर्भ ग्रंथाचा उल्लेख त्या त्या पृष्ठावर, ग्रंथांतच टीपांत केलेला आहे. ]


१. शिशुपाल वध······सी. म. अभ्यंकर
२. मराठी भाषेचा विकास······डॉ. ब्लॉक. अनुवादक ( डॉ. परांजपे )
३. हालाची गाथासप्तशति
४. भारतवर्ष गॅझेटिअर······श्री. शा. वळसंगकर
५. व्यावहारिक ज्ञानकोश······भाग ४ था.
६. राजवाडे संकीर्ण निबंध ( भाग १ )
७. राजवाडे चरित्र······श्री. साने.
८. वत्सगुल्ममहात्म्य······डॉ. देशपांडे
९. वऱ्हाडचा इतिहास······या. मा. काळे
१०. महाराष्ट्रीय ज्ञानकोश. ( भाग ५ )
११. मध्यप्रांत सं. मं. रिपोर्ट
१२. शारदाश्रम रिपोर्टस्
१३. शारदाश्रम वार्षिक
१४. योगवासिष्ठ
१५. महाराष्ट्र शब्दकोश भाग ४ व ६
१६. भांडारकर ओरि. इन्स्टि. रिपोर्ट
१७. सत्कार्योत्तेजक सभा धुळे, अहवाल
१८. पतंजली महाभाष्य
१९. निर्गम—प्रकटीकरण
२०. श्रीरामकृष्ण चरित्र
२१. खंजनदर्शन······वराहमिहिर
२२. कर्पूरमंजिरी सट्टक······राजशेखर
२३. महाराष्ट्र सांवत्सरिक······सा. मं. पुणे
२४. आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष······ महादेवशास्त्री दिवेकर
२५. निवडक निबंध······ म. सं. मंडळ.

या शिवाय प्रकरण ७ वें लिहिण्याकरता बापुसाहेब भवाळकर, म. म. मिराशी, डॉ. देशपांडे, सुरेश डोळके यांच्या एकेक दोन दोन लेखांतील, व लोचन प्रसाद पांड्येय, शं. गो. चट्टे, दे. गो. लांडगे, भा. रं कुळकर्णी यांच्या पत्रांतील थोड्या फार माहितीचा उपयोग झालेला आहे.

तसेच संशोधक, विद्यासेवक, सह्याद्रि, युगवाणी, नवभारत (सारसंकलन) वागीश्वरी इत्यादिमधील किरकोळ माहिती घेतली आहे.

## ENGLISH


1. Hindu temples............ Stella Kramrich
2. Hindu medieval temple............ Raymond Burnier
3. The coins of India............ C. J. Brown
4. Indian temple legends............ K. T. Paul
5. Nagpur Souvenir- I. H. R. C. & H. C. Nag. Session Dec 1950
6. Nagpur Uni. journal Dec. 48-49
7. Cultural heritage of Madhyabharat......Dr. D. R. Patil
8. Elements of Hindu Iconography...T. A. Gopinathrao
9. Philological study............. Dr. D. H. Irach
10. Prominent antiquities of Orissa
11. Annual bulletin of Nag. U. H. Society Octo. 1950
12. Proceedings of Indian H. C., Delhi 1948, 11th Session
13. Descriptive catalogue of exhibits, 27th H. R. C. Nag. 1950
14. Proceedings of I. H. C., 14th Session, Jaypur
15. Exhibits of Indian art, Department of Arch., New Delhi
16. Pees into Indian culture............ Perviz Dubash
17. The Hindu philosophy............ Dhirendranath Paul
18. Indian Images............ Bhattacharya.
19. Hindu culture............Shastri K. S. R.
20. Kant's theory of Knowledge.
21. Indian Coins............ Rapson.
22. Modern Utopia............ H. G. Wells.
23. Proceedings of Indian. H. C., Calcutta Session 1939.

शास्त्रें, कला, साहित्य यांनी युक्त असलेली संस्कृति हा राष्ट्र-मोराच्या शरीरावरील सुंदर पिसारा होय. तो झडून गेला तर मोराचें मोरपणच टिकणें अशक्य आहे; म्हणून संशोधनाच्या पाणकळेने त्याला नेहमी प्रफुल्ल राखणें आवश्यक असते.

[ पृष्ठ १२७

"हा ग्रंथ सर्वांगपरिपूर्ण
व अपूर्व आहे,
यांत संशय नाही."

## डॉ. केशव लक्ष्मण उर्फ भाऊजी दप्तरी, डी. लिट्.

यांचा अभिप्राय

---

डॉ. य. खु. देशपांडे यांनी 'विदर्भ संशोधनाचा इतिहास' हा श्री. नारायणराव हूड यांचा ग्रंथ माझ्याकडे ता. २२-१०-५३ च्या पूर्वरात्रीं पाठविला; आणि ता. २८-१०-५३ रोजीं व्हावयाच्या ग्रंथ प्रकाशन समारंभाच्या पूर्वी, ग्रंथावरील माझा अभिप्राय पाठवावा, अशी आज्ञा त्यांनी मला केली.

मला दिलेल्या थोड्या वेळांत संपूर्ण ग्रंथ वाचणें अशक्य दिसले म्हणून प्रथमतः माझ्याविषयींच काय लिहिलें तेंच वाचून, माझ्या मतांचे प्रतिबिंब या आरशांत कसें पडलें, तें पाहिलें. आणि तें प्रतिबिंब, माझा उपनिषदांवरील मोठा ग्रंथ प्रसिद्ध झाला नसतांहि मुख्यतः अगदी बरोबर आहे, हें पाहून, मी अगदी आश्चर्यचकित झालों ! व मला पूर्ण समाधान वाटलें.

त्या प्रतिबिंबांत दोन मुद्रणदोष आहेत. पान २३७ ओळ १९ येथे "अपौरुषेय" या ठिकाणा "पौरुषेय" पाहिजे; आणि पान २४० ओळ १८ येथे "सूत्रें" या ऐवजी "सूत्रावरील श्री शंकराचार्यांचें भाष्य" असें पाहिजे. पान २४२ ओळ ४ येथे "एकोपनिषद्भाष्य" या ऐवजी "एकादशोपनिषद्भाष्य" पाहिजे.

पान २२९ वरील "भाऊजी ईश्वर मानीत नाहीत" हें म्हणणें अगदी बरोबर नाही. जीवसदृश ईश्वर मी मानीत नाहीं, हें खरें आहे. पण जगाचें सर्वनियामक आदिकारण, ज्याला ब्रह्म किंवा ईश्वर म्हणतात, तें मी मानतोंच. पण त्याला जीवासारखी मन बुद्धि नाहीत, हेंहि मानतोच. एकंदरीत हे क्षम्य दोष सोडल्यास, माझ्या मताचें प्रतिबिंब अगदी बिनचूक आहे. त्याबद्दल, आणि माझ्या मतांचा पुरस्कार केल्याबद्दल मी श्री. हूड यांचा फार आभारी आहे.

ग्रंथाचा इतरहि भाग, विशेषतः ध्येयनिष्ठ डॉ. देशपांडे यांच्यावरील लिखाण आणि कै० म. म. घुले यांच्यावरलि लिखाण वाचलें.

एकूण हा ग्रंथ सर्वांगपरिपूर्ण व अपूर्व आहे, यांत संशय नाहीं.

महाल, नागपूर
२४-१० '५३

—डॉ. के. ल. दप्तरी, डी. लिट्.

## डॉ. शं. दा. पेंडसे, एम. ए., पी एच्. डी., एम्. ओ एल्.

### यांचा अभिप्राय

विदर्भांतील सुप्रसिद्ध कवि श्री. नारायणराव हूड यांनी लिहिलेला 'विदर्भ संशोधनाचा इतिहास,' त्यांतील परिश्रमपूर्वक दिलेल्या माहितीमुळे व सुंदर भाषाशैलीमुळे अत्यंत वाचनीय झाला आहे. संशोधन-क्षेत्रांत येणारे संस्कृति, इतिहास, साहित्य, कला, पुरातत्व, नाणकशास्त्र, संशोधनसंस्था इत्यादि संबंधीचें मूलगामी विवेचन श्री. हूड यांनी या ग्रंथांत केलेलें आहे. विदर्भांतील काव्येतिहास संशोधनास प्रारंभ कोणी व कसा केला व आतापर्यंत त्याची प्रगति कोठपर्यंत आलेली आहे, याची संपूर्ण कल्पना हा इतिहास वाचल्याने वाचकाला येते.

यवतमाळच्या शारदाश्रम या संस्थेने जे कांही विद्वान आणि व्यासंगी कार्यकर्ते महाराष्ट्राला दिले, त्यांमध्ये श्री. नारायणराव हूड यांची गणना होते. म्हणून या आश्रमाचे आता वयोवृद्ध झालेले संस्थापक डॉ. य. खु. देशपांडे यांचें चरित्र व संशोधन याची माहिती या ग्रंथाच्या आरंभी देणें अगदी उचित व क्रमप्राप्त होतें. डॉ. देशपांडे यांनी आपलें संपूर्ण आयुष्य विद्याव्यासंगाला व संशोधनाला वाहिल्यामुळे, ते आतापर्यंत किती महत्वाचें व मोठें कार्य करूं शकले, हें लक्षांत येते. व मराठी भाषेच्या इतिहासावरील त्यांचा इंग्रजी ग्रंथ लवकर प्रसिद्ध व्हावा, अशी

उत्सुकता वाटते. 'डॉ. देशपांडे यांचें व्यक्तिमत्व' हें सुरेख प्रकरण वाचून, या स्थितप्रज्ञ विद्वानाविषयीचा आदर द्विगुणित होतो.

"संशोधनाचें समर्थन" हें विस्तृत प्रकरण श्री. नारायणराव हूड यांच्या सखोल अभ्यासाचा आणि विचारांचा परिचय करून देणारे आहे. "संशोधन क्षेत्रांतील मानकरी" या शेवटच्या प्रकरणांत विदर्भांतील प्राचीन व अर्वाचीन कवी, ग्रंथकार व संशोधकांच्या कार्याचें त्यांनी विस्तृत व मार्मिक समालोचन केलेलें आहे. या प्रकरणांत 'संशोधनाचे त्रिराम' असे यथार्थ नामाभिधान करून, म. म. घुलेशास्त्री, डॉ. दप्तरी आणि म. म. मिराशी या तीन दिगंतकीर्ति विद्वानांच्या संशोधनाचा सविस्तर परिचय करून दिलेला आहे. कोणत्याहि राष्ट्राला भूषणभूत होईल, अशी या त्र्यींची विद्वत्ता व ग्रंथलेखन आहे. त्यांच्या संशोधनाचें समालोचन करण्याकरिता स्वतः श्री. हूड यांना किती वाचन करावें लागलें असेल, याची कल्पना येते. या विषयांत श्री. हूड यांचें वाचन अद्ययावत् असल्यामुळे त्यांचा ग्रंथ विदर्भात आजपर्यंत झालेल्या संशोधनाचा संदर्भग्रंथ झाला आहे. आणि संशोधनाचा इतिहास लिहिण्याचा, मराठींतील हा बहुधा पहिलाच प्रयत्न यशस्वीहि झालेला आहे. श्री. हूड हे आतापर्यंत कवि म्हणूनच मान्यता पावले होते. यानंतर एक साक्षेपी इतिहासकार म्हणूनहि ते नांवाजले जातील.

**डॉ. शं. दा. पेंडसे**, एम्. ओ. एल्.

डॉ. य. खु. देशपांडे एम्. ए. एल्. एल्. बी., डी. लिट्

यांचा अभिप्राय

---

महाराष्ट्राचे सुविख्यात कवि श्री. नारायणराव उर्फ बापूसाहेब हूड यांनी "विदर्भ संशोधनाचा इतिहास" हा ग्रंथ परिश्रमपूर्वक व अभ्यासपूर्वक लिहिलेला आहे. या ग्रंथांत त्यांनी प्रथमारंभीं माझा जीवनक्रम व माझ्या कुवतीप्रमाणे मी केलेल्या इतिहास वाङ्मयाच्या कामगिरी संबंधाचें निदर्शन केलेलें आहे. ग्रंथनिविष्ट होण्याइतकी माझी भरीव कामगिरी नाही, याची मला जाणीव आहे. तथापि माझें कार्य वाचून आगामी पिढीतील तरुण आणि उत्साही पुरुष जर स्फूर्ति घेऊन, वाङ्मयेतिहासाच्या संशोधनाकडे लक्ष देतील, तर तें अवश्य आहे.

या ग्रंथाचा मुख्य हेतू म्हणजे विदर्भांतील संशोधनाचा साग्रोपांग इतिहास देणें, हा होय; व हें कार्य श्री० बापूसाहेब हूड यांनी किती आस्थेने व आपुलकीने केलें आहे, हें हा ग्रंथ वाचणाऱ्यांच्या निदर्शनास येईल. या ग्रंथांत सुरवातीपासून शेवटपर्यंत संस्कृति, इतिहास, कला, पुरातत्व, भाषाशास्त्र, नाणकशास्त्र, महत्वाचे कालनिर्णय, विदर्भांतील संशोधकांचें कार्य व संशोधन संस्था या संबंधीचें विस्तृत, चिकित्सक, व मौलिक समालोचन व मार्गदर्शन आल्यामुळे, त्या संबधी चार शब्द लिहिणें, हें मी आपलें कर्तव्य समजतों.

संशोधनाशी निगडीत अशा, वरील सर्व विषयांचा परामर्ष या ग्रंथांत आल्यामुळे, विदर्भांतील सुरवातीपासून आजतागायतच्या संशोधनाची संपूर्ण कल्पना या ग्रंथामुळे येऊ शकते. वरील सर्व विषयांसंबंधी विपुल माहितीने भरलेला व त्यांचे मूलगामी विवेचन केलेला मराठी भाषेंतील हाच पहिला ग्रंथ होय.

या ग्रंथाची भाषाही सरवातीपासून शेवटपर्यंत आकर्षक व प्रसन्न अशी असल्यामुळे, हा ग्रंथ विद्वानांच्या आदरास पात्र होईल यांत मला शंका वाटत नाही.

शेवटी, विदर्भांतील या संशोधनक्षेत्रामधील अनेक विद्वान आणि उत्साही तरूण या ग्रंथाच्या वाचनाने स्फूर्ति घेतील अशी मी आशा करतो.

नागपूर
१-१०-५३

डॉ. य. खु. देशपांडे. डी. लिट्.

मध्यप्रदेशातील संशोधक

## श्री. शं. गो. तट्टे, एम्. ए. शास्त्री एम्. ए. काव्यतीर्थ

यांचा अभिप्राय

---

महाराष्ट्राचे प्रथम श्रेणींतील कवि व माझे मित्र श्री० नारायणराव उर्फ बापूसाहेब हूड यांनी "विदर्भ संशोधनाचा इतिहास" हा सव्वातीनशे पृष्ठांचा ग्रंथ प्रकाशनापूर्वीच माझेकडे अवलोकनार्थ पाठविला याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

संशोधनाचें संशोधन करून तें ग्रंथानिविष्ट करण्याचा, मराठी भाषेंतील हाच पहिला प्रयत्न आहे असे मला वाटतें.

विदर्भांत श्रेष्ठ दर्जाचे संशोधक काही थोडे थोडके झाले नाहीत. थापि त्यांच्या कार्यांचें संकलन समालोचन आजपर्यंत कोणीच केलें नव्हतें. त्याचप्रमाणे विदर्भाच्या संशोधनसंस्थांची एकत्रित व वैशिष्ठ्यपूर्ण माहितीही कोणीच दिली नव्हती. श्री० हूड यांनी मात्र विदर्भांतील संशोधकांच्या कार्यांचें व संशोधन-संस्थांचें विस्तृत पर्यालोचन प्रस्तुत ग्रंथांत केलेलें आहे.

सर्वभक्षक काळाच्या दाढेंतन जुने कागदपत्र, ऐतिहासिक अवशेष, व इतिहासरचनेची इतर साधन-सामग्री वाचाविणें हें जितकें महत्वाचें कार्य आहे, तितकेंच मानवी संशोधनबुद्धीने काळाशी दिलेला लढा कितपत यशस्वी झाला, हें दाखविण्याकारितां,

वर्षानुवर्षे झालेल्या संशोधनाचा इतिहास ग्रंथरूपाने अस्तित्वांत आणून, त्या क्षेत्रांत असलेल्या व्यक्तीस व विद्वानांस पुढील प्रगतिकरितां प्रेरणा देण्याचे कार्यही महत्वाचे आहे. म्हणून संशोधनाचा इतिहास लिहिण्याचे हे अत्यंत महत्वाचे कार्य श्री० हूड यांनी केलेले असल्यामुळे, ते अभिनंदनास पात्र आहेत. पूर्व संशोधकांच्या संशोधनाचा मागोवा घेत ज्यांना संशोधन करावयाचें असेल, त्यांना तर हा सर्वांगसुंदर ग्रंथ खाचित मार्गदर्शन करील.

या ग्रंथाच्या आरंभीं श्री० हूड यांनी सुप्रसिद्ध संशोधक डॉ० आप्पासाहेब देशपांडे यांची जीवनविषयक व कार्यविषयक माहिती दिलेली आहे. आप्पासाहेब देशपांडे हे विदर्भांतील एक ज्येष्ठ व श्रेष्ठ संशोधक असल्यामुळे, त्यांच्या जीवनाची व कार्याची माहिती ग्रंथाच्या सुरवातीला येणे सहाजिकच होते. त्यांच्या जीवनाच्या सूक्ष्म छटा श्री० हूड यांनी अत्यंत कौशल्याने चित्रित केल्या आहेत.

संशोधनाचा इतिहास लिहतांना, विदर्भस्थ संशोधकांचे कार्य व संशोधनसंस्था यांबरोबरच संस्कृति, वाङ्मय, इतिहास, ताम्रपट, शिलालेख, भाषा, नाणी, कागदपत्रें, लोकगीते इत्यादी संशोधनाशी सुसंबद्ध असणाऱ्या विविध विषयांची इतकी विपुल माहिती व चिकित्सक समालोचन या ग्रंथात आले आहे कीं, या ग्रंथाचा संशोधनाचा संदर्भग्रंथ म्हणून खात्रीने उपयोग होईल.

" संशोधन क्षेत्रांतील मानकरी " या प्रकरणांत दिलेली कै. हरि माधव पंडित, के. व्ही. लक्ष्मणराव, नारायणराव अळेकर इत्यादि जुन्या पिढींतील अनेक संशोधकांची माहिती आज पुष्कळांना नसल्यामुळे, ती त्यांना खात्रीने नावीन्यपूर्ण व मनोरंजक वाटेल. संशोधकांच्या नावांची जंत्री देतां, प्रत्येकाच्या संशोधनाचा विषय व त्यांचे वैशिष्ट्य दिल्यामुळे, आतापर्यंत विदर्भांत कोणते संशोधक व संशोधन झालें याची स्पष्ट रूपरेषा या ग्रंथावरून कळते. म. म. मुळे, डॉ. दप्तरी व म. म. मिराशी यांच्या संशोधनाचे तर लेखकाने मूळांत जाऊन, विशेषच उत्कृष्टपणे मूल्यमापन केलेलें आहे.

ग्रंथाची भाषा अत्यंत रसाळ, प्रौढ व रम्य अशी आहे. विशेषत: ठिकाठिकाणीं आढळणारें वैदिक दृष्टांत, उल्लेख, उपमा आणि प्रसंगोपात काव्यमय लेखनशैली, यामुळे सामान्य वाचकांपेक्षा हा ग्रंथ सुसंस्कृत वाचकांना जास्त आनंददायी होईल.

श्री. हूड यांची संशोधन विषयक तळमळ बऱ्याच ठिकाणीं दिसून येते. पूर्वसूरींनी निर्माण केलेलें पैतृक ज्ञानधन प्रत्यही जनता व क्वचित प्रसंगीं सरकार यांच्या औदासीन्यामुळे नष्ट होत असलेलें पाहून त्यांना उद्वेग वाटतो. व ते त्या उद्वेगाच्या भरांत सरकार व समाज यांना क्वचित प्रसंगीं दोष देतात. लेखकाचें हें लिहणें

कुणास अप्रिय भासलें तरी तें पथ्यकारकच आहे. समाज व सरकार यांचें संशोधन विषयक औदासीन्य दूर होऊन, त्याबद्दलची आस्था व उत्साह वृद्धिंगत होण्यास या ग्रंथाचा फार मोठा उपयोग होणार आहे, यांत शंका नाही.

प्रो. शं. गो. चाटे, एम्. ए.

रियासतकार डॉ. गो. स. सरदेसाई

यांचा अभिप्राय

---

श्री ना. ना. हूड यांनी 'विदर्भ संशोधनाचा इतिहास' हा ग्रंथ लिहिण्यांत भारी श्रम केलेले उघड उघड दिसतात. शेवटचें शंभर पृष्ठांचें प्रकरण, विदर्भांत कोणी काय संशोधन चालविलें आहे, त्यांचें वर्णन करणारा भाग सर्वोपरी उपयुक्त आहे.

श्री. यशवंतराव उर्फ आप्पासाहेब देशपांडे यांस मी १९३० सालापासून ओळखतों. 'मराठीची उत्पत्ति घटना व विकास' या त्यांच्या कृतीची वाचक वाट पहात आहेत. 'शारदाश्रम वार्षिक' ही त्यांची पहिली कृति मी आस्थेनें जवळ बाळगिली असून, तिचा परिपोष उत्तरोत्तर वृद्धिंगत कसा होतो, याची मार्ग-प्रतीक्षा मी मोठ्या उत्कंठेने आज वीस वर्षें करीत आहे. परंतु एकाएकी एकच्या पुढे पाऊल पडत नाही, याचा मला मोठा उद्वेग वाटतो. यांत आप्पासाहेबांचा सर्व दोष आहे, असें बिलकूल नाही. परिस्थिति पुष्कळ अंशी कारण असली तरी आवाक्याबाहेर कामाची आखणी केली की, पुढे पस्तावा होतो. एवढें भारत इतिहास संशोधन मंडळ, पुण्यासारख्या ठिकाणीं राजवाड्यां-सारख्या वीर पुरुषाने सन १९११ साली निर्माण केलें, त्याची

सुद्धा आज भीषण कुचंबणा चाललेली आपण पहातो, तर शारदाश्रमचें पाऊल पुढे कां पडत नाही, याचें आश्चर्य वाटावयास नको.

श्री ना. ना. हूड यांची निरीक्षणशक्ति, श्रम करण्याची हौस, व साहित्याची आवड पदोपदी अपरंपार नजरेस येते. श्री. हूड यांची लेखणी चपल आहे; त्यांची बुद्धि तीव्र आहे; तिचा उपयोग प्रत्यक्ष संशोधनाकडेच ते करतील तर त्यांचे हातून सुन्दर कृति निपजतील. त्यांच्या अंगीं मोठी कर्तृत्वशक्ति सुद्धा आहे. उद्योगाने व सतत वापराने तिला धार चढेल आणि मग म. म. मिराशी किंवा शास्त्री घुले यांजप्रमाणे संशोधन कार्यांत त्यांनाहि महत्वाची कामगिरी करतां येईल, असा माझा पूर्ण कयास आहे.

डॉ. गो. स. सरदेसाई

# ग्रंथाची भूमिका

१ डॉ. य. खु. देशपांडे यांच्या चरित्राच्या निमित्ताने (त्यांचा षष्ठ्यब्दि समारंभाच्याकरता) विदर्भ संशोधनाचा विस्तृत इतिहास मी १९४४ सालीं लिहिला. व तो सोमेश्वर प्रेस (उमरावती) कडे छापावयास दिला होता. चोवीस पानें छापून झाल्यानंतर 'पेपर कंट्रोल आर्डर' अस्तित्वांत आली. पुढे कागद दुर्मिळ झाला. व नंतर इतरहि अनेक कारणांमुळे आजवर प्रकाशनाचा योग आला नाही. १९५२ मध्ये मात्र एकाएकी ग्रंथ छापण्याचें ठरलें. व मी जशी होती तशी प्रत प्रकाशकाला छापावयास दिली.

२ पूर्वीच्या या ग्रंथांत य. खु. देशपांडे यांच्या चरित्राची सुरवातीचीं कांही पानें होतीं व पुढे युरोपांतील त्यांची यात्रा, व त्यांचें व्यक्तिमत्व, हीं प्रकरणें होतीं. त्याचबरोबर विदर्भाच्या इतर संशोधकांच्या कार्याची व संशोधन-संस्थांची माहिती होती. भाषा, कला इत्यादिकांचें विवेचन होतें. त्यापैकी पृष्ठें १२८ च छापावयाचीं ठरलें होतें व त्याला 'य. खु. देशपांडे चरित्र' हें नांव द्यावयाचें होतें. एकशे अकरा पानें छापवून झालीं व म्हणून डॉ. य. खु. देशपांडे असा मजकूर प्रत्येक पानाच्या वरच्या डाव्या कोपऱ्यांत तेथपर्यंत पडलेला आहे.

वरील हस्तलिखितांत मी कांही अद्यावत् सुधारणा केलेल्या होत्याच; पण १९४४ ते १९५१ या अवधींत विदर्भ-संशोधनाने एका दृष्टीने हरणटप्पा गाठलेला होता. त्यामुळे पुष्कळशीच अद्यावत् प्रगति द्यावयाची राहून गेली होती व कांही थोडी विधानें जुनाट झालीं होतीं. त्यामुळे ग्रंथ जसा छापावयास दिला तसाच प्रकाशित करविणें मला बरे वाटेना! १२८ पानांत विदर्भ संशोधनाचें साकल्याने समालोचन होत नाही असेंहि दिसून आलें. त्यामुळे ग्रंथ बहुतांशी पूर्णपणेच (Exhaustive) लिहावा, अशी कल्पना आली व

नंतर ३०० पर्यंत पृष्ठें वाढवावींत व ग्रंथाचें नांव 'विदर्भ संशोधनाचा इतिहास' असें ठेवावें, हें ठरलें.

त्यांत विशेषसें कांही बिघडलें नाही. कारण पहिल्या हस्तलिखितांत य. खु. देशपांडे यांचें खास चरित्र ३६ च पानें होतें व पुढे शारदाश्रम, महानुभावीय तत्वज्ञान, महानुभावीय गद्य-पद्य वाङ्मय, प्राचीन विदर्भ, मराठीची रूपसिद्धि, जागतिक इतिहास परिषद, पाश्चात्य संशोधनात्मक माहिती (आनुषंगिक), भारतीय चित्रकला (आनुषंगिक) वगैरे विषय असल्यामुळे तोहि एक विदर्भ संशोधनाचा भाग आहे **व म्हणून पान ३६ पासून पुढे प्रत्येक पानाच्या वरच्या डाव्या कोपऱ्यांत 'य. खु. देशपांडे' या मजकुराऐवजीं 'विदर्भ संशोधनाचा इतिहास' असा मजकूर पान १११ पर्यंत पाहिजे; व तो तसा आहे असें समजावें.**

वरील कल्पना, १११ पानें छापवून होण्याच्या पूर्वी आली असती, तर सुरवातीच्या युरोपची यात्रा, व्यक्तिमत्व व इतर कांही प्रकरणांचाही प्रमाणशीर बराच संक्षेप करतां आला असता; व शिवाय 'विदर्भ संशोधनाचा इतिहास' हा मजकूर ३६ पानापासूनच १११ पानापर्यंत वरच्या डाव्या कोपऱ्यांत देण्यांत आला असतां. 'विदर्भ संशोधनाचा इतिहास' या दृष्टीने, पानें ३६ ते १११ पर्यंतचीं, जुन्या प्रकरणांचीं नांवेंहि बदलावयास पाहिजेत; तशीं बदलवून ती अनुक्रमणिकेमध्ये दिलेलीं आहेत.

जुन्या ग्रंथांतील सुरवातीचा काही भाग, कांही सुधारणा करून तसाच कायम ठेवल्यामुळे, व विदर्भ संशोधनाच्या इतिहासाचा पुढील सबंध भाग ठिकठिकाणीं नवीन लिहिल्याने (Recast) ग्रंथाच्या प्रमाणशीरतेला थोडी बाधा आल्यासारखे वाटेल; पण तें अपरिहार्यच होतें!

आपल्या प्रांतांत संशोधनाचें महत्व सामान्य लोकांसच काय, पण प्रायः साक्षेपी विद्वानांसहि फारसें पटलेलें दिसत नाही व त्यामुळे संशोधक व संशोधन-संस्थांची आर्थिक दृष्टया वगैरे केविलवाणी स्थिति झालेली आहे, व संशोधनांत अनेक अडचणी उत्पन्न होत आहेत.

सांस्कृतिक, ऐतिहासिक, राजकीय, सामाजिक, भाषाविषयक वगैरे बाबतींच्या मूळाशीं संशोधनाशिवाय दुसरें तिसरें कांही नसून, संशोधन बंद पडल्यास, मानवजात व मानवी संस्कृतीच संपुष्टांत येतील ! त्यामुळे संशोधनाच्या सर्वश्रेष्ठ महत्वाचा एकच एक ठसा ( Single impression ), साधेल त्या आकर्षक लेखनशैलीने, सुशिक्षितांवर व अर्ध सुशिक्षितांवर जितक्या परिणामकारक तऱ्हेने उमटवितां येईल, तितक्या परिणामकारक तऱ्हेने उमटविण्याचा यत्न या ग्रंथांत केलेला आहे.

३ संस्कृति हा राष्ट्राचा आत्मा आहे. त्यांत ललितकला ( शिल्प, मूर्ति, चित्र, रंग वगैरे ), तत्वज्ञान ( धर्म वगैरे ), शास्त्रें, वाङ्मय ( भाषा वगैरे ), इतिहास ( शिलालेख, ताम्रपट नाणीं, पत्रव्यवहार, लोकगीतें, विवरमंदिरें, प्राचीन अवशेष, उत्खनन वगैरे ) इत्यादि सर्वांचा समावेश होतो व केवळ संशोधनाच्याच साह्याने हें सर्व टिकविणें व समृद्ध करणें शक्य असते. त्यांस अनुसरून संशोधनाच्या क्षेत्रांत येणाऱ्या या सर्व विषयांचें मुख्य विषयाच्या अनुषंगाने, या ग्रंथांत विवरण केलेलें आहे.

४ त्याचबरोबर वैदर्भीय संशोधकांच्या व संशोधन संस्थांच्या कार्याचें विवेचनहि केलें आहे. हा ग्रंथ सूचिवजा, जंत्रीवजा किंवा Directory सारखा करण्याचा मुळीच उद्देश नसल्यामुळे, सर्व संशोधकांच्या सर्व ग्रंथांच्या वा लेखांच्या याद्या त्यांत देण्यांत आल्या नाहीत. कृष्णशास्त्री घुले, डॉ. दप्तरी, म. म. मिराशी यांच्या कार्याचें मूल्यमापन करण्याकरता कांहीशा पेनपिक्चरसारख्या किंवा चित्रपटांतील ' Close up ' सारख्या (गळ्याचा वरचा भाग मोठ्या आकारांत पडद्यावर दाखविणें) पद्धतीचा उपयोग केलेला आहे. त्यानंतर त्यांच्या खालोखाल कार्य केलेल्या संशोधकांना स्वतंत्र स्थानें देऊन, त्यांच्या कार्याचें विवरण केलेलें आहे. इतर कांही अशा थोड्याशा संशोधकानांहि स्वतंत्र स्थानें देणें आवश्यक होतें. पण ग्रंथाच्या पृष्ठांच्या मर्यादेंत तें बसत नव्हतें. बाकीच्या सर्व संशोधकांना मी त्यांच्या कार्याच्या मानाने जागा दिलेली आहे. मी त्यांच्या कार्याचें केलेलें मूल्यमापन माझ्या दृष्टीकोणांतून असल्यामुळे, त्यांत मतभेदास बराच वाव आहे. कुणास कमी स्थान दिले गेलें असल्यास, त्यांच्या कार्याच्या असलेल्या मूळच्या मूल्याचें (Intrinsic Value) महत्व अर्थातच कमी होत नाही. व्यक्तीच्या

लिखाणाबाबत, तुलनात्मकतेने समीक्षा करतांना, क्वचित कुणाच्या मनांत असमाधानाचा अंश निर्माण होणें ही गोष्ट केवळ अटळ आहे ! शिवाय अनवधानामुळे कांही नांवें सुटलीं असल्याचा संभव आहे. वास्तविक असा ग्रंथ कांहींनी विभागून घेऊन लिहावयास पाहिजे. हा प्रयत्न केवळ माझ्या एकट्याचाच आहे, हें जाणून ते मला क्षमा करतील अशी आशा आहे. या ग्रंथांत वाङ्मयीन संशोधनापेक्षा ऐतिहासिक संशोधनाला जास्त महत्व दिलें आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

५ प्राचीन विदर्भांत साधारणतः मराठी मध्यप्रांत, वऱ्हाड, पूर्व खानदेश, व निजामशाहींतील मराठी विभाग यांचा समावेश होत असला व ग्रंथांत मुख्यतः तेंच क्षेत्र ठेवलेलें असलें, तरी क्वचित ठिकाणीं, संस्कृति, कला व संशोधनविषयक प्रश्नाबाबत महाराष्ट्र, भारत व जागतिक क्षेत्रालाहि स्पर्श झालेला आहे. तसेच संस्कृति भाषाविषयक वगैरे प्रश्नांबद्दल अगदी सुरवाती पासूनच्या घटणांचें विहंगमावलोकन करून, विदर्भाबाबत त्यांचा विस्तार केलेला आहे व ग्रंथ याप्रमाणे व्यापक दृष्टीनेच लिहिण्याचा प्रयत्न केलेला आहे.

६ यवतमाळ शहरांत ग्रंथकाराला सुखासुखी आयती माहिती मिळत असेल, अशी बाहेर समजून असल्याचें दिसतें. येथे आधारभूत ग्रंथ बहुधा मिळूं शकत नाहीत; कुणाचें विशेष सहाय्यहि होत नाही; पुस्तकें बाहेरून मिळवून माहिती संग्रहीत करणें कठीणच जाते; त्यामुळे प्रस्तुत सारख्या विपुल संदर्भयुक्त ग्रंथांत कांही अधिक-उणें असण्याचा संभव राहणारच ! शिवाय दुर्दैवाने यंदाच्या वर्षी इतर कामांचीहि खूप झोड आली ! त्यामुळे ग्रंथ बारकाईने तपासण्यास–विशेषतः शेवटीं शेवटीं–वेळ न झाल्यामुळे क्वचित पुनरुक्ति वगैरे झाली असल्याचाहि संभव आहे. शुद्धिपत्रांत कांही अशुद्धें शुद्ध केलींच आहेत. तरी या ग्रंथांतील उणीवा लक्षांत आल्यास व आणून दिल्या गेल्यास त्या पुढील आवृत्तींत (विदर्भांत तरी हा योग दुरापास्तच आहे !) अवश्य दुरुस्त केल्या जातील.

७ या ग्रंथामुळे कांहींना जरी संशोधनाबद्दल जिज्ञासा उत्पन्न झाली व कांहींना थोड्याबहुत नवीन दृष्टिकोनाचा लाभ झाला, तरी ग्रंथाचें चीज झाल्यासारखें मला वाटेल.

८ ग्रंथ कोणत्या योग्येतचा आहे ते तज्ज्ञ ठरवितीलच ! माझ्या पुरते मात्र, ग्रंथांत कांहीहि दोष असले तरी, संशोधनक्षेत्रांतील कदाचित् अगदींच थोडे दर्दी संशोधक सोडले तर, इतरांना कांही ठिकाणचे नावीन्यपूर्ण विचाराचे व विशेषतः ग्रंथाच्या मांडणीचे (Style) कर्तृत्व जाणवल्या-शिवाय राहणार नाही असें वाटतें !

९ आंतरराष्ट्रीय कीर्तीचे विद्वान संशोधक प्राचार्य **वा. वि.** उर्फ **नानासाहेब मिराशी** यांनी माझ्या ग्रंथाला, आपला अमूल्य वेळ खर्च करून प्रस्तावना लिहून दिली, याबद्दल त्यांचे कोणत्या शब्दांत आभार मानावेत तें कळत नाही. 'त्यांचें माझ्यावर अपार ऋण झालें आहे; त्यामुळे मी त्यांचा अंतःकरणपूर्वक आभारी आहे' एवढेच येथे म्हणतों ! वरील ग्रंथाच्या प्रकाशनाबाबत येथील वकील श्री **रामभाऊ दामले** यांची मला सर्वतोपरी मदत झालेली आहे. ते माझे सन्मित्रच असल्यामुळे, त्यांचे आभार मानून त्यांच्या ऋणांतून निसटून जाणें मला प्रशस्त वाटत नाही ! प्रदीप प्रेसचे चालक श्री. **श्री. वि. गंधे** यांनी फार श्रम घेऊन ग्रंथाचें काम चांगल्या-तऱ्हेने करून दिलें, याबद्दल त्यांचे आभार मानावेत तितके थोडेच होतील. मुखपृष्ठावरील चित्र प्रतिकात्मक आहे.

१० ज्या लेखकांच्या लेखांतील, लेखनांतील व ग्रंथांतील लिखाणाचा मला उपयोग झाला त्या सर्वांचा मी ऋणी आहे.

११ स्वतःच्या देशाची कोणत्याहि दृष्टीने थोडीबहुत जरी सेवा झाली तर त्यांत केवढा आनंद ! मग कालिदासासारख्या कविश्रेष्ठाने ज्याला "सौराज्यरम्य"—म्हणून गौरविलें, त्या विदर्भ देशाची अल्पस्वल्पहि सेवा झाल्याचा आनंद कल्पनातीतच आहे.......... आणि तोच मी आज अनुभवीत आहे !........

अवधूतवाडी, यवतमाळ
दिनांक ७।७।१९५३

**नारायण नागोराव हुड**

# प्रस्तावना

यवतमाळचे साहित्यिक श्री. नारायण नागोराव हूड यांनी 'विदर्भ संशोधनाचा इतिहास' या ग्रंथाची बरीचशी छापील पृष्ठें पाठवून, मी त्याला प्रस्तावना लिहावी अशी विनंति केली. तेव्हा सकृद्दर्शनीच तसें करणें औचित्याच्या दृष्टीने योग्य होणार नाही, असें माझ्या ध्यानांत आलें. या पुस्तकांत माझ्या स्वतःच्या संशोधनाविषयी माहिती व प्रशंसोद्गार आहेत. हा मजकूर मला न कळवितां घालण्यांत आला असला तरी, वाचकांस तसें वाटण्याचा संभव नाही. तेव्हा मी प्रस्तावना लिहिल्यास 'परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ' या श्रीभगवद्गीतोक्तीचा अवलंब व्यवहारांत केल्याचा दोष आम्हा दोघांच्याहि पदरीं येईल असें सहजच वाटलें. पण श्री. हूड यांनी बराच आग्रह केल्यामुळे, व ते माझे भूतपूर्व विद्यार्थी असल्यामुळे मी प्रस्तावना देण्याचें कबूल केलें.

गेल्या चाळीस वर्षांत डॉ. देशपांडे यांनी वैदर्भीय जनतेची अनेक प्रकारें सेवा केली आहे. तालुकाबोर्ड, जिल्हाबोर्ड, नागपूर विद्यापीठ इत्यादि सार्वजनिक संस्थांच्या कामांत भाग घेऊन, त्यांनी जनऋण फेडलें आहे. पण या कार्यापेक्षा संशोधनक्षेत्रांतील त्यांची कामगिरी विशेष संस्मरणीय झाली आहे. त्यांनी १९२६ सालीं स्थापलेला शारदाश्रम ही मध्य-प्रदेशांतील पहिली संशोधन-संस्था होय. त्यापूर्वी या भागांत संशोधनाचे अनेक वैयक्तिक प्रयत्न झाले. पण संस्था स्थापून अनेकांच्या सहकार्याने संशोधनसामग्री संग्रहीत करण्याचा प्रयत्न आप्पासाहेबांनीच प्रथम केला. गेल्या पंचवीस-तीस वर्षांत त्यांनी स्वतःस या कार्यास अत्यंत निरपेक्षपणे वाहून घेतलें आहे. ते असा प्रयत्न न करते तर, संशोधनाची बरीचशी

बहुमोल सामग्री हळूहळू नष्ट होण्याच्या पंथास लागली असती, यांत संशय नाही. त्यांनी नागपूर विद्यापीठाकरता प्राचीन हस्तलिखितें मिळविण्यांत केलेली मदतहि अशीच उल्लेखनीय आहे. महानुभावीय वाङ्मयाचें संशोधन हें मध्यप्रदेशाचें संशोधन-क्षेत्रांतील वैशिष्ट्य गणलें जातें. त्यांचाहि उपक्रम आप्पासाहेबांनीच केला. त्यांच्या कार्यानें प्रभावित होऊन, त्यांच्या सहकाऱ्यांनी या व इतर क्षेत्रांत बरीच कामगिरी केली आहे. तिचेंहि बरेचसें श्रेय त्यांनाच द्यावयास पाहिजे.

मध्यप्रदेशांत आतापर्यंत अनेक संशोधक होऊन गेले व सध्याहि कांही काम करीत आहेत. पण त्यांच्या व आप्पासाहेबांच्या कार्यातील एक फरक सकृद्दर्शनीच कोणाच्याहि लक्षांत येतो. इतर संशोधक आपल्या आवडीचें क्षेत्र निवडून त्यांतच रममाण होतात. आप्पासाहेबांचें तसें नाही. त्यांची संशोधकबुद्धि सर्वतोगामी व अकुण्ठित अशी आहे. प्राचीन शिलालेख, ताम्रपट, मूर्ति, संस्कृत व मराठी प्राचीन ग्रंथ, ऐतिहासिक कागदपत्रें, मराठी भाषा व वाङ्मय अशा विविध प्रकारच्या संशोधनक्षेत्रांत त्यांनी कार्य केलें आहे. त्यापैकी कोणत्याहि एकदोन क्षेत्रांत त्यांच्यापेक्षा जास्त भरीव व निर्दोष कार्य केलेले संशोधक दाखवितां येतील. पण या सर्व क्षेत्रांत सारखेंच लक्ष घालणारे सहसा सापडणार नाहीत. आप्पासाहेब देशपांडे हे या दुसऱ्या प्रकारचे सर्वसंग्राहक वृत्तीचे संशोधक होत. यांतच त्यांचें खरें वैशिष्ट्य आहे.

आतापर्यंत अनेक संस्थांनी आप्पासाहेबांचा गौरव केला आहे. नागपूर विद्यापीठानें डी. लिट् ही पदवी देऊन केलेला त्यांचा सन्मान हा सर्वोच्च होय. निरपेक्षवृत्तीनें सतत कार्य करीत राहणाऱ्या या थोर संशोधकाचें चरित्र अनेकांस स्फूर्तिप्रद होणार असल्यानें तें लेखनिविष्ट करणें आवश्यक होतें. तें कार्य श्री. हूड यांनी या पुस्तकांत उत्कृष्ट रीतीनें केलें आहे.

श्री. हूड हे आप्पासाहेबांच्या संशोधनानें प्रभावित झालेल्या यवतमाळच्या त्यांच्या सहकाऱ्यांपैकी एक आहेत. आप्पासाहेबांचें साहचर्य त्यांस अनेक वर्षें लाभलें आहे. ते स्वतः चांगले साहित्यिक असून, त्यांना संशोधन-कार्याविषयी आस्था व आवड आहे. त्यांनी हें चरित्र अत्यंत परिश्रम-पूर्वक व सहृदयतेने लिहिलें असून, त्यांत आप्पासाहेबांच्या संशोधनाचे व स्वभावाचे अनेक पैलू स्पष्ट केले आहेत. या भागाची भाषाहि ओघवती व रसाळ असल्यामुळे, तो अत्यंत मनोरम झाला आहे, असें माझ्याप्रमाणेच वाचकांचेंहि मत होईल, असा मला भरंवसा आहे.

प्रथम डॉ. देशपांडे यांचें केवळ चरित्र लिहिण्याचा संकल्प श्री. हूड यांनी केला होता असें दिसतें. याचें कारण तें चरित्रहि छापण्याची व्यवस्था होईल किंवा नाही, याची शंका हें असावें. सर्वारम्भा-स्तंडुलप्रस्थमूलाः ! संशोधन-संस्थांचें दारिद्र्य सुप्रसिद्ध आहे. संशोधनाचें महत्त्व कितीहि असलें तरी सरकार व जनता यांना तें पटेल तेव्हा खरें ! या संबंधी श्री. हूड यांनी पृष्ठें १४२-१४४ वर तळमळीने काढलेले उद्गार अगदी खरे आहेत.

आप्पासाहेबांचें चरित्र छापून झाल्यावर, मध्यप्रदेशांतील इतरहि दिवंगत व विद्यमान संशोधकांच्या कार्याचें विस्तृत समालोचन करावें, असा विचार श्री. हूड यांनी केलेला दिसतो. व श्री. देशपांडे यांच्या चरित्राच्या भागांतहि अनेक संशोधनात्मक विषयाचें विवरण आलें असल्यामुळे, या सर्वंच ग्रंथाला 'विदर्भ संशोधनाचा इतिहास' असें व्यापक नांव त्यांनी दिलें आहे.

श्री. हूड हे शारदाश्रमाच्या प्रमुख कार्यकर्त्यांपैकी एक आहेत. त्यांनी स्वतः विशेष संशोधन केलें नसलें तरी, संशोधनाविषयी त्यांना अत्यंत आवड व आदर आहे. ऐतिहासिक संशोधनाच्या विविध शाखांविषयी

त्यांचें वाचनहि विस्तृत आहे, याचा प्रत्यय अनेक ठिकाणीं येतो. या दुसऱ्या भागाच्या आरंभीं घातलेल्या 'संशोधनाचें समर्थन' या विस्तृत प्रकरणांत, त्यांनी संशोधन-विषयक अनेक, प्रश्नांचा उहापोह केला आहे. सामान्य वाचकांस संशोधनाविषयी कांही माहिती नसते. भाषा, इतिहास स्थापत्यादि विविधकला या सारख्या विषयांवरील संशोधनपर ग्रंथ व नियतकालिकें त्याच्या वाचनांत येत नाहीत. संशोधक म्हणजे रूक्ष विषयाचा काथ्याकूट करणारा विक्षिप्त वृत्तीचा एक प्राणी, अशी त्यांची कल्पना असते. अशा वाचकांची उपेक्षा न करतां त्यांना संशोधनकार्याचें महत्व पटवून देणें, हेंहि संशोधनोपयोगी असेंच कार्य आहे. तें श्री. हूड यांनी उत्कृष्ट रीतीने केलें आहे. त्याचप्रमाणे त्यांनी वरच्या दर्जाच्या वाचकांकरितांहि ठिकठिकाणीं महत्वाच्या विषयांचें मार्मिक समालोचन व कांही मुद्यांचें मार्गदर्शनहि केलेलें आहे.

पुस्तकाच्या पृष्ठांची मर्यादा प्रथमपासून निश्चित न झाल्याने त्यांतील विषय योजनापूर्वक हाताळलेले दिसत नाहीत. क्वचित ठिकाणीं पुनरुक्ति झालेली आहे. वैयक्तिक संशोधनाची माहिती देत असतांना मध्येच एक दोन ठिकाणीं संशोधन-शाखांविषयी सामान्य माहिती आली आहे. हा भाग आरंभीच्या प्रस्तावनात्मक प्रकरणांत आला असता तर ठीक झालें असतें. अशा ठिकाणीं प्रस्तुत विषयांत खंड पडून वाचकास अडखळल्यासारखे वाटते. 'संशोधन-क्षेत्रांतील मानकरी' या प्रकरणांत असावी तितकी प्रमाणबद्धता दिसत नाही. शेवटीं शेवटीं घाईने मजकूर लिहून झाला तसा छापण्यास पाठविल्याने क्वचित दोष उत्पन्न झालेले दिसतात. या प्रकरणावर थोडेबहूत आक्षेप येण्याचा संभव आहे. कांहींना त्यांतील प्रशंसोद्गार अतिशयोक्तीचे वाटतील, तर इतर कांहींचा आपल्या संशोधनाच्या दिग्दर्शनास पुरेशी जागा न दिल्याबद्दल लेखकावर रोष होण्याचा संभव आहे. या प्रकरणाने कांहींचें समाधान होणार नाही अशी भीति वाटत

असली, तरी, वाचकांना त्यामुळे मध्यप्रदेशांतील संशोधक व त्यांचें संशोधन याची बरीच कल्पना येईल यांत संशय नाही.

संशोधनाचे संदर्भग्रंथ व नियतकालिकें यांनी सुसमृद्ध असें पुस्तकालय ज्या ठिकाणीं नाही, अशा यवतमाळसारख्या आडगावीं अशा प्रकारच विविध माहितीने भरलेलें पुस्तक लिहिणें, हें कठिण काम आहे. तथापि श्री. हूड यांनी संशोधन-विषयक ग्रंथ व लेख प्रथमपासून साक्षेपाने मिळवून त्यांचा संग्रह केला असल्यामुळें, त्यांना हें कार्य करता आलें. कांही ठिकाणची माहिती स्वतः त्यांना पडताळून पाहतां न आल्यामुळे थोड्या बहुत चुका राहून गेलेल्या दिसतात. असे दोष कोणाच्याहि लेखनांत दाखवितां येतील; त्यामुळे त्यांनी अत्यंत परिश्रमाने लिहिलेल्या या ग्रंथाचें महत्व कमी होत नाही.

मध्यप्रदेशांतील सरकार व जनता यांना भाषा, इतिहास, कला, सस्कृति इत्यादि विषयांतील संशोधनाचें महत्व अद्यापि पटलेलें दिसत नाही. मुंबई, उत्तरप्रदेश, बंगाल इत्यादि इतर प्रदेशांतील सरकारें, आपापल्या प्रदेशांतील संशोधन–संस्थांना थोडेबहुत द्रव्यसहाय्य करतात, तसें मध्यप्रदेशांतील सरकार, एखादा अपवाद वगळल्यास करतांना दिसत नाही. सामान्य जनतेला तर या कार्याचें महत्वच कळत नाही. सध्याच्या पदवीधर तरुणांचेंहि या विषयाकडे लक्ष जात नाही ! ही परिस्थिति सुधारावयाची असेल तर संशोधन–कार्याचें महत्व व त्याचें विवरण आकर्षक शैलीने जनतेपुढे मांडणें आवश्यक होतें. तें कार्य प्रस्तुत ग्रंथाने चांगलें होईल असा मला विश्वास वाटतो.

नागपूर
ता. २१–८–५३

वा. वि. मिराशी

# प्रकाशिकेचें मनोगत

' विदर्भ संशोधनाचा इतिहास ' या ग्रंथाच्या प्रकाशनाची जबाबदारी आम्ही पत्करली आहे. या ग्रंथांत प्राचीन विदर्भाच्या विस्तृत व व्यापक स्थलसीमेंतील संस्कृति, संशोधन, इतिहास, पुरातत्व, कला इत्यादींचें मौलिक गुणयुक्त समालोचन व दिग्दर्शन केलेलें असल्यामुळे आम्ही कर्तव्यबुद्धीने हें प्रकाशन करीत आहोंत.

टिळकवाडी,<br>
दि ७।७।१९५३

सौ उषा दामले, बी. ए.<br>
आनंद प्रकाशन, यवतमाळ

---

मुखपृष्ठावरील मंदिराचें चित्र लोहारा (यवतमाळ जवळचें गाव) येथील हेमाडपंती शिवालयाचें आहे.

# जीवनप्रवाह • • • १.

सत्तर वर्षांपूर्वीची गोष्ट. वडिलोपार्जित चार पांच निकस शेतें, देशपांडे घराण्याचा आहे म्हणण्यासारखा रुसुम, निर्जन गावाची पाटिलकी, दोन गावचे मुखत्यार पटवारी म्हणून येणारे १५०–२०० रु. चें वार्षिक उत्पन्न, एवढ्या-वरच आपल्या वाढत्या कुटुंबाची गुजराण जेमतेम करीत असलेल्या गृहस्थास आणखी एक मुलगा झाला म्हणून आनंद मानण्याइतकी त्या सुबत्तेच्या काळां-तही परिस्थिति नव्हती! तथापि जात्याच गंभीर माणसासहि आनंद देणारी अशी एक घटना अनपेक्षितपणें दहा दिवसाच्या आंतच घडून आली. त्यामुळे मुलाचा पायगुण चांगला लागला म्हणून घरांतील सर्व मंडळींना त्याच्याबद्दल निःसीम कौतुक वाटत होतें. पापळहून दोन कोस पश्चिमेकडे धनजबाजार म्हणून साधारण बऱ्यापैकी बाजारपेठ असून तेथे सावकारी वगैरे करणाऱ्या मारवा-ड्यांचीं अंदाजें शंभरएक घरें होतीं. तेथे 'सबरजिष्टर' ची कचेरी उघडण्याचें ठरून, त्या ठिकाणीं 'सबरजिस्ट्रार' नेमल्या गेल्याबद्दलचा हुकूम तात्यांच्या (डॉ. देशपांडे यांचे वडील) हातांत पडला. वऱ्हाड-मध्यप्रांतांत 'सबरजिष्टर' म्हणजे काय प्रकरण असतें, याची कल्पना, त्याची तितक्याच पगारावर अस-लेल्या, दुसऱ्या खात्यांतील अधिकाऱ्याशीं तुलना केली असता सहज स्पष्ट होणारी आहे. पटवारीपणाची अजीजीची नोकरी टळून, त्यांना स्वतंत्र 'ऑफिस' असलेली, इतकेंच नव्हे तर बैठी परंतु प्रतिष्ठित अशी इतमामाची नोकरी मिळाली. शिवाय उत्पन्नांतहि वाढ झाली. कुळांत रिवाज नसतांहि मुलाचें बारसें मोठ्या थाटाने पार पडलें व बारश्याच्या दिवशीं मुलाचें नांव "यशवंत" असें ठेवण्यांत आलें. विदर्भाचें यश संशोधनक्षेत्रांत दिगंत नेणाऱ्या वाङ्मयसेवकाचें हें नांव अन्वर्थक ठेवलें गेलें होतें असें कोण म्हणणार नाही?

पापळच्या पूर्वेस तीन कोसावर असलेल्या सालोड येथील चिमणाजीपंत देशपांडे यांच्या मुलीचें तात्यांशीं लग्न झालें होतें. लग्नांत तात्यांचें वय दहा वर्षांचें व देशपांड्यांच्या आईचें म्हणजे जानकीबाईचें वय केवळ सहा वर्षांचें होतें. तात्यांचें शिक्षण गावांतच, प्रसिद्ध इंग्लिश कवि गोल्डस्मिथ याने उपरोधपूर्णतने वर्णन केलेल्या 'व्हिलेज स्कूल मास्टर' छाप गावठी पंतोजींच्या हाताखालीच मराठी वाचणें कसेंबसें येण्याइतपत झालें. एवढ्या शिक्षणाच्या भांडवलावर पुढील आयुष्यात सबरजिष्ट्रारची मानाची नोकरी मिळाल्यावर, त्याच्याबरोबर तो सर्वांनाच अभूतपूर्व भाग्योदय वाटला यांत नवल नाही.

धनजला बंगलीवजा घरांत राहूं लागल्यानंतर 'येशाची' प्रतिष्ठा अधिकच वाढली. शेजारीपाजारीच काय पण इतर गावांतीलहि लोक कित्येकदा येऊन या लहानग्या बाळाच्या लीलांचें कौतुक करूं लागले. 'चांगल्या पायगुणाचा' ही खात्री झाल्यामुळे खुद्द वडिलापासून तो तिऱ्हाइतापर्यंत सर्वांच्याच गळ्यांतील तो ताईत बनून राहिला होता.

पण पांच सहा महिन्यांच्या आंतच त्याच्या अंगांत ताप भरून तो निपचित पडलेला पाहतांच घरांत धावपळ सुरू झाली. कोणी नवस बोलले, कोणीं रांखोडी, पाणी मंत्रून दिलें व खेड्यांतील वैदूने सोनामुर्खीच्या फक्कीपासून तहत चिंतामणीच्या प्रभावाच्या मात्रा बटव्यांतून काढल्या! सर्वांग लाल ठिपक्यांनी फुललेलें दिसले. 'देवी' आहे हें ठरल्याबरोबर शीतळा देवीची मान्यता करण्यास सुरवात झाली! या आजारांतून बरें होण्यास त्यांना चांगले सहा महिने लागले. अजूनहि देवीचे पुसट व्रण अंगावर व चेहऱ्यावर दिसतात.

धनजला वास्तव्य असलें तरी यशवंतची आई त्याला घेऊन मधूनमधून पापळला जात असे. यशवंतचे चुलत आजे सावजीपंत हे त्यावर फार लोभ करीत. तो त्यांच्या घरांतील दरवाजाच्या आडव्या पट्यावर उभा राहून, दाराची कडी खडखड करीत 'येशा, येतोस का रे जेवायला?' असे आजोबाचे नेहमीचे शब्द ऐकण्यास आतुर असा घोटाळत उभा राही व कांही वेळाने आजोबाचे तोंडचे ते नेमके गोड शब्द बाहेर पडले म्हणजे थोडेसे आढेवेढे घेऊन त्यांच्याबरोबर पंक्तीस बसत असे. पापळला असतांना आजोबा बरोबरचें त्याचें सहभोजन जवळजवळ एकहि दिवस चुकलें नाही.

१८९० मध्ये म्हणजे वयाच्या सहाव्या वर्षी यशवंतच्या शिक्षणास सुरवात झाली. धनज येथील मराठी शाळेंत त्याचें नांव टाकण्यांत आलें त्यावेळीं रामप्रसाद वालचंद कायस्थ हे हेडमास्तर व अबदुल हुसेन हे असिस्टंट मास्तर होते. या अबदुल हुसेन मास्तरांचीं मुलें 'कु कूऽऽचकूऽऽऽ' म्हणून ओरडून थट्टा करीत. दर पीराला अबदुल हुसेन यांचेकडे मुर्गी काटली जाई व त्यावरून त्याची ही चीड पडली होती. व यशवंत शाळेंतून घरीं आल्यावर "आज आमच्या मास्तरांकडे "कु कू च कू" झालें" असें गमतीने घरांतील मंडळींना सांगे! धनजच्या शाळेंत रतन हेमराज भाटे, नामदेव सुनार, विष्णु नारायण डांगे हे यशवंतच सहाध्यायी असत. त्यापैकीं विष्णु नारायण डांगे यानेच फक्त कॉलेजपर्यंत मजल मारली होती.

यशवंत चौथींत असतांना त्या वेळेचे शाळाखात्याचे डायरेक्टर श्रीराम भिकाजी जठार हे शाळा तपासावयास आले होते. त्यांनी वर्गांतील प्रत्येक मुलाला, 'परीक्षा पास झाल्यावर तूं काय करण्याचें ठरविलें आहेस?' असा प्रश्न केला. कोणीं 'मी सुतार होणार,' 'मी व्यापारी होणार' तर 'मी ऑफिसर होणार' अशीं उत्तरें दिलीं. पण श्री. जठाराच्या हातांतील जाड्या पुस्तकाकडे पाहत यशवंतने उत्तर दिलें: "मी पुढे मोठीं पुस्तकें लिहिणार?' डायरेक्टर साहेबांनी त्याच्या पाठीवर प्रेमाने थापटी मारून म्हटलें, "शाब्बास" व 'हा कोणाचा मुलगा?' म्हणून चौकशी केली. चीनमध्ये अशी पद्धत आहे की, लहान मुलाला त्याच्या वाढदिवशीं, सर्वांचीं जेवणें आटोपल्यावर तराजू, रत्नांचे लहान लहान खडे, निरनिराळे ग्रंथ, चित्रें व वाद्यें इत्यादिकांचे संग्रहांत सोडून देतात व सर्व मंडळी आजूबाजूला, मूल पहिल्याप्रथम स्वयंस्फूर्तीने कोणत्या वस्तूला हात लावतें हें पाहतात. त्याने सर्वप्रथम तराजूला हात लावला तर तें मूल व्यापारी, रत्नांच्या खड्याला हात लावला तर अधिकारी, ग्रंथाला हात लावला तर विद्वान् ग्रंथकार व चित्रें व वाद्यांना हात लावला तर कलावंत होणार अशी त्यांची समजूत असते. अशा कित्येक प्रसंगावरून 'लहान मुलाचे पाय पाळण्यांतच दिसतात' या म्हणीचें प्रत्यंतर येतें. पुस्तकें लिहिण्याची स्मृति मनांत कायम ठेऊनच की काय, यशवंतने पुढे सहाच वर्षांनी (१८९९ सालीं) शारदेला 'गणेश पद्यावली' हें एक सुंदरसें पिंपळ-

पान वाहिलें. वयाच्या केवळ पंधराव्याच वर्षी हा चिमुकला पण कौतुकास्पद असा, शारदेला केलेला नजराणा पाहून मराठी वाङ्मयसेवेचा अंकुर त्याच वेळीं या बालकाच्या मनांत कसा उद्भूत झाला होता हें दिसून येतें. त्याच्या वेळच्या विद्यार्थ्यांमध्ये 'शाळेंत नेहमी नियमित जाणारा' म्हणून त्याची ख्याति होती. इतर कांही इब्लिस विद्यार्थ्यांप्रमाणे त्याची उचलबांगडी करून त्याला शाळेंत कधीहि न्यावें लागलें नाही!

त्यावेळीं महिमाजी नांवाचा एक ऐंशी वर्षांचा म्हातारा त्याचा मोठा चहाता असे. रोज शेजारच्यीं कांही मुलें गोळा करून तो लढाईचें वगैरे रसभरीत वर्णन करी. त्याचप्रमाणे तो जखिणी-डाकिणींच्या, भुताखेतांच्या लोककथासारख्या, व इंग्रजीमध्ये जशा 'फेअरी टेल्स' असतात त्याप्रमाणे गोष्टी सांगे व त्यांत मुलें तल्लीन होत. त्यामुळे मनोरंजन होऊन मुलांच्या कल्पनाशक्तीसहि चालना मिळे. साहित्याच्या या मूलधनाकडे यशवंतचें लक्ष वरचेवर वेधून राही. जवळजवळ ५०-५५ वर्षांपूर्वींच्या कांही पुसट आठवणींत ती महिमाजींची विनोदी मूर्ति त्यांच्या डोळ्यांसमोर अजून उभी राहते असें ते सांगतात.

चौथींत असतांनाच यशवंतचें मौंजीबंधन झालें. जे संस्कार मुलाच्या मनावर लहानपणीं होतात त्यांचाच पुढे उत्तरोत्तर विकास होऊन, ते त्याच्या आयुष्यभर कायम राहतात. वैदिक संस्कृतीविषयी डॉ. देशपांडे यांच्या मनांत जो अभिमान आहे त्याचें मूळ त्यांच्या आयुष्यांतील पुढील उल्लेखिलेल्या घटनांत पाहवयास सापडेल असें वाटतें.

आयुष्याच्या प्राथमिक काळांत त्यांचें मन ज्या तीन व्यक्तींकडे आकर्षिलें गेलें होतें, त्यापैकी एक म्हणजे ज्यांची यवतमाळजवळ, पिंपळगावच्या वाटेवर सध्या कबर दिसत आहे ते रोहिले साधू. ते गोरे, सडपातळ, उंचेपुरे, माळेप्रमाणे उपरणे पेहेरलेले, गळ्यांत दोरीने, लाकडी अलगुजें अडकवून तीं नाकाने वाजवीत असलेले लोकांना दिसत. ते मुसलमान जातीचे असूनसुद्धा त्यांच्या शिष्यसमुदायांत हिंदूंचा भरणा असे. मुसलमानांना आशीर्वाद देण्यांत त्यांचा हात जितका उत्सुक तितकाच हिंदूंच्याहि बाबतींत असे. त्यांची शिकवणूक कबीराच्या धर्तीची असे. कबीराचा अंत्यविधी करण्याबद्दल हिंदु-

मुसलमानांत जशी चुरस माजली व आपापल्या धर्मातील अंत्यविधीस अनुसरून जशी प्रत्येकाने त्याच्या शवाची व्यवस्था लावली त्याचप्रमाणे उपरोक्त साधूच्याहि प्रकरणांत झालें. मुसलमानांनी त्याच्या शवावर कबर बांधली तर हिंदूंनी प्रेमळ भावांनी तीवर फुलें वाहिलीं. कबीराप्रमाणेच असलेल्या त्यांच्या कृतीचा अप्रत्यक्ष परिणाम यशवंतच्या मनावर झाला असण्याचा संभव आहे.

दुसरी व्यक्ति म्हणजे उनकेश्वरचे ब्रम्हचारी बुवा. हे महाराज राजकुलोत्पन्न असे दिसत. त्यांची धुनी अद्यापिहि पापळला जतन करून ठेवलेली आहे. त्यांनी तेथे महादेवाचा सभामंडप बांधला. पुढे जातिप्रकरण उपस्थित होऊन महाराज उनकेश्वरला निघून गेले. त्यांची समाधि सध्या पूर्णेच्या काठीं आहे. यांचें एकप्रकारचें सात्विक जीवन यशवंताने न्याहाळिलें व त्याच्या मनावर कांही विशिष्ट संस्कार होत राहिले.

तिसरे परदेशी सत्पुरुष म्हणजे धनज येथलि वाटेवरील वडाच्या झाडाखाली ध्यानस्थ बसलेले एक तपस्वी असत. गावांत एकदा कॉलऱ्याची भयंकर साथ येऊन गावकरी पटापट मृत्युमुखीं पडूं लागले. साथीचा नायनाट कशानेच होईना. बाबांनी-वरील सत्पुरुषाने-एक दिवस सांगितलें "साथ निघून जाईल!" बाबाजींच्या किमयेने म्हणा किंवा काकतालीय न्यायाने म्हणा तीन चार दिवसांतच साथ कमी पडूं लागली. हिंदूंच्या मूळच्याच भाविक मनाला बाबाचा तो 'प्रसादच' वाटला! त्यांची गाय पूर्वी ज्यांच्या शेतांत मोकाट सुटली होती व जे लोक त्यांना मारण्याची संधि पहात होते तेहि आता त्यांना शरण जाऊं लागले. गावांत व खुद्द यशवंतच्या घरीं बाबाजीचा निरिच्छपणा, लोककल्याणाकरतां झिजण्याची प्रवृत्ति, परमत-परधर्म-सहिष्णुता, सक्रीय भूतदया इ० गुणाबद्दल बरीच चर्चा होई. त्यांच्या मनांत बाबाजीबद्दल एक प्रकारचें कुतूहल उत्पन्न झालें होतें. बाबाजी एक मध्यम उंचीचा घोडा जवळ बाळगीत व त्याचा लगाम एका लहान पोऱ्याच्या हातीं देऊन तो जिकडे त्या घोड्याला घेऊन जाई तिकडे जात. यशवंत त्यांच्या मूर्तीकडे अतृप्त नेत्रांनी पाहात राही. बाबाजीचा एक विशेष म्हणजे निराश्रित गुरांची ते चारा पाणी घालून फार

कसोशीने जोपासना करीत. त्यांनी त्यांच्या अंगावर हात फिरविला म्हणजे त्यावर रोमांच उभे राहून त्यांना स्वर्ग सौख्य उणे वाटत असावें असें दिसें. रोडावलेल्या व मरणोन्मुख जनावरांची सुद्धा काळजी घेणाऱ्या सत्पुरुषाला खटेश्वर महाराज व संक्षिप्त अशी 'खट्याबुवा' ही सार्थ पदवी जनतेने अर्पण केली होती. १९१३-१४ चे सुमारास बाबाजीचीं सर्व गुरें कोणी कोंडवाड्यांत कोंडलीं होतीं. डॉ. देशपांडे तालुका बोर्डाचे अध्यक्ष असतांना वरील प्रकरण चौकशीकरता त्यांच्यासमोर आलें होतें. त्यांनी स्वतः पैसे भरून तीं गुरें सोडून दिलीं. सध्या जोडमोहाला या साधूची समाधी असून तेथे दरवर्षी यात्रा भरून बरेंच अन्नदान होतें.

सात्विक विचारांकडे त्यांची मनोवृत्ति जशी बाहेरून घडणाऱ्या घटनांनी होत होती त्याचप्रमाणे खुद्द त्यांच्या गृहामधूनही त्यांना तीच प्रेरणा होत गेली. तात्यांचा आणि जानकीबाईचा कार्यक्रम अगदी बाळबोध वळणाचा होता. तात्या सकाळींच उठून प्रातर्विधी आटोपल्यावर प्रातःस्नान करीत व नंतर बराच वेळ देवपूजा चाले. ते गुरुचरित्राचा अध्याय दररोज नियमाने वाचीत व नंतर वैश्वदेव नैवेद्य करून भोजनास बसत. दुपारचें ऑफिसचें काम वगैरे आटोपल्यानंतर सायंकाळीं नित्य नियमाने ते बालाजी, मारोती, इत्यादिकांचें देवळांत जाऊन दर्शन घेत. दर शुक्रवारीं, त्यांचें कुलदैवत बालाजीनिमित्य ते निशिभार्गव (सायकाळपर्यंत उपोषण व नंतर पूजा नैवेद्य वगैरे) करीत व नंतर पंचपदी वगैरे करून झोपत. त्याचप्रमाणे दरदिवशीं व विशेषतः शनिवारीं शनीमहात्म्य वाचीत. गावांत कोणीही अतिथी अभ्यागत येवो त्यास जेवावयास बोलावल्याशिवाय राहात नसत.

त्यांची आई तर या पेक्षाही भाविक असे. मुलांना बरें वगैरे वाटलें नाही तर मीठ मोहऱ्या, मिरची विस्तवावर टाकून त्यांची दृष्ट काढणें, देवाचा अंगारा वगैरे लावणें हे प्रकार सर्वसाधारण आयांप्रमाणे करण्याची तिची रीत असे. पण त्या बरोबरच तिला आडगावच्या खाकी बुवांची 'नेत' असे. मामुली दुखण्यापासून तों तहत जीवावरच्या दुखण्यापर्यंत आडगावच्या बुवाचा अंगारा त्यांच्या आईच्या मतें रोगांचा परिहार करण्यास रामबाणासारखा समर्थ असे! धनजवरून आडगाव चार पांच कोस आहे. सर्व मुलांना बैल

गाडींत घालून बुवाकडे जाण्याचा तिचा परिपाठ असे. खाकी बुवा गलेफ (एक प्रकारचें रेशमी वस्त्र) टाकून, त्यावरील एका टोकाला ठेवलेल्या बाळकृष्णाच्या पितळी मूर्तीला, मोराच्या कुंचल्याने उदाचा धूप सारीत (वऱ्हाडांत ही चाल मुसलमानी काळापासून अस्तित्वांत आली) व मग खाकी बुवाच्या 'अंगांत येई'। त्याच स्थितींत ते त्यांच्या आईला म्हणत "माई तुमारा लडका अच्छा हो जायगा। ए ले अंगारा." हे साधू त्या काळी वऱ्हाडांत बरेच प्रसिद्ध असत. खाकी बुवाचे शिष्य शंकर बुवा देवमाळी व आंजती येथील मलकोजी महार यांनी आपापल्या गावीं खाकी बुवाचीं मंदिरें बांधलेलीं आहेत. त्यांच्या आईचे सोवळें ओवळें बरेंच कडक असे. वडीलांनी गुजराथी घरीं ठेवला असूनही त्याच्या हातचें पाणी तिला चालेना. स्टेशनवरील विहीरीचें गोडें पाणी तीन चार फर्लांगाहून ती स्वतः घेऊन येई.

## ए. व्ही. स्कूल

१८९३ मध्ये यशवंत मराठीची परिक्षा पास होऊन, पुढच्या वर्षी उमरावतीला ए. व्ही. स्कूलमध्ये दाखल झाला. त्याच वर्षी तात्या अर्धांगवायूने आजारी पडले व त्यांना धनजला परत यावें लागलें. तात्यांचे चुलतबंधु कृष्णराव हे उमरावतीला रेव्हिन्यू इन्स्पेक्टर होते त्यांच्याकडे राहण्याची यशवंतची सोय झाली. गणपती उत्सव तेव्हापासूनच सुरू झाला. बापू देवभानकर, रामराव बंधूजी चौबळ, गोविंदराव मार्टगावकरसहीत त्याने आपल्या शाळेंत गणपती उत्सवाचा ओनामा घातला व त्याला पुढे बरेच मोठें स्वरूप आलें. श्री. बाळकृष्ण गणेश बाळ असिस्टंट मास्तर असत. ते गणपती उत्सवांत पुढाकार घेत व मुलांना मधून मधून 'आउटिंग'ला घेऊन जात. त्यावेळीं यशवंतला आट्यापाट्या व फुटबॉल खेळण्याचा नाद होता. बालाजीच्या आखाड्यांत व तुकारामबोवाच्या व्यायामशाळेंत तो व्यायाम घेई. त्यावेळीं शामराव गुंड या नांवाचा विद्यार्थी होता. त्या दोघांनी मिळून एक फिरतें वाचनालय सुरू केलें होतें. त्याचे १५-२० सभासद असत. कादंबऱ्या व काव्येतिहासाची गोडी तेव्हापासूनच त्याला लागली. उमरावतीच्या 'नेटिव्ह जनरल लायब्ररी'चा तो सभासद होता. पुरवार्तास त्याने गणपती मेळ्याचीं कांही पद्यें करून ती 'नाटक्यांचे तारे' हें उत्कृष्ट विनोद प्रचुर पुस्तक लिहिणारे, त्याचे

त्यावेळचे शिक्षक श्री. पटवर्धन यांना दाखविलीं. व त्याबद्दल त्यांनी त्याला शाबासकी देऊन उत्तेजन दिलें. नववींत व दहावींत इंग्रजी, संस्कृत व गणितामध्ये प्राविण्य दाखविल्यामुळे त्याला पुस्तक रूपाने बक्षिसें मिळालीं होतीं.

## हायस्कूल

ए. व्ही. स्कूलची सीमा ओलांडून १८९८ सालीं त्याचा हायस्कूलमध्ये प्रवेश झाला. आता त्याला यशवंत या नांवाने न संबोधतां यशवंतराव या नांवाने उल्लेख करणें योग्य होईल. त्यावेळीं राजकीय व्याख्यानांचें सत्र सार्वत्रिक सुरू होतें. सर सी. शंकरन् नायर, उमेशचंद्र बॅनर्जी, महादेव गोविंद रानडे, ॲनिबेझांट, पंजाबांतील स्वामी हंसस्वरूप इत्यादी देशभक्तांचीं व्याख्यानें संस्मरणीय होतीं. त्याचप्रमाणे विदर्भांतही दादासाहेब खापर्डे, वीर वामनराव जोशी, बापूजी अणे, शामरावदादा देशपांडे, पन्नालाल व्यास इत्यादिकांच्या रसाळ व पल्लेदार व्याख्यानांची झोड उठत होती. श्री. दादासाहेब खापर्डे यांच्या आश्रयाखाली वक्तृत्वोतेजक सभा स्थापन झाली होती. तींत इतर कांही महत्वाच्या विषयावरील खास व्याख्यानें करविलीं जात असत. हीं व्याख्यानें ऐकण्याचा यशवंतरावास नाद लागला व त्याने व्याख्यानें ऐकण्याची संधी गमावली नाही. त्यामुळे त्याच्या ज्ञानांत थोडी थोडी भर पडत होती. त्याच प्रमाणे चाफेकर हरदास, भालचंद्रबुवा (देवनाथाच्या गादीवर असलेले) कृष्णा पातुरकर यांचीं सोमेश्वराच्या वगैरे मंदीरांत रसाळ व सुश्राव्य कीर्तनें होत. तींहि त्याने आस्थापूर्वक ऐकिलीं. वाचनाने, व्याख्यानांनी, कीर्तनांनी त्यांच्या वाङ्मयरूप बीजावर जलसेक होऊन तो अंकुरित व्हावयास मदत झाली. सध्या कीर्तनसंस्था नामशेष झालेली असल्यामुळे बहुजन समाजाच्या सुलभ ज्ञानार्जनाचा एक मार्ग खुंटलेला आहे.

हायस्कूलमधील त्यांच्या मित्रमंडळींत रावबहादुर खरे, ॲडव्होकेट, अमरावती, श्री. त्रिंबक राजाराम पिंगळे वकील मोर्शी, श्री. दादासाहेब सोमण, मेहेकर इ. मंडळी होती. पण या सर्वांपेक्षा जास्त निकटचे व जिव्हाळ्याचे स्नेही म्हणजे ज्ञानकोशकर्ते कै० श्रीधर व्यंकटेश केतकर व प्रसिद्ध कादंबरीकर्ते श्री. बाळकृष्ण संतुराम गडकरी हे असत. या त्रिकुटाची मैत्री हायस्कूलच्या आयुष्यांत जशी गाजली तशीच वाङ्मयप्रांतांतही अढळ

होऊन राहिली. क. डॉ. केतकर व डा. देशपांडे यांचा प्रथम परिचय विद्यार्थ्यांच्या वृत्तीस अनुसरून, क्रीडांगणावर न होता 'नेटिव्ह जनरल लायब्ररीच्या' वाङ्मयमंदिरांत झाला. त्यावेळीं उमरावती हायस्कूलमध्ये 'व्हर्न्याक्युलर स्कॉलरशिप' म्हणून एक चढाओढीची परीक्षा असे. या परीक्षेंत त्या विषयांतील इतर प्रश्नाबरोबरच कविता रचण्यासंबंधी प्रश्न येत. पहिला व दुसरा नंबर आलेल्या यशस्वी विद्यार्थ्याला दहा रुपयाची शिष्यवृत्ति मिळत असे व शिवाय फीहि माफ होई. एक वर्षी परीक्षक कै. विष्णु मोरेश्वर महाजनी होते. त्या वर्षीच्या परीक्षेतील प्रश्नपत्रिकेंत 'आपण चांदण्या रात्रीं उघड्यावर बसलों आहोंत अशी कल्पना करून जे विचार सुचतील ते पद्यांत द्या' असा एक प्रश्न होता व दुसरा विषय 'दुष्काळांतील शेतकऱ्याची विपन्नावस्था' हाहि पद्यांत रचण्याकरता दिला होता. डॉ. केतकर व देशपांडे हे दोघेही त्या परीक्षेला बसले होते व दोघांनाही कविता करण्याचा नाद असल्यामुळे त्यांचीं वर्णनें चांगलीं उतरलीं. पेपर संपल्यावर विद्यार्थी बाहेर येऊन त्यांनी आपापल्या कविता गायनाचा (!) कार्यक्रम तेथेच उरकून घेतला. एकाने 'अरे मी अशी कविता लिहिली' असे म्हणून हातवारे करीत ती आपल्या भसाड्या आवाजांत म्हणून दाखवावी व नंतर दुसऱ्याने सुरवात करावी असा 'फार्स' सुरू झाला. कांही जणांची म्हणण्याची विचित्र पद्धति पाहून ऐकणारांची हसून हसून मुरकुंडी वळली! विद्यार्थ्यांची कल्पनाशक्ति प्रखर करणारी, निसर्गाकडे सौंदर्यात्मक नवीन दृष्टीने पाहावयास लावणारी, व काव्यवाङ्मयाच्या बाबतींत प्रोत्साहन देणारी अशा तऱ्हेची प्रश्न विचारण्याची त्यावेळच्या परिक्षांतील पद्धति चांगली नव्हती असें कोण म्हणेल? त्या परीक्षेंत डॉ. केतकरांचा पहिला नंबर आला व डॉ. देशपांडे यांचा दुसरा आला व दोघांनाही त्या वर्षीची शिष्यवृत्ति मिळाली. दोघेही आता हायस्कूलमध्ये मराठीचे 'स्कॉलर्स' म्हणून ओळखल्या जाऊं लागले व दोघांच्याही परिचयाचें रूपांतर निकट व जिव्हाळ्याच्या मैत्रींत झालें. आणि या मिळालेल्या आर्थिक प्रोत्साहनाने व विशेषतः भेटलेल्या कीर्तीने त्यांना पुढील आयुष्यांतील भरदार वाङ्मयसेवा करण्याची चांगलीच चालना मिळाली.

मागे उल्लेख केलेलें गणेश पद्यावली हें त्यांचें पुस्तक प्रकाशित करण्यांत डॉ. केतकर यांनीच पुढाकार घेतला. काव्याचा किंवा इतर कोणत्याही प्रथम प्रकाशनाचा अनिर्वचनीय आनंद काय असतो हें कल्पनेनेहि जाणणें अशक्य! पहिलें फूल, पहिलें मूल–पहिलें सर्वकांही!–ब्रम्हानंदाने भरलेलें असतें! पहिल्याची गोडी दुसऱ्यांत नाही! पहिलें पुस्तक प्रकाशित होण्यापूर्वी, लेखकाच्या किती तरी रात्रीं आलोचन जागरणांत जातात! आपण ग्रंथकार होणार, बड्या साहित्यिकांच्या पंक्तींत बसणार, रस्त्याने जातांना रसिक लोक कौतुकाने आपल्याकडे आदराचा अंगुली-निर्देश करून 'अरे पहा त्या तमुक ग्रंथाचे कर्ते' असे म्हणत आहेत; आपले चहाते आपल्याला मुद्दाम भेटण्याकरिता, किंवा मुलाखत घेण्याकरता आपले घरीं येत आहेत इत्यादि सुखस्वप्नांमुळे उत्पन्न झालेली एक प्रकारची गोड उन्मादकता लेखकाच्या मनोवृत्तीवर पसरलेली असते! छापखान्याकडे पत्रव्यवहार करणें, पदांची निवड करणें, प्रुफें तपासणें इत्यादि रुक्ष वाटणाऱ्या कामांसहि नवोदित लेखक त्याच अदम्य उत्साहाने सपासप हातावेगळे करीत असतो. पुस्तक प्रकाशित झाल्यावर त्याच्या 'सप्रेम भेटी'ची, हा बालग्रंथकार आपल्या मित्रमंडळींत खैरात करीत असतो! त्या आनंदाची मजा काही 'और' आहे! निरनिराळया मासिकांकडे अभिप्रायार्थ प्रती पाठविण्यांत तो चालढकल करीत नाही. अभिप्राय आल्यानंतर ते वाचण्यांत तो 'मश्गुल' होऊन जातो. आपल्या ग्रंथाचीं पारायणावरील पारायणें त्याच्या मनांत त्याविषयी अरुची उत्पन्न करीत नाही. जगांतील यच्चयावत् ग्रंथ आपल्या चिमुकल्या ग्रंथासमोर त्याला तुच्छ वाटत असतात!

गणेश पद्यावलीची हस्तलिखित प्रत अजूनहि देशपांडे यांनी जपून ठेवली आहे. तिचें हस्ताक्षर फार वळणदार आहे. काव्यांत कल्पना विशेष नसल्या, तरी केवळ १४ वर्षे वयाच्या मुलाने एवढी रेखीव व शुद्ध भाषा लिहावी याचें कौतुक वाटतें. या लहानशा गोष्टींतून त्याच्या उत्तर वयांतील असामान्यतेचीं बीजें दृग्गोचर झाल्यावाचून राहत नाहीत. या पद्यावलीचे विशेष म्हणजे त्या कालीं प्रचलित असलेल्या चालीबरोबरच काफी वगैरे सारखे राग, बँडच्या व इतरहि नव्या चाली हाताळलेल्या आहेत. 'गणेशजन्मकथन' हें ७४ ओळींचें काव्य खंडकाव्याच्या धर्तीचें भासतें.

डॉ. केतकरांनी 'ज्ञानप्रकाश,' 'देशसेवक' इत्यादि छापखान्यांकडे पत्रव्यवहार करून भाव मागितले व शेवटी उमरावतीचे 'अल्बियन' छापखान्यांत छापावयाचें काम देऊन, प्रथमपासून शेवटपर्यंत पुस्तकाचें सर्व आन्हिक उरकलें. एका लेखांत देशपांडे यांनी खालील मजकूर लिहून ठेवलेला आहे. "हें गणेश पद्यावली पुस्तक म्हणजे माझ्या मराठी भाषेच्या, आजच्या अल्पस्वल्प सेवेचा, बालवयांतील प्रारंभ होय. ज्ञानकोशासारखा राष्ट्रीय स्वरूपाचा प्रचंड ग्रंथ निर्माण करावयास लागणारें सामर्थ्य डॉ. केतकरांच्या अंगीं यावयास, त्यांना जे अनुभवाचे धडे घ्यावे लागले, त्याचा प्रथम धडा या छोट्या पुस्तकाच्या प्रकाशनांत आहे, हें मी साभिमानाने नमूद करून ठेवतों." गणेश पद्यावलीच्या प्रकाशनाच्या वेळचा निर्व्याज आनंद हा माझ्या आयुष्यांतील पहिला संस्मरणीय आनंद होय! असे देशपांडे म्हणत असतात. त्यावेळीं त्यांच्या मानसभूमींत रुजलेला काव्याचा अंकुर, त्यांनी आपल्या आयुष्याचें तें पुढे ध्येयच न ठेवल्यामुळे वाढीस लागला नाही. इतिहास संशोधनाच्या अंकुरालाच, योग्य तें वातावरण त्याच्या मानसभूमींत मिळून त्याचाच पुढे विशाल वृक्ष बनला. डॉ. केतकर यांनीहि त्यावेळीं कविता केल्या होत्या. आपल्या बालमैत्रिणीवर लिहिलेल्या कविता त्यांनी अमेरिकेंतील वसंतकाल या शिर्षकाखाली पुढे प्रकाशितहि केल्या. वर्धेच्या व पूर्णेच्या काठचे ऋषि या विषयावरीलहि त्यांचें काव्य प्रसिद्ध आहे पण त्यांचे मित्र देशपांडे यांच्याप्रमाणेच त्यांनी काव्यप्रांतांतून निघून आपला मोर्चा समाज-संशोधन-इतिहास व तत्सदृश विषयाकडेच वळविला.

त्याच काळांत शाहूनगरवासी नाटक मंडळीचीं गद्य नाटकें आणि नाट्यकला व पटणकर मंडळीचीं संगीत नाटकें पाहण्यास ही मित्रमंडळी जात असत. तीं पाहून डॉ. देशपांडे यांनाहि कांही नाटकें लिहिण्याची स्फूर्ति झाली. त्यांनी 'पेरोक्लीज' नाटकाचें, एक भाषांतर व 'भारतभूछल' हें एक स्वतंत्र नाटक लिहिलें होतें. त्याचप्रमाणे 'सत्यप्रभा' हें एक संगीत नाटकहि लिहिलें होतें. त्यावर श्री. माधवराव पाटणकर–पाटणकर नाटक कंपनीचे मालक–यांचा अनुकूल अभिप्राय मिळाला होता. डॉ. केतकर यांनी त्यांच्या नाटकासंबंधी

आपल्या एका लेखांत * एका मनोरंजक आठवण दिली ती उधृत करण्यासारखी आहे. ती अशीः "त्या वेळचे दुसरे वाङ्मयसेवक म्हटले म्हणजे श्री. यशवंत खुशाल देशपांडे हे होत. हायस्कूलांत असतांना ते नाटककार म्हणून प्रसिद्ध होते. त्यांच्या त्यावेळच्या नाटकांतलें एक पद मला आठवतें तें असें.

पहिलाः— तलवार ठेउनी **कंठप्रदेशीं**
तुजलागी वधतों
मम भूपमत्ता पूर्ण कराया
ऐसा मी झटतों.

दुसराः— पापी या न ये दया । **मद्हृदया**
मारुनिया
नरकास जावया मार्ग असा हा
सिद्धच तूं करतो

कांही वर्षांपूर्वी यशवंतराव देशपांडे यांच्याकडे मी पाहुणा होतों. तेव्हा त्यांना या पदाची मी आठवण दिली, त्यावेळेस त्यांनी माझ्या स्मरणशक्तीची तारीफ केली. आणि स्तुति कोणाला नको आहे.? मी देखील ती तारीफ बिन-बोभाट स्वीकारली. 'कंठप्रदेशीं शत्रूने तलवार लावली असतां, मृत्यूविषय झालेला मनुष्य आपलें हृदय मारलें जात आहे अशी तक्रार करतो' हा पद्याचा अर्थ लक्षांत येऊन मला मोठी मौज वाटली व त्या पद्याबद्दल मी पूर्वी टीका केलेली होती. आणि देशपांड्याची चेष्टा करण्यास साधली म्हणून तें पद मला आठवत होतें. पण तें देशपांड्याच्या लक्षांत आलें नाही. तें पद मला आठविण्याचें कारण देशपांड्यांना कळतें तर त्यांनी माझ्या स्मरणशक्तीचें अभिनंदन केलें असतें असें मला वाटत नाही"! हें पद आठवण्याचे डॉ. केतकरांनी कारण दिलें तें खरें असेल. पण त्यानंतर सुद्धा (म्हणजे हायस्कूलमधील काळाच्या ३५ वर्षांनंतर!) त्यांनी त्याच नाटकांतील सात आठ पदें संपूर्ण म्हणून दाखविलीं होतीं, यावरून डॉ. केतकरांची स्मरणशक्ति असामान्य होती असें दिसून येतें.

* प्रतिभा—सप्टेंबर १९३३

मॅट्रिकच्या वर्गांत असतांना डॉ. देशपांडे यांचा विवाह वासुदेव आष्टीकर, मोर्शी यांच्या कन्या सौ. गोदुबाई यांच्याशीं झाला.

## विश्वविद्यालय

१९०० मध्ये मॅट्रिकची परिक्षा उत्तीर्ण होऊन डॉ. केनकर अगोदरच मुंबईच्या वुइलसन् कॉलेजमध्ये प्रविष्ट झाले होते व देशपांड्यांचे जुने स्नेही बापूसाहेब डोकस हेहि शिक्षणाकरता तेथे गेले होते. त्यामुळे, पुढच्या सालीं यशवंतराव मॅट्रिकची परिक्षा पास झाल्यानंतर त्यांनीहि त्याच कॉलजमध्ये जाण्याचें निश्चित केलें. १९०२ च्या जानेवारी महिन्यांत, ते मुंबईला दाखल झाले. शनिवार असल्यामुळे कॉलेज सकाळचेंच होतें. तरीही डॉ. केनकर स्वतःच्या खोलींत, 'कॉटवर' रेलून कपलेसें पुस्तक वाचत बसले होते. वऱ्हाड हायस्कूलमधून यशवंतरावांचा दुसरा नंबर येऊन त्यांना 'बेरार स्कालरशिप' मिळाल्याबद्दल केनकरांनी प्रथम दर्शनींच त्यांचें अभिनंदन केलें. 'सकाळचे कॉलेज असता आपण वर्ग का चुकविलात'? अशी पृच्छा यशवंतरावांनी करताच ते हसून म्हणाले, "अहो, या प्रोफेसरांचें चऱ्हाट कोण ऐकतो? कॉटवर आरामशीर रेलून, यावेळेला एकादा उत्कृट ग्रंथ वाचणें किती मजेचें, असतें म्हणता!"

हायस्कूलच्या थोड्याशा करड्या व जरबेच्या चाकोरींतून महाविद्यालयाच्या मोकळया वातावरणांत विद्यार्थी गेला म्हणजे त्याच्या वागणूकींत सहजच थोडासा स्वच्छंदपणा येऊं लागतो. आपल्याला न आवडणाऱ्या विषयाच्या तासाला 'बुट्टी' देण्याची त्याला इच्छा होते! एक विद्यार्थी गैरहजर राहून दुसरा त्याची बिनधोक हजेरी देतो, किंवा हजेरी बुकावर त्याची सही करतो! मुंबई विश्वविद्यालयाच्या महाविद्यालयांत तीन तीन महिने विद्यार्थी आपल्या स्वतःच्या गावाला जाऊन कॉलेजमधेही हजर राहिल्याचीं उदाहरणें आहेत. एकदा असाच पटावर नियमाने हजर राहिलेला विद्यार्थी सहा महिन्यापूर्वीच स्वर्गवासी झाल्याचें मागाहून कळून आलें होतें! हायस्कूलमध्ये विद्यार्थ्यांची वात्रटपणाची प्रवृत्ति कुठे कुठे दिसून येतेच, पण महाविद्यालयीन शिक्षणक्रमांत त्याच्या पोरकटपणाला जास्तच ऊत येतो. नवीन प्राध्यापक आले की त्यांच्याकडे मिष्किलपणाने पाहून हसणें, त्याची पाठ फळयाकडे फिरतांच विचित्र बेसूर

बदसूर काढणें, मध्येच विद्यार्थिनीसंबंधी उल्लेख आला असतां जोराचें 'स्टँपिंग' करणें, काव्यांत शृंगारिक वर्णन आलें असतां प्राध्यापक मजकूरांना त्याची पुनः पुन्हा फोड करावयास सांगून आपल्या पराकाष्टेच्या रसिकवृत्तीं(!)चे प्रदर्शन करणें, किंवा 'मंचर' बनून कॉलेजकन्यकांच्या पुढे गोंडा घालणें इत्यादि कार्यक्रम, आपापल्या मगदुराप्रमाणे प्रायः बहुतेक विद्यार्थी करीत असतात. अर्थात कांही विद्यार्थी वरील प्रकारचे 'फुलपाखरी चाळे' करून आपल्या ध्येयाकडे दुर्लक्ष करीत असले तरी, अभ्यासू व जबाबदार वृत्तीचे डॉ. केतकर देशपांड्यांसारखे विद्यार्थी वरील सारख्या प्रकारांत क्वचित् भाग घेऊनहि, आपल्या ध्येयाविषयीं नेहमीच जागरूक असतात, इतकेच नव्हे तर महाविद्यालयीन जीवनांत, वाचनालयांचा होता होईल तितका उपयोग करून घेण्यास चुकत नाहीत.

विल्सन कॉलेजांत डॉ. केतकर यांचेबरोबर, यशवंतराव यांच्या मित्र-मंडळींत, डॉ. गुणे, सॉलिसिटर व पुढे मुंबई इलाख्याचे पंतप्रधान श्री. बा. गं. खेर व महामहोपाध्याय पां. वा. काणे ही विद्यार्थी मंडळी असत. डॉ. गुणे हे एक वर्ष 'सीनीयर' असून श्री. खेर हे एक वर्ष 'ज्युनियर' होते. याशिवाय श्री. साठे, श्री. मर्डेकर, श्री. डोक्रस इ० विद्यार्थी मंडळी होती. डॉ. भडकमकरांडे सर्वांनी मिळून श्रावणीस जाण्यापासून तो तहत कॉलेजमधील बहुतेक व्यवसाय ते एकमेकांचे सहवासांत करीत. त्यावेळेंचे, कॉलेजमधील सुद्धा विद्यार्थी मखमलीच्या व जरीच्या वेलबुट्ट्या काढलेल्या टोप्या वापरीत! अशा टोप्या आता लहान मुलांना देखील शोभणार नाहीत! तेथे महाराष्ट्र मंडळीचा क्लब होता, त्यांत फक्त तेरा रुपयांत उत्तम प्रकारचें जेवण वगैरे मिळे. इंग्रजीकरतां डॉ. स्कॉट म्हणून प्रोफेसर होते. फिजिक्स डॉ. मॉकिगन शिकवीत! संस्कृत डॉ. भडकमकर यांचे वडील प्रो० हरिभाऊ भडकमकर शिकवीत. तेथे मराठी ग्रंथसंग्रहाचे, डॉ. केतकर व यशवंतराव सभासद झाले. एकाद्या वक्त्याचें कॉलेजमध्ये भाषण झालें, किंवा एकाद्या वादग्रस्त मुद्याची वर्गात चर्चा झाली म्हणजे त्यावर, ही सर्व मित्र मंडळी सायंकाळीं डॉ. केतकरांच्या खोलींत जमून साधकबाधक चर्चा करीत व डॉ. केतकर कांहीतरी विक्षिप्त व नवीन

विचार सुचवीत. डॉ. केतकरांना त्यांनी 'मॅडकॅप' ही पदवी बहाल केली होती! प्रचलित आणि सर्वमान्य असलेल्या सिद्धांताविरुद्ध नवीन सिद्धांत मांडून, त्याचें समर्थन करण्याची डॉ. केतकरांची कुशाग्र बुद्धि त्या काळींहि दिसून आल्याशिवाय राहात नसे. 'अकबर हा लुच्चा असून औरंगजेब प्रामाणिक होता' अशाप्रकारचीं कितीतरी विधानें ऐकणाराला चमत्कारीक वाटत. वाङ्मयांत तर राहोच, पण साध्या व्यवहारांत देखील उलट्या पद्धतीने मार्ग चोखाळण्याची त्यांची प्रवृत्ति दिसून येई.*

त्यावेळीं प्रार्थना समाजामध्ये, डॉ. भांडारकर, जस्टिस चंदावरकर, व बिलायतेमधून नुकतेच आलेले विठ्ठल रामजी शिंदे यांचीं व्याख्यानें होत. डॉ. भांडारकर यांचीं, पायामध्ये चाळ वगैरे घालून कीर्तनें होत व प्रार्थना आठ दिवसांनी होई. वरील कार्यक्रमाला यशवंतराव न चुकता उपस्थित असत. याशिवाय ब्राम्हणसभेमध्ये राजवाडे व इतर विद्वानांची छंदशास्त्र, भाषाशास्त्र, संशोधन शास्त्र इत्यादिवरीलहि चर्चा त्यांना ऐकावयास मिळे. पहिल्या प्रकारच्या व्याख्यानांनी त्यांच्या सात्विक वृत्ति जशा जोपासल्या गेल्या, त्याचप्रमाणे दुसऱ्या प्रकारच्या व्याख्यानांनी त्यांच्या भाषाविषयक ज्ञानांत भर पडून त्याबद्दल त्यांना अधिकाधिक गोडी उत्पन्न होत गेली. श्री. द्वारकानाथ वैद्य यांनी एक 'सुबोध पत्रिका' काढली असून ते प्रार्थना समाजाच्या वाचनाचे कार्यवाह असत. त्यांतील पुस्तकें ते त्यांना विनामूल्य वाचावयास देत.

* एकदा डॉ. केतकर, डॉ. देशपांडे याच्याकडे आले असतां ते व इतर कांही मंडळी विहिरींत पोहावयास गेली. पोहणें संपल्यानंतर विहिरींतून निघतांना ते भिंतीकडे पाठ करून व दोर धरून, वर यावयास लागले. इतरांनी त्यांना सांगितलें की, विहिरीच्या कंगोऱ्यांवर पाय ठेऊन व भिंतीकडे तोंड करून वर या. पण ते ऐकेनात. 'मी असाच वर चढणार' असे म्हणून त्यांनी वर यावयाचा प्रयत्न केला. यामुळे ते एकदोन हात वर येत व पुन्हा खाली घसरत. त्यांच्या पाठीची व हातांची सालटी निघण्याच्या बेतांत आली तरी ते आपला हेका सोडीनात! शेवटीं तेथे जमलेल्या मंडळींनी त्याना जबरदस्तीने मोटेंत घालून वर काढलें!!

राजवाड्यांचे सरस्वती, शाहू छत्रपतीच्या आश्रयाखालील, ग्रंथमाला, काव्येतिहास संग्रह, व प्रभात हीं त्यावेळचीं नियमकालिकें ते आस्थेने वाचत. राजवाड्यांचें शिलालेखावरील लिखाण तर ते फार आस्थापूर्वक अभ्यासत. त्यावेळीं डॉ. केतकर हे 'महाराष्ट्र वाग्विलास' नांवाचें मासिक चालवीत. पुढे ते अमेरिकेला गेल्या नंतर त्याचें काम श्री. बाळकृष्ण संतुराम गडकरी यांनी स्वतःकडे घेतलें. एम्. ए. झाल्यानंतर यशवंतरावांनी लिहिलेली 'माझी शांती' ही कादंबरी, या मासिकांत संपूर्ण प्रकाशित होऊन, वार्षिक भेट म्हणून मासिकांच्या सभासदांना देण्यांत आली होती.

यावरून ज्ञानाचा जो जो म्हणून मार्ग मोकळा होता, तो तो आक्रमण करून डॉ. देशपांडे यांनी आपल्या, पुढील वाङ्मयीन आयुष्यक्रमाचा भरभक्कम पाया आगोदरच कसा घालून ठेवला होता हें लक्षांत येतें.

बी. ए. मध्ये असतांना यशवंतरावांना 'होळकरांची थैली' हें एक ऐतिहासिक, बखरी वजा पुस्तक खडी धामणी येथील, कुळकर्ण्यांच्या घरांतील दप्तरांत मिळालें. राजवाड्यांनी हें आपल्या इतिहास साधनांच्या तिसऱ्या खंडामध्ये प्रकाशित केलेलें आहे. पण ते त्यांना अपूर्णच मिळालें होतें. यशवंतराव यांना तें पुस्तक पूर्ण मिळाल्यामुळे, आपणही राजवाड्यांसारखे संशोधन कार्य करावें ही महत्वाकांक्षा त्यांच्या मनांत उद्भूत झाली. वरलि ग्रंथानंतर वामन कवींचीही एक महत्वाची पोथी त्यांना मिळाली. संशोधनाचा म्हणण्यासारखा प्रयत्न आपल्या प्रांतांत कोणीच केला नसल्या कारणाने, त्या कार्यात बराच वाव आहे असे त्यांच्या मनाने घेतलें व अशातऱ्हेने संशोधन क्षेत्रांत त्यांनी पदार्पण केलें.

डॉ. गुणे पुढे जर्मनीला जाऊन पी एच्. डी. झाले. एम्. ए. ला असतांना त्यांचा दोन वर्षाचा अभ्यास झाला होता. त्यामुळे डॉ. गुण्यांच्या अभ्यासाचा यशवंतराव यांना बराच फायदा मिळाला कारण त्यावेळीं एम्. ए. करता निराळे वर्ग नव्हते.

'माझी शांती' हें पुस्तक प्रकाशित झाल्यानंतर बाळासाहेब खेर यांच्या वडिलाकडे यशवंतराव गेले असतानां खेर म्हणाले "तुमची 'माझी शांती'

ही कादंबरी मी वाचली आहे. तरी पण अशा प्रणयप्रधान कादंबऱ्या लिहिण्या-पेक्षा कांही भारदस्त विषयावर लिहाल तर देशाला जास्त फायदा होईल. तुमच्या लिहिण्यांत सामर्थ्य आहे." 'माझी शांता' ही प्रणयप्रधान कादंबरी असली तरी अभिरुचीस बाधक असें तींत कांही नव्हतें. तरी पण खेरांचा विचार त्यांना मननीय वाटला यांत शंका नाही.

एम्. ए. नंतर एल् एल्. बी. चा अभ्यास करण्यास त्यांनी सुरवात केली. त्यावर्षी त्यांनी कांही दिवस 'ओरिएंटल ट्रान्स्लेशन ऑफिस'मध्ये काम केलें. सेकंड एल एल्. बी. मध्ये ते असतांना, त्यांचे चुलते आजारी असल्यामुळे ते परीक्षेंत नापास झाले. वाचनाचा व वाङ्मयाचा इतका नाद लागला असूनहि या व्यतिरिक्त इतर परीक्षांत त्यांना कधीहि 'वन्स-मोअर' मिळाला नाही! त्यांचा नेहमी दुसरा वर्ग ठरलेला असे. *वाङ्मयाच्या नादापायीं परीक्षा डुबविलेल्या वाङ्मयसेवकाची कितीतरी उदाहरणें सापडतील. खुद्द डॉ. केतकरांच्याबद्दल यशवंतराव यांच्या १८९९ सालच्या रोजनिशीमध्ये खालील नोंद आहे. "या शिष्यवृत्तीमुळे केतकर याचा इतर ग्रंथ वाचण्याचा नाद इतका वाढला की, वर्गातील अभ्यासाकडे दुर्लक्ष्य होऊन पुढील सहामाही परीक्षेंत तो नापास झाला. यामुळे त्याचे दरमहा दोन रुपये कापले जाणार आहे!" या बाबतींत गणेश श्रीकृष्ण खापर्डे, हरी-भाऊ आपटे, दत्तात्रय बळवंत पारसनीस यांचीं उदाहरणें प्रसिद्धच आहेत.

यवतमाळला आल्यानंतर वकीली न करता 'प्राव्हिन्शिअल सर्व्हिस' मध्ये जावें असें त्यांचे चुलतबंधु कृष्णराव यांनी मत प्रदर्शित केलें. त्यांनी शिक्षणास सहाय्य केलें असल्यामुळे, त्यांना त्यांचें म्हणणें मोडवेना. म्हणून त्यांनी त्यांच्या समाधानाकरता अर्ज केले. यशवंतरावांना मिळालेलीं शिफारस-

* या बाबतींत कवि विनायकाचें फार मौजेचें उदाहरण सांगतां येईल. परीक्षेच्या दिवशीं विनायकाची कवि केशवसुत यांच्याशीं रस्त्यांत गाठ पडली व दोघेही बोलण्याच्या भरांत एवढे गुंग झाले की आज परीक्षा आहे याचीही विनायकास विस्मृति पडली. त्यामुळे त्याची परीक्षा हुकली व त्याने शिक्ष-णास कायमचा रामराम ठोकला!

पत्रें इतकीं चांगलीं होतीं की, तशा तऱ्हेची नोकरी त्यांना अगदी सहजासहजी मिळाली असती. विश्वविद्यालयांच्या पदवीधरांना तेव्हा चांगल्या नोकऱ्या मिळणें म्हणजे मामुली बाब होती. पण इतिहास संशोधनाच्या कार्याबद्दल त्यांना अगोदरच गोडी उत्पन्न झाल्यामुळे, त्यांच्या पुढील आयुष्याचें ध्येय जवळ जवळ निश्चित झाल्यासारखें होतें. त्यामुळे नोकरीकरता पुढील आवश्यक खटपट त्यांनी मुळीच केली नाही. वकीलीसारखा स्वतंत्र पेशा पत्करून शक्य तेवढी वाङ्मयसेवा करावी, असा त्यांनी अंतीम निर्णय घतला व १९०८ सालीं यवतमाळ 'बारमध्ये' प्रवेश केला. आता त्यांचा उल्लेख आपण डॉ. देशपांडे असा करूं.

त्यावेळीं 'बार' मध्ये अकरा वकील होते. रावबहादुर मुंडले; एल्. सी. बापट; कृ. ल. पेशवे इत्यादि सीनिअर वकील असून बापूजी अणे; ल. र. अभ्यंकर; भी. ह. जतकर; ह. के. भावे, इत्यादि ज्युनिअर वकील होते. त्यावेळीं वकीलीच्या धंद्याची अतिशय चलती होती. वकील म्हणजे 'ज्ञानाचा गड्डा' समजल्या जाई. लोकांचें कायद्याचें ज्ञान अत्यल्प असल्यामुळे 'लाल बुकांतील कायदा दाखविला तर पांचशे रुपये, काळ्या बुकांतील दाखवला तर तीनशे रुपये व पांढऱ्या बुकांतील दाखविला तर शंभर रुपये' या थाटांत फीचा करार करण्याची पद्धति पुष्कळ ठिकाणीं दिसून येई. क्षुल्लक हक्काकरता देखील "वकील साहेब! वाटेल ती फी घ्या पण हायकोर्टापर्यंत लढत करा. एक कोनटा ( शेताचा एक कोपरा ) पिकलाच नाही असें म्हणूं." अशी अशीलाकडून चुरशीची भाषा येई; त्यामुळे वकिलांना भांडणें भांडण्याची उमेद येऊन त्यांच्यावर पैशाचा पाऊस पडे. वकीली करून शिवाय राजकीय, सामाजिक, धार्मिक वगैरे सर्व चळवळींत वकिलांना प्रतिष्ठितपणे भाग घेतां येई. त्यामुळे वकीलीच्या धंद्यांत त्यांचा सुरवातीलाच चांगला जम बसला.

वकीली सुरू केल्यानंतर डॉ. देशपांडे यांनी जवळ जवळ पहिली पंधरा वर्षे संशोधन कार्याबरोबरच थोड्याबहुत प्रमाणांत सार्वजानिक चळवळींतहि घालविलीं.

सुरवातीच्याच वर्षी यवतमाळ येथे राष्ट्रीय शाळा सुरू झाली होती. श्री. धारप, कै. दत्तोपंत आपटे ( प्रसिद्ध इतिहास संशोधक ), पुणे येथलि अनाथ

विद्यार्थी गृहाचे केतकर इत्यादि नांवाजलेली मंडळी तींत होती. या संस्थेचे कार्यकारी मंडळांत डॉ. देशपांडे हे 'शरीक'* झाले! बापूजी अणे यांच्यावर सरकारविरुद्ध आरोप केल्याच्या आरोपावरून खटला भरला गेला त्यामध्ये देशपांडे हे एक बचावाचे साक्षीदार होते.

त्यानंतरच्या काळांत त्यांनी सरकारनिर्मित बँकेचे कार्यवाह, तालुका बोर्डाचे उपाध्यक्ष, जिल्हा बोर्डाचे हंगामी अध्यक्ष, इन्फ्लुएंझा कमिटीचे कार्यवाह, वर्णाश्रम धर्मशाखेचे अध्यक्ष इत्यादि नात्याने सार्वजनिक कामें केलीं. (कीर्तनें, प्रवचनें, व्याख्यानें इत्यादिकांच्या द्वारा धर्मविषयक, राष्ट्रोन्नतिकारक, ज्ञानप्रसाराचे प्रयत्न ही शाखा करीत आहे. जाती, पोटजाती, संप्रदाय इत्यादिमध्ये सहिष्णुबुद्धि व समभाव जागृत करण्याचेंही कार्य या संस्थेने केलेलें आहे.)

१९१० सालीं कै. नारायण स्वामी म्हणून एक 'थिऑसॉफिस्ट' येथे आले होते. त्यावेळीं त्यांची येथे त्या विषयावर तीन उत्कृष्ट व्याख्यानें झालीं. येथलि कांही मंडळींची त्यांच्याशीं या विषयाच्या तत्वांवर चर्चा होऊन येथे एक 'थिऑसाफिकल सोसायटी' स्थापन करण्यांत आली. तेव्हापासून पुढे बरीच वर्षे डॉ. देशपांडे हे या संस्थेचे सन्माननीय अध्यक्ष होते व श्री. बाबूराव भट हे कार्यवाह होते. या संस्थेतर्फे त्या विषयावरचे उत्कृष्ट ग्रंथ बोलविण्यांत आले होते व या संबंधींचीं उत्कृष्ट मासिकेंहि नियामितपणे घेण्यांत येत असत. अड्यारला झालेलें थिऑसॉफिकल फेडरेशन व थिऑसफीच्या अनेक प्रांतिक व इतर परिषदा यांना डॉ. देशपांडे उपस्थित असत. 'थिऑसफीच्या' अभ्यासामुळे आपली मूळची धार्मिक वृत्ति न सोडतां इतर विरुद्ध-धर्मतत्वामधूनहि जें जें तत्व चांगले दिसेल त्यापैकी काहींचा स्वीकार करून तीं आचरणात आणण्याचा यथाशक्ति प्रयत्न करावयाचा ही वृत्ति डॉ. देशपांडे यांच्या ठिकाणीं बाणत चालली आणि याचमुळे स्वतःचा वैदिक धर्म व त्याला अनुसरून असलेले इतर धर्म व पंथ आणि त्याला विरुद्ध असणारे धर्म व पंथ या दोहो संबंधीहि त्यांनी सारख्याच आस्थेचें ऐतिहासिक संशोधन केलेलें आहे! त्यांनी राजगृह, पावापुरी, शिरपूर, एलिचपूर, भांदक, पावागड येथील जैनांचे प्राचीन

* हा डॉ. देशपांडे यांचा फार आवडता शब्द आहे!

अवशेष अवलोकन करून त्यावर संशोधनपर लेख लिहिलेले आहेत. कारंजा, चांदुर, वाशीम, अलंगड इत्यादि कित्येक ठिकाणीं जैनमंदिरांत जैनांच्या तत्वज्ञानावर व्याख्यानें दिलीं. त्याचप्रमाणे वऱ्हाड मध्यप्रांतांत बुद्धाचे जे प्राचीन अवशेष आहेत, तेहि त्यांनी अवलोकिले व त्यावर लेखमालिका लिहिली. तसेंच उत्तरप्रदेश, बिहार, नालंदा, शरीफ, बुद्ध गया, राजगृह, सारनाथ इत्यादि बुद्धाच्या ठिकाणीं मुद्दाम प्रवास करून त्यासंबंधी 'मगध विहार' या शीर्षकाखाली विस्तृत वर्णनपर व महत्वाचे लेख लिहिलेले आहेत. महानुभावियांच्या पंथासंबंधी त्यांनी, 'चक्रधराचा वेद' इत्यादि विषयावर माहूर, रीथपूर, पेशावर, रावळपिंडी, हरिपूर इत्यादि ठिकाणच्या मंदिरांत चर्चा केली. इतकेंच काय पण इस्लाम धर्म व समाजामधील कित्येक ऐतिहासिक पर्शियन सनदा, परगण्याचे हिशोब व विशेषतः मोंगल इतिहासासंबंधी कागदपत्र, पुराणवस्तु नाणीं, इत्यादि मिळवून त्यासंबंधींहि लिखाण केलेलें आहे. यूरोपमध्ये ते गेले असतांना तेथील इस्लामी मशिदीचे पेशइमाम यांच्या विनंतीवरून, त्यांनी लंडनच्या 'वोकिंग' नांवाच्या एका भागांत 'महंमदाच्या शिकवणीपासून आपल्याला काय घेतां येणें शक्य आहे?' या विषयावर विद्वत्ताप्रचुर व सुश्राव्य भाषण केलें. थिऑसफीमधील तत्वें केवळ तात्विक दृष्टयाच आत्मसात केलीं असे नव्हें, तर तीं प्रत्यक्ष आपल्या आचरणांतहि त्यांनी उतरविलीं हेंच वरील गोष्टीवरून दिसत नाही काय? महानुभावियांचें तत्वज्ञान त्यांनी अभ्यासण्याचे व उजेडांत आणण्याचे जे एवढे श्रम घेतले त्याचें कारण त्यांतील इतिहास, भाषा, वाङ्मय याबद्दलचें त्यांना महत्व पटलें हें तर खरेंच, पण आयुष्याच्या सुरवातीपासून त्यांच्या मनाचा जो कल सात्विक व संग्राहक प्रवृत्तीकडे वळत गेला, त्या प्रवृत्तीच्या दृष्टीला, महानुभावीय पंथतत्वांत धार्मिकतेच्या दृष्टीने कांहीं उज्वलता दिसून आली असेल असें अनुमान केल्यास तें अगदीच चुकीचें होईल असें वाटत नाही.

१९१६ सालीं पहिलीच यवतमाळ जिल्हा राजकीय परिषद बॅरिस्टर मोरोपंत अभ्यंकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. परिषद निर्विघ्नपणे पार पडावी म्हणून डॉ. देशपांडे यांच्यासारख्या समतोल वृत्तीच्या व्यक्तीस स्वागताध्यक्षाचें स्थान देण्यात आलें होतें व त्यांनी तें जबाबदारीचें कार्य

अर्थात बिनबोभाट पार पाडलें. वरील प्रसंगासारखे कांही कांही तुरळक प्रसंग सोडले तर डॉ. देशपांडे यांनी राजकीय बाबतींत मतें बनविलीं नाहीत, पक्ष स्वीकारला नाही व पुढारीपणहि घेतलें नाही. तरी पण यवतमाळ येथील त्या काळच्या राजकीय पुढाऱ्याविषयीं व त्यांच्या कार्याविषयी त्यांना नेहमीच आदर वाटत असे व तो त्यांनी कित्येक वेळीं कळकळीच्या सक्रीय सहानुभूतीने व्यक्तहि केलेला आहे.

१९१९ सालीं लोकनायक अणे, श्री. भी. ह. जतकर व सदाशिवराव उर्फ अण्णा बल्लाळ यांनी तीन हजार रुपये जमा करून, या जिल्ह्याचें राष्ट्रीय आशा-आकांक्षा व्यक्त करणारें, 'लोकमत' या नांवाचें, राष्ट्रीय धोरणाचें मुखपत्र सुरू करण्याचें ठरविलें होतें. श्री. सदाशिवराव बल्लाळ यांनी त्यावेळीं डॉ. देशपांडे यांच्याबद्दलची आठवण दिली आहे तीवरून वरील परिच्छेदांत उल्लेख केलेल्या विधानाची सत्यता तर पटतेच; पण त्याच बरोबर, आपल्याला भाग घ्यावयाच्या नसलेल्या सत्कार्यालासुद्धा सक्रीय सहानुभूति दाखविण्याचा डॉ. देशपांडे यांच्या मनाचा दिलदारपणा व्यक्त झाल्याशिवाय राहात नाही.

"आम्ही येथील दहाबारा प्रमुख मंडळी, प्रत्येकी ५०० रुपयाचा शेअर घेण्याचें ठरवून, 'लोकमता'करता, यवतमाळ मुद्रणमंडळ नांवाची संस्था स्थापन करण्याचा विचार करीत होतों. बैठकींत चर्चा चालली असतां बाबासाहेब परांजपे आपल्या तडफदार स्वभावास अनुसरून मला एकदम म्हणाले, 'अण्णा, आजच्या आज मुंबईस छापखाना खरेदी करावयाला जा कसे. हातीं रकम मात्र मुळीच नव्हती ! मी म्हणालों, 'माझ्या मनांतून पहिल्या शेअरची रकम आप्पासाहेबाकडून (डॉ. देशपांडे) आणावी असें आहे !" हे ऐकतांच मित्रमंडळींत एकच हशा पिकला ! एकतर पांचशे रुपयाची रकम, आगाऊ कांहीच सूचना, न देतां, त्याच दिवशीं सापडणें कठीण, शिवाय डॉ. देशपांडे हे जहाल मताच्या सांप्रदायापासून थोडें अंतर ठेऊनच वागणारे असल्यामुळे ते एकदम रकम देतील की नाही याबद्दल सर्वांना शंका वाटत होती. तरी पण डॉ. देशपांडे यांचा थोडासा भिडस्त व ऋजु स्वभाव मला माहीत असल्यामुळे ते रकम देतील असा मला विश्वास वाटत होता. त्यामुळे मी दुपारच्या जेवणाच्या वेळीं त्यांच्याकडे गेलों व आजच्या आज मुंबईस वरील कामाकरता

जावयाचें आहे हें सांगण्याचाच अवकाश, त्यांनी आंतून पांचशे रुपयाच्या नोटा आणून माझ्या हातावर ठेवल्या ! ते पांचशे व दारव्हा, केळापूर, इत्यादि ठिकाणीं एक दोन दिवसांतच मिळालेल्या इतर रकमा घेऊन मी मुंबईस रवाना झालों. मौज अशी की आपला एक हिस्सा वर्तमानपत्रांत आहे, या कारणानें त्यांनी कधी एका शब्दाने पत्राच्या धोरणासंबंधी उच्चार केला नाही; व लोकमत बुडालें, तेव्हा आपले पैसे फुकट गेले असेंहि त्यांनी उच्चारून दाखविलें नाही !"

१९२० ते १९२५ च्या काळामध्ये त्यांचें लक्ष्य संशोधनाकडे अधिकाधिक आकृष्ट होत गेलें. महानुभावियांच्या पोथ्या चाळीत असतां, त्यांना एके दिवशीं कागदपत्राच्या गळाठ्यांत, एक अतिशय महत्वाची पोथी सापडली. पण ती सांकेतिक भाषेंत असल्यामुळे तिचा उलगडा होईना. श्री. भावे यांच्या महाराष्ट्र-सारस्वत या ग्रंथांत दिलेल्या लिप्यांच्या किल्या घेऊन त्यांनी या पोथ्यांचें कुलूप उघडण्याचे यत्न केले. शेवटी त्यापैकी एक लीपीच्या किल्लीने या पोथींचें कुलूप उघडलें जाऊन तींतील श्रेष्ठ ज्ञानभांडार उघडें झालें. हा ग्रंथ म्हणजे महानुभावियांचा पवित्र आद्य धर्मग्रंथ 'परिसिद्धांत सूत्रपाठ' हा होय. त्यावर त्यांनी विदर्भ साहित्य संघाच्या दुसऱ्या अधिवेशनांत एक टाचण वाचलें. महानुभावियांचें गुप्तधन हस्तगत करण्याची युक्ति त्यांना माहीत झाल्याचा हा प्रसंग अत्यंत रोमांचकारी अशा सात्विक आनंदाचा होता यांत शंका नाही ! यानंतर त्यांचें लक्ष या वाङ्मयाकडे इतकें वेधलें की आयुष्यांत त्यांना त्याच्याशिवाय दुसरें तिसरें कांहीच दिसेनासें झालें. त्यानंतर लवकरच माहूर येथील देवदेवेश्वराचे पदाधिष्ठीत महंत दत्तलक्षराज यांच्याशीं श्री. जयवंतराव लोणकर यांच्या मध्यस्तीने त्यांचा परिचय झाला व त्यांनी माहूर, चांदुर बाजार, पेशावर येथे असलेल्या ग्रंथसंग्रहाचा त्यांना उपयोग करूं दिला. तसेच महात्मा गोपीराजबुवा उर्फ महात्मा मुसाफीर यांनी पंजाबांतील, त्यांच्या प्रवासांत बरोबर राहून त्यांना महानुभावीय पोथ्या, ग्रंथ वगैरे मिळवून देण्याच्या कामीं बरेंच सहाय्य केलें. त्यानंतर डॉ. देशपांडे यांचें राहातें घर काषाय व कृष्ण वस्त्रें वापरणाऱ्या, पोकळ धोतरें नेसणाऱ्या, हातात चंदनाची अगर अबिराची डबी धारण केलेल्या, तोंडावर मिशा व डोक्यावर केस नसलेल्या

संन्याशांनी फुलून जाऊं लागलें. रस्त्याने जाताना महानुभावीय संन्याशांचें कडे त्यांच्याभोवतीं पडलेलें दिसूं लागलें. त्यामुळे कित्येक लोकांना डॉ. देशपांडे हे स्वतःच मानभाव तरी असावेत किंवा निदान ते आता महानुभाव पंथाची दीक्षा घेणार असा त्यांचा दाट ग्रह होत चालला. शेवटी शेवटी तो इतका दृढ होत गेला की, त्यांच्या वडील मुलाचें-श्री. राजाभाऊ यांचें-लग्न माहूरचे राजे उदाराम यांच्या घराण्यांतील मुलींशीं नक्की जमलें असतांना, त्यांच्या व्याह्यांचा, ते महानुभावीय पंथाचे आहेत असा गैरसमज झाला. परंतु लग्नाच्या वेळीं माहूरच्या देवीची डॉ. देशपांडे यांनी पूजा वगैरे केलेली पाहून व इतर मित्रांच्या सांगण्यावरूनहि तो लवकरच दूर झाला. त्यांचें हें महानुभाव पंथासंबधी 'वेड!' पाहून "या महानुभावियांमध्ये एक प्रकारची मोहिनी विद्या असते; तेव्हा तुम्ही त्याच्या फंदांत पडूं नका" असा उपदेश करून, त्यांना त्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न त्यांच्या चुलत भावाने कितीदा केला असतांहि, त्याचा काही उपयोग झाला नाही. या पंथाच्या पोथ्या मिळविण्याकरता त्यांनी बराच दूरवर प्रवास केला व महानुभावीय पंथाचा अभ्यास अव्याहत चालूं ठेवला. त्यांच्या या अभ्यासाचें दृश्य फळ म्हणणे १९२६ सालीं प्रकाशित झालेला व बृहन्महाराष्ट्रांत अपूर्व स्वागत लाभलेला 'महानुभावीय मराठी वाङ्मय' हा ग्रंथ होय. तत्पूर्वी यवतमाळ येथे एकच वर्ष, विदर्भ साहित्य संघाच्या विद्यमाने साहित्यसम्राट श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली साहित्य परिषद भरविण्यांत आली होती. लोकनायक अणे हे स्वागताध्यक्ष असून देशपांडे हे स्वागत कमिटीचे चिटणीस होते. 'महानुभावीय मराठी वाङ्मय' प्रसिद्ध झाल्याच्या वर्षीच त्या वाङ्मयाचें एकमेव केंद्र बनलेल्या 'शारदाश्रम' या संघटित संस्थेची मुहूर्तमेढ देशपांडे यांनी यवतमाळ येथे रोवली. 'ऋद्धिपूर वर्णन' व 'विष्णुदासाची कविता' (भाग पहिला) हे ग्रंथहि प्रकाशित करण्यांत आले. सुरवातीलाच प्रसिद्ध झालेले महानुभावीय मराठी वाङ्मय मुंबई, नागपूर व वुइमेन्स युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांत संहिता म्हणून नेमले गेले व त्यांचे 'ऋद्धिपूर वर्णन' व 'चक्रपाणी चरित्र' हीहि पुस्तकें नागपूर युनिव्हर्सिटींत 'टेक्स्ट' म्हणून नेमल्या गेली. इतकेच नव्हे तर त्यांच्या वरील सर्वच ग्रंथांना 'डेक्कन

व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी,' 'सी. पी. अँड बेरार लिटररी अॅकेडेमी' ग्वाल्हेर 'एज्युकेशन डिपार्टमेंट' इत्यादि संस्थांकडून पारितोषकेंहि मिळालीं.

## हिस्टॉरिकल रेकॉर्ड्‌स कमिशन व ओरिएंटल कान्फरन्स

१९२८ सालीं 'हिस्टॉरिकल रेकार्डस् कमिशन'चे 'कोआप्टेड मेंबर' म्हणून सरकारने त्यांना नियुक्त केलें. सुरवातीला या 'कमिशन'वरील सभासद व्यक्तिशः असे नेमत असत व त्यांची नेमणूक फक्त एक वर्षाकरताच होई. पुढे नवीन घटनेप्रमाणे सरकारमान्य संस्थातर्फे (Learned Research Societies) सभासदाचें नांव 'नॉमिनेट' केलें जाऊन, त्याच सभासदाची पुढे नेमणूक पांच वर्षांकरता चालू रहावयाची ही पद्धत अमलांत आली तेंव्हा पासून देशपांडे हिस्टारिकल रे० कमिशनचे 'असोसिएटेड' किंवा 'रेग्युलर' असे पंचवार्षिक सभासद झाले. त्यांनी सुरवातीच्या, नागपूर, ग्वाल्हेर, गया, पुणे, लाहोर इत्यादि ठिकाणीं भरलेल्या वरील कमिशनास उपस्थित राहून "Revenue administration under the rule of Aurangzeb." "Historical familities in Berar under Moghal Rule (Raje Udaram and Jadhao families") "Duel administration in Berar" इत्यादि महत्वाचे लेख वाचले; व त्यानंतर झालेल्या कलकत्ता, बडोदा, म्हैसूर, अलिगड येथील अधिवेशनातहि भाग घेतला. त्याचप्रमाणे 'इंडियन हिस्ट्री कॉंग्रेस' (भारतीय इतिहास परिषद) व ओरिएंटल कॉन्फरन्स' (प्राच्यविद्या परिषद) या संस्थांचेहि ते सभासद असून, त्यांच्याहि भरलेल्या बहुतेक आधिवेशनास जाण्याची त्यांनी तत्परता दाखविली. या दोनहि संघटणांचे सभासद होण्यास दहा दहा रुपये वार्षिक वर्गणी भरावी लागते. वरील ठिकाणीं वाचलेल्या शोधनिबंधाकडे भारतीय विद्वानांचें अधिकाधिक लक्ष वेधलें. दरवर्षी नाताळचे सुटींत हीं सर्व अधिवेशनें एक दोन दिवसाच्या फरकाने बहुतेक जवळ जवळ असलेल्या स्थळींच भरतात. त्यामुळे तिन्ही प्रकारच्या अधिवेशनास उपस्थित राहणें सभासदांस शक्य होऊन अनायासे त्रिस्थळीं यात्रेचें पुण्य पदरांत पडतें. कधी कधी हीं आधिवेशनें एकाच स्थळीं व एकाच वेळीं भरतात.

बडोदा ओरिएंटल 'कॉन्फरन्स'मध्ये देशपांडे यांनी 'Buddist Antiquities in Vidarbha' व त्रिवेन्द्रम येथलि 'कान्फरन्स'मध्ये Jain Antiquities in Ancient Vidarbha हे दोन महत्वाचे लेख वाचले.

इंडियन हिस्ट्री कांग्रेसमधील अधिवेशनांत अध्यक्षीय भाषण, लेखांचें वाचन, ठराव वगैरे कोणत्याहि अधिवेशनांत दिसून येणारे प्रकार असतातच; परंतु प्राचीन ऐतिहासिक स्थळें पाहण्याचें व इतर विविध मनोरंजक असे कार्यक्रमहि ठेवण्यांत आलेले असतात. प्राचीन ऐतिहासिक स्थळें पाहण्याचा कार्यक्रम एवढा महत्वाचा आहे की, शेकडो ग्रंथ वाचूनहि इतिहासाचें जेवढें ज्ञान होणार नाहीं, तेवढें पाचपंचवीस ऐतिहासिक स्थळें पाहिल्यानेहि होतें. अधिवेशनांचा दरबारी झोक, उपस्थित विद्वान प्रतिनिधींची बादशाही थाटाची राहण्या-खाण्याची व्यवस्था, हत्ती घोड्यावरील राजशाही मिरवणूकी, गायन-वादन, भारत नाट्यम्, (हा एक दक्षिण हिंदुस्तानांतील उच्च प्रतीचा नृत्यप्रकार आहे) साठमारी* असे करमणुकीचे कार्यक्रम, इत्यादि बहुरंगी सोहळ्यामुळे पाहणाऱ्याला क्षणभर असा भास व्हावा की लक्ष्मी आणि सरस्वतीच्या संगमाचा येथे हा एक अपूर्व योगच आलेला आहे!

प्राचीन, मध्ययुगीन, व अर्वाचीन कालखंडांतील ऐतिहासिक विषयांवर निबंध वाचून, त्यावर मौलिक चर्चा करण्याचा बौद्धिक कार्यक्रम म्हणजे

* या खेळांत एक वर्तुलाकार क्रीडांगण केलें असतें. त्यांत दारू पाजून मस्त बनविलेला हत्ती व त्याच बरोबर भाला व ढाल घेतलेला लढाऊ घोडेस्वार सोडतात. हत्तीला चिथविल्यानंतर तो घोडेस्वाराचा पाठलाग करतो व अशा तऱ्हेने त्यांची चकमक सुरू राहते; मात्र जिवावरच बेततांना दिसली तर क्रीडांगणाच्या भोवती सर्व बाजूंनी असलेल्या भिंतीच्या झरोक्यामधून घोडेस्वाराला सहिसलामत बाहेर पसार होतां येते! हत्तीला मात्र त्या झरोक्यांतून बाहेर पडता येत नाही. रोमन 'ग्लॅडिएटर्सच्या' एक प्रकारच्या लढाईचा, हा खेळ आठवण करून देतो. फरक इतकाच की, या खेळांत रोमनांच्या हिंस्र-वृत्तीचा आढळ दिसत नाही.

या अधिवेशनांचा आत्माच ! एखाद्या विषयावरील आपले अभिनव सिद्धांत विद्वानांसमोर मांडून, त्याचें बिनतोड समर्थन करण्याचा तो प्रसंग म्हणजे नव्या संशोधकाला तर अमूप आनंदाचा व अभिमानाचा वाटतो. डॉ. देशपांडे हे भगवद्-भक्ताच्या तीव्र निष्ठेने, साधकाच्या मोक्षलालसेने व तरुणाच्या विषयासक्तीने त्या अधिवेशन प्रसंगीं उपस्थित राहतात. त्यांच्या निरभिमान व निरलस वृत्तीमुळे ते प्रत्येकाला हवेसे वाटतात आणि वैदर्भीय वैशिष्ट्यांचा परिचय करून घेण्यासाठी त्यांच्याभोवती मंडळीचा मेळावा हटकून सापडतोच; व त्यांना संतृप्त करण्या-इतका विपुल ज्ञानसंचय त्यांच्याजवळ आहेहि ! कदाचित् एखादे वेळीं अभ्यास-जडतेमुळे वातावरण कुंद व रुक्ष होत असल्यास, जमलेल्या प्रतिनिधींपैकी श्री. चिंतामण विनायक जोशी यांच्यासारखे विनोदमूर्ति "कसे काय यशवंतराव ? शारदेस श्रम देणें ( शारदाश्रम या देशपांडे यांनी स्थापन केलेल्या संस्थेच्या नांवावर कोटी करून) कसे काय चाललें आहे ?" या प्रकारचे त्यांना प्रश्न विचारून, तें वातावरण दिलखुलास मुक्त हास्य किरणांनी प्रसन्न करून सोडतात ! अलाहाबाद, कलकत्ता, लाहोर, हैद्राबाद, अलीगड, मद्रास, अन्नामलायनगर, पाटणा, मुंबई, दिल्ली, कटक, नागपूर, जयपूर इ० प्रमुख ठिकाणीं १९३५ पासून १९५१ पर्यंत जीं अखिल भारतीय हिस्ट्री कांग्रेसचीं अधिवेशनें झालीं, त्यांत डॉ. देशपांडे यांच्या संशोधन–व्यासंगाची प्रभावी छाप पडल्यावाचून राहिली नाही. एवढेच नव्हे तर त्या त्या प्रांतांतील प्रादेशिक वैशिष्ट्यें, पुराणविषयक स्थळें, संग्रह, संस्था व संशोधक विद्वान व्यक्ति यांच्याशीं त्यांचा घनिष्ठ संबंध येऊन त्यांचा स्वतःचा संशोधन–विषयक दृष्टि-कोन अधिकाधिक व्यापक होत गेला.

## इतर कार्यव्याप्तृत्व

संशोधनाच्या या मुख्य कार्याखेरिज डॉ. देशपांडे यांनी अन्यत्र अनेक प्रकारचें वाङ्मयीन कार्य ( Literary activities ) केलेलें आहे व अनेक वाङ्मयीन मानांचीं स्थानें भूषविलेलीं आहेत.

ते स्वतः प्राध्यापक नसले तरी १९२९ सालापासून निरनिराळ्या विद्या-पीठामध्ये एम्. ए. सारख्या उच्च वर्गाचे परीक्षक नेमले जाण्याचा व पी एच्. डी. च्या विद्यार्थ्यांना देखील मार्गदर्शन करण्याचा बहुमान त्यांना मिळालेला आहे.

एवढेच नव्हे तर १९४९ च्या सुमारास नागपूर विद्यापीठाने त्यांना प्रत्यक्ष पी. एच्. डी. चे परीक्षकही नेमले होतें. १९३४ चे सुमारास नागपूर येथे मध्यप्रांत संशोधन मंडळ म. म. प्राचार्य मिराशी, प्रा. पांढरीपांडे, प्रा. सावळापूरकर इत्यादि विद्वानांच्या पुढाकाराने आस्तित्वांत आलें. सर डॉ. भवानीशंकर नियोगी हे त्याचे अध्यक्ष आहेत. या संशोधन मंडळाच्या प्रथम वार्षिक अधिवेशनाचे डॉ. देशपांडे हे अध्यक्ष होते. नागपूर विद्यापीठाने मराठी, हिंदी, उर्दू इत्यादि देशी भाषांचें माध्यम ठेवण्याचा विचार करण्याबाबत जी समिती नेमली होती, तिचें सभासदत्व स्वीकारून, डॉ. देशपांडे यांनी आपले संमतीनिदर्शक स्पष्ट मत प्रगट केलें होतें. त्याचप्रमाणे प्राथमिक शाळेतील पाठ्यपुस्तकें निवडण्याकरता जी 'अॅडहॉक कमिटी नेमली होती' तिचे ते सभासद होते. भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, या संस्थेचे ते अनेक वर्षे सभासद असून आपले संशोधनपर निबंध त्यांनी तेथे वाचले व पुण्या मुंबईकडच्या विद्वानांचे ते गौरवस्थान झालें. विदर्भ साहित्य संघाच्या आकोट येथे झालेल्या साहित्य परिषदेचे व दारव्हा येथे झालेल्या "महाविदर्भ ऐतिहासिक परिषदेचे" प्रथम अधिवेशनाचे अध्यक्षस्थानहि त्यांनीच मंडित केलें होतें. १९४१ सालीं डॉ. देशपांडे यांच्या प्रोत्साहनाने वऱ्हाड-मध्यप्रांत-जैनसंशोधनमंडळ ही संस्था अस्तित्वांत आली व तिचे सल्लागार तेच आहेत. या संस्थेतर्फे बरेंच कार्य झाले आहे व होत आहे.

वर उल्लेखिलेल्या कांही संशोधनपर व वाङ्मयीन कार्यापेक्षा देखील महत्वाची व भरीव अशी कामगिरी डॉ. देशपांडे यांच्या हातून झाली आहे. बहुमानाच्या अनेक लहान सहान प्रसंगापासून तो तहत युरोपांतील इतिहास परिषदेचें प्रतिनिधित्व, षष्ठ्यद्बिपूर्ती समारंभ, प्राच्यविद्यापरिषदेचें अध्यक्षपद व या सर्वांवरील सुवर्णकळस म्हणजे, 'डॉक्टर ऑफ लेटर्स' सारखे सर्वश्रेष्ठ भूषण, या सारख्या अनेक रोमांचकारी घटनांमुळे त्यांचा जीवितपट प्रभातकालीन सूर्यकिरणांनी उजळलेल्या एकाद्या गिरीराजीप्रमाणे कांहीसा अद्भुतरम्य झाल्याचा भास होतो!

नागपूर विद्यापिठाच्या अभ्यासक्रमांतील पाठ्यपुस्तकांची निवड करणाऱ्या समितींचे ते कित्येक वर्षांपासून सभासद आहेत. विश्वविद्यालयीन विद्वत्तेची

श्रेणी उच्चतम ठेवण्याचा दृष्टिकोन, पाठ्यपुस्तकाची निवड करतांना, डॉ. देशपांडे यांनी आपल्या समोर ठेवलेला आहे. विद्यापीठांत आपल्या पुस्तकाची वर्णी लावून, स्वतःची आर्थिक स्थिति सुधारण्याची खटपट करणाऱ्या तथाकथित आशाळभूत ग्रंथकाराऐवजी, केवळ विद्यार्जनाला उत्सुक असलेल्या ग्रंथकाराचा चेहराच, पुस्तकाची निवड करताना डॉ. देशपांडे यांचेसमोर उभा रहात असावा. सरस्वतीचें तरी प्रांगण पवित्र असावें, त्यांत स्वार्थलिंपित वृत्तीचा मागमूसहि असूं नये, अशी त्यांची ध्येयनिष्ठा या बाबतींत दिसून आल्याशिवाय राहत नाही.

## भारतांतून जगासमोर

डॉ. देशपांडे यांना १९३९ सालीं जागतिक इतिहास परिषदच्या झ्यूरिच (स्वित्झरलँड) येथील अधिवेशनास, निमंत्रित प्रतिनिधी म्हणून शारदाश्रमतर्फे जाण्याचा योग आला. त्याच वेळीं ब्रुसेल्स (बेल्जियम) येथे आंतर्राष्ट्रीय प्राच्यविद्या परिषदेचें अधिवेशन होतें. यवतमाळ सारख्या एका दृष्टीने कानाकोपऱ्यांत असलेल्या व क्वचित प्रसंगीं सुशिक्षितांच्याहि खिसगणतींत नसलेल्या संस्थेस*, प्रतिनिधी पाठविण्याबद्दलचें निमंत्रण, यूरोप सारख्या, सर्व बाबींप्रमाणेच वाङ्मयांतहि अग्रेसर असणाऱ्या देशांतील विद्वद्वृंद्य परिषदेकडून येऊन तिची मान्यता होते, ही घटना संस्थेच्या इतिहासांत अपूर्व नाही असें कोण म्हणेल? सदर्हू संस्थेला इतक्या उच्च पदापर्यंत पोहोचविण्यासें सर्वस्वीं श्रेय डॉ. देशपांडे यांनाच असून, हा वास्तविक त्यांच्याच गुणाचा गौरव होय. डॉ. देशपांडे यांनी उभय परिषदांमध्ये विद्वन्मान्य संशोधनपर लेख वाचून आपलें प्रतिनिधित्व सार्थ केलें.

वरील परिषदा संपवून ते इंग्लंडमध्ये गेले तेव्हा त्यांची दोन्ही परिषदांमधील कीर्ति तेथे परिचित होती. लंडन युनिव्हर्सिटीचे प्राच्यविद्याविशारद

* काही वर्षांपूर्वी नागपूरचे प्राध्यापकत्रय यवतमाळला आले होते. त्यांनी एका सुशिक्षितास विचारलें, "शारदाश्रम कोठे आहे?" त्याने उत्तर केलें. "शारदाश्रम कोठे आहे, हें तर नाही बोवा माहीत, पण पुढे आनंदाश्रम आहे व त्यांत भोजनाची सोय 'ए वन्' आहे!"

-संस्कृतचे प्राध्यापक-डॉ. बार्नेट, आणि इंडिया ऑफिस लायब्ररीचे डायरेक्टर डॉ. रॅन्डेल, यांच्या सूचना उपसूचनावरून, डॉ. देशपांडे यांना 'रायल एशियाटिक सोसायटी ऑफ ग्रेटब्रिटन' या संस्थेचे सन्मान्य सभासद करवून घेण्यांत आले. वकीलीसारखा, एका दृष्टीने वाङमयाला थोडासा वावडाच असा त्यांचा पेशा असूनहि विद्यापीठांतील नामांकित वाङ्मयसूरींच्या बरोबरचें यश, त्यांनी आज आपल्या प्रांतात, केवळ निरलस श्रमाने व अंगच्या बुद्धि-मत्तेने मिळविलें ही अभिमानाची गोष्ट नव्हे काय ?

## षष्ठ्यब्दिपूर्ति

१९४४ सालीं (१४ जुलै) संस्थेच्या इतिहासांत चिरस्मरणीय राहील असा प्रसंग म्हणजे डॉ. देशपांडे यांचा षष्ठ्यब्दिपूर्ति समारंभ होय. डॉ. देशपांडे यांचा सत्कार म्हणजे, शारदाश्रम संस्थेने संशोधनरूपाने आजपर्यंत जी सेवा केली तिचाहि गौरव असल्यामुळे, या निमित्य स्थापन झालेल्या सत्कार समिती-च्या विनंतीस मध्यप्रदेश व महाराष्ट्रच नव्हे तर अखिल भारतांतील इतिहास व वाङ्मयप्रेमी सद्‌गृहस्थांनी पाठिंबा दिला. नागपूर हायकोर्टाचे त्यावेळचे न्यायमूर्ति डॉ. सर भवानीशंकर नियोगी यांच्यासारख्या चतुरस्त्र पंडिताने या समयींचें अध्यक्षस्थान मंडित केलें होतें. त्यावेळचें त्यांचें भाषण अतिशय चिंतनीय झालें, आणि डॉ. देशपांडे यांनी तर "हा सत्कार माझा नसून खरोखर 'शारदाश्रम'चाच आहे," असे प्रांजलपणे सांगून विद्येला विन-याने शोभिवंत केलें !!

या नंतर, याच प्रसंगानिमित्त न्यायमूर्ति पुराणिक यांच्या अध्यक्षते-खाली नागपूरच्या सहा कॉलेजांतील साहित्यिकांनी (विद्यार्थी व प्राध्यापक) केलेला समारंभ, मध्यप्रांत संशोधन मंडळाने केलेला सत्कार, उमरावतीचें किंग एडवर्ड कॉलेजमध्ये, बाबासाहेब खापर्डे यांचे अध्यक्षतेखाली झालेलें स्वागत, तसेंच नागपूर येथे महानुभावीय पंथानुयायी यांनी केलेला गौरव, वाशीम येथील मंडळींनी केलेला सोहळा, या शिवाय आकोला, पारवा, राळेगाव इत्यादि अनेक ठिकाणीं झालेलें अभिनंदन, या सर्वांमुळे शारदाश्रमचें कार्य जनतेसमोर आणण्यास बऱ्याच मोठ्या प्रमाणांत साह्य झालें.

वरील समारंभानंतर थोड्याच काळांत नागपूर विद्यापीठाने डॉ. देशपांडे यांना 'डॉक्टर ऑफ लेटर्स' ही बहुमानाची, दुर्लभ आणि विद्वत्तेचें यथार्थ मूल्यमापन करणारी पदवी बहाल केली. हा डॉ. देशपांडे यांच्या संशोधन कर्तृत्वाचा विजय नव्हे असे कोण म्हणेल ? मध्यप्रदेशात डी. लिट्. पदव्यांनी विभूषित झालेल्या, दोन विद्वानापैकी एक विद्वान आमच्या यवतमाळकरास लाभलेला आहे व त्याच्या सहवासाने सारें नगर प्रकाशमान् झालेलें आहे, या गोष्टींचा यवतमाळकरांना निरतिशय आनंद कसा होणार नाही ?

## प्रादेशिक शोधमंडळें

१९४४ सालीं अलिगड येथे 'इंडियन हिस्टॉरिकल कमिशन'चें अधिवेशन भरलें असतां, भारतांतील निरनिराळ्या प्रांतांत प्रादेशिक संशोधन मंडळें निर्माण करण्यांत यावींत असा निर्णय घेण्यांत आला. त्याप्रमाणे वऱ्हाड मध्यप्रांतांत संशोधन मंडळ ( C. P. and Berar Regional Records Survey Committee ) अस्तित्वांत आलें. डॉ. देशपांडे यांना प्रस्तुत शोधमंडळाचें कार्य चालविण्याकरता 'कमिशन'ने संचालक (Convener) नेमलें आहे. त्यापर्यंत या समितीचें कार्य आजपर्यंत समाधानकारक रीतीने चाललेलें आहे. प्रांतांतील ठिकठिकाणचें ऐतिहासिक कागदपत्र संकलित करून सूच्या तयार करण्यांत येत आहेत.

## नागपूर विद्यापिठांतील हस्तलिखित संग्रह

सन १९४५ मध्ये नागपूर विद्यापिठांत हस्तलिखित संग्रह करण्याची योजना डॉ. देशपांडे यांच्या प्रोत्साहनाने अस्तित्वांत आली व त्या हस्तलिखित ग्रंथांचा संग्रह करण्याचें कार्य त्यांनी एक वर्षपर्यंत विनावेतन करण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणे त्यांनी वऱ्हाड आणि बाहेरच्या प्रांतांतहि ( नाशिक, बनारस इ० ) प्रवास करून एक वर्षांत सुमारे दोन हजार हस्तलिखित ग्रंथ एकत्रित करून, विद्यापीठाच्या स्वाधीन केले व याप्रमाणे हस्तलिखित ग्रंथाचा विद्यापीठांत संग्रह होऊन, संशोधन-वाङ्मयाच्या कार्याला चालना मिळाली. याबद्दल डॉ. करंबेळकर यांच्या एका लेखांतील मजकूर उल्लेखनीय आहे* " The work of collection was then earnestly

*Nagpur University Journal-Independence Number Dec. 1947

taken up by Dr. Y. K. Deshpande, and with his substancial help the Nagpur University could institute a manuscript section in its library, in a very short time. Dr. Y. K. Deshpande collected 1800 Mss from Berar and the manuscript section began to function regularly with that neclues.

## भारतीय इतिहास

याच वर्षी ऑल इंडिया हिस्ट्री कांग्रेसने, आठशे पानांचा एक भाग या प्रमाणे, भारतवर्षाचा इतिहास, भारतीय विद्वानांकडून, भारतीय दृष्टीने इंग्रजीमध्ये लिहवून घेण्याचा उपक्रम केला. त्यांतील निरनिराळे भाग, त्या त्या विषयांतील तज्ज्ञांकडे सोपविण्यांत आले होते. त्यामध्ये नागपूर स्टेट १८१८ ते १८५८ हा भाग डॉ. देशपांडे यांच्याकडे सोपविण्यांत आला होता. त्याप्रमाणे तो लिहून त्यांनी १९४८ साली संपादक मंडळाकडे पाठविला.

## वत्सगुल्ममहात्म्य प्रस्तावना

वाशीम येथे झालेल्या प्रसिद्ध पद्मतीर्थ प्रकरणामध्ये ज्या हस्तलिखित "वत्सगुल्ममहात्म्य" या संस्कृत ग्रंथाच्या आधारें हिंदुमंडळाला प्रीव्ही कौन्सिलमध्ये यश प्राप्त झालें, त्या ग्रंथाला त्यांनी प्रबंधवजा विस्तृत अशी प्रस्तावना जोडली. त्या हस्तलिखिताचें प्रसिद्धकरण सप्टेंबर १९४८ मध्ये वाशीम येथेच करण्यांत येऊन, डॉ. देशपांडे यांना तेथील मंडळाकडून ५०१ रु. ची थैली अर्पण करण्यांत आली.

## प्राच्य विद्यापरिषदेचे अध्यक्ष

१९४९ साली डॉ. देशपांडे यांनी मुंबई येथे भरलेल्या प्राच्य विद्यापरिषदेमध्ये, मराठी विभागाचें अध्यक्षस्थान मंडित केलें होतें. या परिषदेंत त्यांनी वाकाटकांची ताम्रशासनें, मराठींतील पोटभाषा, यादवकालीन वाङ्मय, मराठी भाषेचा अज्ञात काळ (Dark Period of Marathi Language) मोगल, मराठे व इंग्रजकालीन मराठी भाषेचें स्वरूप, सध्याच्या

प्रांतवार भाषारचनेचा प्रश्न, इत्यादिसंबंधी मौलिक विचार प्रकट केले. त्याचप्रमाणे ग्वाल्हेर सरकारच्या सूचनेवरून 'श्री. विक्रमादित्य द्विसहस्राद्वि उत्सव ग्रंथा'साठी 'विक्रमादित्य ऐतिहासिक की काल्पनिक' हा उत्कृष्ट निबंध लिहिलेला होता.

## डॉ. देशपांडे यांचें बहुभाषित्व

डॉ. देशपांडे यांचे संस्कृत, हिंदी, उर्दू, फारशी, पर्शियन, प्राकृत, महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, अपभ्रंश इ. भाषांचें ज्ञान वाखाणण्यासारखें आहे. त्यांना मराठी व इंग्रजी भाषा अर्थातच येतात हे सांगावयास नकोच! गुजराथी, बंगाली व पंजाबी त्यांना ग्रंथ वाचण्याइतपत समजतें. फ्रेंच भाषेशींहि त्यांची तोंडओळख आहे. विद्यार्थीदशेंतच त्यांना गुजराथीचा थोडा बहुत नाद होता. महाविद्यालयांत त्यांचे कांही गुजराथी मित्र होते, त्यांच्या सहवासांत त्या भाषेशीं चांगला परिचय झाला. महाराष्ट्री भाषेचा अभ्यास एम्. ए. च्या वेळीं सुरू झाला. त्या भाषेंतील हालाची सप्तशती हा ग्रंथच मुळी 'टेक्स्ट' म्हणून त्यावेळीं अभ्यासक्रमांत होता. मोगलाईत त्यांची कांही जमीन असून तेथे त्यांचें जाणें येणें सुरवातीपासून आतापर्यंत बरेंच झालें व होत असतें. तेथील कोर्टदरबारची भाषा कित्येक ठिकाणीं उर्दू असल्यामुळे त्या भाषेच्या अभ्यासास थोडी थोडी सुरवात पूर्वीपासूनच झाली होती. यादवांचा भाग्यरवि मावळल्यानंतर पांच सहाशे वर्षं मुसलमानांचाच अमल वऱ्हाडावर अखंडित होता. त्यामुळे विदर्भात जे जुने कागद पत्र सापडतात, त्यापैकी बहुतेक पर्शियन भाषेंतील असतात व त्या दीर्घ कालखंडांतील राजकीय वगैरे व्यवहारासंबंधी विपुल माहिती त्यांत सापडते. पुष्कळसे पर्शियन ऐतिहासिक कागद पत्र शारदाश्रमांत संकलीत केले गेले असल्यामुळे त्यांना पर्शियन व उर्दू भाषांचा अभ्यास बराच आस्थापूर्वक करावा लागला. या भाषा शिकण्याकरता त्यांनी १–१॥ वर्ष एक खास मुसलमान शिक्षकाचें सहाय्य घेतलें होतें. ए. डी. जे. यवतमाळ यांच्या कोर्टांत, एका महत्वाच्या खटल्यांत त्यांना जुन्या मोगलकालीन कागदपत्रांचीं भाषांतरें व कांही कागदपत्रांचें रोमनलीपींत लिप्यंतर करण्याकरता पाचारण केलें होतें. त्यावेळीं त्यांचें वरील भाषांवरील प्रभुत्व चांगलेंच

निदर्शनास आलें. नागपूरास वास्तव्य असलेल्या त्यांच्या एका बंगाली मित्राने (श्री. चटोपाध्याय वकील) बंगाली भाषेंतील 'त्रिधारा' नामक कादंबरी त्यांना सप्रेम भेट म्हणून दिली होती. ती वाचूनच पुढे त्यांना बंगाली भाषेची गोडी लागली व तींत त्यांनी प्रगती केली. 'सप्रेम भेट' म्हणून दिलेले ग्रंथ राखून ठेवावयास कित्येकांना गोणीसारखे जड वाटतात व क्वचित्‌वेळीं अडगळीच्या जागेंत त्यांची रवानगी झाल्याशिवाय राहात नाही! 'सप्रेम भेटी'चा एवढा सदुपयोग करून घेतलेलीं उदाहरणें निदान माझ्या तरी पाहण्यांत फार थोडीं आहेत. यूरोपला जाण्यापूर्वीच त्यांनी फ्रेंच भाषेच्या अभ्यासास सुरवात केली होती व फ्रान्समध्ये अगोदरच गेलेल्या प्रो. कालेलकर इत्यादि मित्राच्या सहाय्याने त्यांच्या त्या भाषेच्या ज्ञानांत वाढ झाली. संशोधक म्हटला की त्याला एकदोन प्रमुख भाषांवर फार मोठें प्रभुत्व व इतर आनुषंगिक भाषांचें थोडें थोडें तरी ज्ञान अत्यंत आवश्यक असतें. डॉ. देशपांडे यांचा बहुभाषित्वाचा गुण त्यांच्या संशोधन कार्याला किती उपयोगी पडत असावा, हें त्यांचे लेख वाचतांना सहज कळून येण्यासारखे आहे.

## आता थोडेसें घरगुती!

डॉ. देशपांडे यांना एकूण अकरा अपत्यें झालीं. त्यांचे वडील चिरंजीव सध्या ए. आय्. आर. नागपूर येथे नोकरींत आहेत. वामनराव भारत ब्यँकेंत अकाउन्टंट होते, पण सध्या ते रुग्णावस्थेंत आहेत. बाबुराव टेक्नॉलाजिकल इन्स्टिट्यूटमध्ये नागपूर येथे आहेत. त्यांची कन्या सौ. माई ही उमरावतीचे वकील हिरूरकर यांचे बंधु भाऊराव हिरूरकर यांना दिलेली असून ते विदर्भ मिल्समध्ये कोऑपरेटिव्ह बँकेचे सेक्रेटरी आहेत. सौ. काशीबाई गंगाधरराव देशपांडे पनसकर वकील आकोला यांना दिलेली आहे. सौ. कुसुम मेहकर येथे खासगी हायस्कूलचे मुख्याध्यापक श्री. दत्तोपंत निमदेव यांना दिलेली आहे. हीं सर्वच मुलें आज्ञाधारक असून प्रेमळ आहेत.

वकिली सुरू केल्यानंतर सुरवातीला व त्यानंतर बरींच वर्षे त्या धंद्यातील लौकिकाबरोबरच डॉ. देशपांडे यांना चांगला पैसा मिळाला. व त्यांची सांपत्तिक स्थिति समाधानकारक होती. पण त्या काळांत त्यांच्यावर कुटुंब

पोषणाचा बराच बोजा पडला. त्याचे बंधु बाळकृष्णपंत, बाजीराव, रामभाऊ, पहिल्या दोघांची मुलें, व स्वतःचीं मुलें, मुली, नातेवाईक व त्यांचीं मुलें व शिक्षणाकरता आश्रयास असलेले ७-८ विद्यार्थी असा एकंदर २५-३० मंडळीचा योगक्षेम त्यांना चालवावा लागे. त्यांतून त्यांचा हात बराच सढळ असल्यामुळे त्यांना कित्येक बाबतींत निष्कारण खर्च सोसावा लागला. पैशा-बद्दल त्यांना कधीच आसक्ति वाटली नाही; व त्यामुळे व्यावहारिक माणसाचे आपल्या मुख्य व्यवसायांत व अन्यत्रहि पैसा कमावण्याचे जे बरे वाईट प्रयत्न चाललेले असतात तशी धडपड डॉ. देशपांडे यांच्या आयुष्यांत कधींहि दिसून आली नाही. इतकेच नव्हे तर ज्या ठिकाणीं पैसा स्वीकारणें न्याय्य झालें असतें, अशाल्याहि बाबतींत त्यांची वृत्ति बेफिकीरीची होती. या बाबतींतील अनेक प्रसंगापैकी खालील प्रसंग उल्लेखण्यासारखा आहे.* "डॉ. देशपांडे यांचे वडील चिरंजीव राजाभाऊ यांचें लग्न ठरलें होतें. माहूरचे जहागिरदार श्रीमंत बाबासाहेब राजे उदाराम यांनी आपली कन्या त्यांना देण्याचे ठरविलें होतें. या वेळी मी समक्ष होतों. हुंड्याचें बोलणें निघालें असता आप्पासाहेबांनी (डॉ. देशपांडे) बिलकूल लोभ न दाखवितां, तुम्हास वाटेल तें द्यावें अगर देऊं नये असें सांगितलें. राजे उदाराम यांना फार अचंबा वाटला! 'आपल्या इकडील लग्नसमारंभांत अशा तऱ्हेची निरिच्छ वृत्ति दिसून आल्यास त्यांत नेहमी दिसून येणारा कडवटपणा जाऊन किती तरी गोडवा उत्पन्न होईल!' असे त्यांनी सद्‌गदीत होऊन उद्गार काढले. त्यांनी आपल्या इतर मुलींच्या लग्नांत दहा हजारापर्यंत हुंडे दिलेले होते. श्री. राजाभाऊंस आप जामात म्हणून अर्थातच त्यांनी योग्य ती देणगी दिलीच पण वरील गोष्टीमुळे दोन्ही घराण्याचा एकमेकाबद्दलचा आदर दुणावत गेला."

जवळ पैसा असला म्हणजे वाङ्मयाच्या कार्यांत किंवा मित्राकरता खर्च करणें हीहि एक छटा त्यांच्या स्वभावांत आहे. याचींहि अनेक उदाहरणें देण्यासारखी आहेत ‡"यवतमाळहून ग्वाल्हेरच्या १९२८ च्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाकरता मी, लोकनायक अणे व श्री. देशपांडे निघालों.

*नरहरशास्त्री खरशीकर यांची आठवण

‡आठवण- श्री. गु. ह. देशपांडे

बापूजी अणे हे दिल्लीच्या मध्यवर्ती कायदेमंडळाचे सभासद असून रेल्वेबोर्डाचेहि सभासद होते; त्यामुळे गार्डीत त्यांची स्वतंत्र जागा राखून ठेवण्यांत आली होती व धामणगावचे ‘बुकिंग ऑफिस’ जवळ जाऊन धक्काबुक्की करून तिकीट काढण्याची त्यांना आवश्यकता नव्हती. श्री. देशपांडे आपल्या स्वतःच्या पैशाने ग्वाल्हेरचीं तिकिटें घेऊन आले व त्यांनी एक तिकीट माझ्या स्वाधीन केलें. मी पैसे देण्याची तयारी दाखविली पण त्यांनी त्याकडे दुर्लक्ष्य केलें. इतकेंच काय पण सर्व प्रवासांत त्यांनीच माझा खर्च करून मला खिशांतून पैसे काढण्याचीहि सवड दिली नाही. पैसे देण्याच्या प्रत्येक वेळीं त्यांनी तो विषयच टाळावा असें चाललें होतें. शेवटी यवतमाळास आल्यावर सर्व प्रवास खर्चाची रकम त्यांच्या टेबलावर ठेऊन मी निघून गेलों !” श्री. गु. ह. देशपांडे यांनी त्यांचे पैसे परत करण्याची जी तत्परता दाखविली तशी दाखविणारे सर्वच गृहस्थ त्यांच्या मित्रमंडळींत अर्थातच नव्हते !

शिवाय ‘हिस्टॉरिकल कमिशन,’ ‘ओरिएन्टल कॉन्फरन्स,’ ‘हिस्ट्री कांग्रेस,’ साहित्य संमेलनें यासाठी होणारा व संशोधकांना करावा लागणारा प्रवास व इतर खर्च बहुतांशीं त्यांनी आपल्याच खिशांतून केलेला आहे. बाहेर गावांहून येणाऱ्या साहित्यसेवकांच्या, राहण्याखाण्याच्या एक दोन दिवसापासूनच्या तो तहत महिन्या महिन्याच्या खर्चाची झीज त्यांना सोसावी लागली आहे.

हा सर्व स्वार्थत्याग त्यांनी, शारदाश्रमवर त्यांचें पुत्रनिर्विशेष प्रेम असल्यामुळेच केला, हे जरी खरें असलें तरी त्याचा जो दुष्ट परिणाम त्याच्या आर्थिक स्थितीवर व्हायचा तो अर्थातच झाल्याशिवाय राहिला नाही. त्यांतून आयुष्याच्या अलीकडील काळांत संशोधनाकडे अधिकाधिक आकृष्ट होऊन खेचल्या जाणाऱ्या त्यांच्या मानसिक शक्तींना द्रव्यार्जन करण्याचें सामर्थ्य राहिलें नाही. स्वतःच्या वकीलीवरच्या धंद्यावरचेंहि त्यांचें मन उडून जाऊन तो त्यांनी अजिबात टाकून दिला व मूळांतच कमी असलेला हिशेबीपणा अधिकाधिक कमी होत जाऊन द्रव्यार्जनाविषयी त्यांच्या वृत्ति दिवसेंदिवस उदासीन बनत चालल्या. याकारणामुळे गेल्या कांही वर्षांत त्यांची स्थिति थोडीशी

ओढाताणीची झालेली आहे. विद्वान् म्हणजे दरिद्री हें समीकरणच झालेलें आहे.

निसर्गभिन्नास्पदमेकसंस्थ
मस्मिन्द्वयं श्रीश्च सरस्वतीच

असें महाकवी कालिदासाने म्हणून ठेवलेलेंच आहे !

पण याचा वचपा, वाङ्मयप्रांतांत त्यांना मिळालेली अढळ कीर्ति, त्यांच्यावर वर्षिल्या गेलेली असंख्य बिरुदे, सज्जनांच्या सहवासाचा झालेला लाभ, त्यांनी आकृष्ट केलेल्या सन्मित्रांच्या हृदयांतून पाझरत असलेला प्रेमादराचा ओलावा, आवडत्या विषयाच्या अखंड अव्यभिचारिणी भक्तीमुळे मनाला लाभलेली उन्मनी अवस्था, कौटुंबिक समाधानीमुळे प्राप्त झालेली प्रसन्नता, आयुष्यांतील घटनांकडे तत्वज्ञानाच्या निर्विकार उच्च दृष्टीने पाहण्याच्या मनोवृत्तीमुळे लाभलेली स्थितप्रज्ञता यांनी सव्याज भरून काढलेला आहे.

संसारविषवृक्षस्य द्वे फले अमृतोपमे
काव्यामृत रसस्वादः सगमस्सुजनैसह

या कव्युक्तीप्रमाणे हीं दोनहि फळें अनुभविण्याचें महत्भाग्य त्यांना लाभल्यामुळे, एखाद्या लक्ष्मीदासाचा वैभवाचा लखलखाट देखील त्यांना मिळत असलेल्या आंतरिक दिव्यानंदाच्या सौम्य प्रकाशलहरीपुढे फिक्का पडत असेल, हें सर्वसाधारण जणास पटलें नाही, तरी त्या दिव्यानंदाचा ज्यांनी अंशतः आस्वाद घेतला आहे त्यास पटल्याशिवाय खचीत राहणार नाही !

डॉ. देशपांडे यानी अश्रांत परिश्रम करून, महानुभावियांच्या विशाल वाङ्मयाचें सत्यस्वरूप जनतेसमोर मांडून, त्या पंथाविषयी लोकांत आदर उत्पन्न करण्याचें व त्याचबरोबर मराठी भाषेची अखंड सेवा करून संशोधनाचें नवें क्षितीज, हल्लीच्या व पुढील पिढ्याकरता महाविदर्भात निर्माण करण्याचें महत्कार्य केलें. त्यांना आपलें संकलिपत शेष कार्य पार पाडण्याकरता दीर्घायुरारोग्य व मनःस्वास्थ्य लाभो, असे चिंतून हा त्यांचा त्रोटक जीवनदर्शन भाग संपवितों.

——*——

# शारदाश्रम • • • २.

इतिहास संशोधनाचें काम जगड्व्याळ असून, तें स्वतःचा व्यवसाय व अनेक आगांतुक लफडीं सांभाळून व्यक्तिशः करणें फार कठीण आहे असें अनुभवास येऊन, डॉ. देशपांडे यांनी शारदाश्रम ही संस्था १९२६ मध्ये स्थापन केली. १९३२ मध्ये तिची नियमबद्ध घटना तयार करण्यांत आली व १९४७ त संस्था नोंदविण्यांत आली. संस्थेचे उद्देश पुढीलप्रमाणे आखण्यांत आले होते.

(१) प्राचीन व अर्वाचीन वाङ्मय आणि इतिहासाचें संशोधन, संपादन व प्रकाशन करणें.

(२) प्राचीन ऐतिहासिक कागदपत्रें, ताम्रपट, शिलालेख, हस्तलिखितें, ग्रंथ, नाणीं, पुराणवस्तु यांचा संग्रह करणें.

(३) संमेलनें, सभा, व्याख्यानें यांचे द्वारां जनतेंत संशोधनाची आवड उत्पन्न करणें.

(४) मुख्यतः विदर्भांतलि संशोधन आणि संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, मराठी, फारशी व उर्दु या भाषा संशोधन क्षेत्राकरता पुढे ठेवलेल्या होत्या.

डॉ. देशपांडे यांचेजवळ जो त्यापूर्वी कागदपत्रांचा संग्रह होता त्याच्या मूळ पायावर संशोधन-संग्रहाची इमारत रचली गेली. एकंदर ३० घराण्या-कडून हस्तलिखितें जमविण्यांत आलीं. नेरपरसोपंतचे नारायण शास्त्री यांनी संस्थेस ३०० हस्तलिखितें दिलीं.

कोणतेंहि नवीन कार्य सुरू होतांच त्यावर टीका झाली नाही असें क्वचितच घडतें. कार्य करणाऱ्या व्यक्तीच्या कर्तृत्वाबद्दल कोणाच्या मनांत

साशंकता असते, तर कोणी केवळ असूयेच्या भावनेनेहि प्रतिकूल टीकेस उद्युक्त होतात. दुसऱ्यांची कुचेष्टा करून स्वतःची प्रतिष्ठा वाढविण्याचा राजमार्ग (!) अशा तऱ्हेने बहुतेक लोक स्वीकारत असतात.

संस्थेची मुहूर्तमेढ रोवली गेल्यावर कित्येक मराठी वृत्तपत्रांतून टीकेचें वादळ उठलें. यामधील कांही लेख बरेच तिखट होते व त्यांत कांही हास्यास्पद विधानें केलीं होतीं. महानुभावीय संशोधनाइतके बसल्या जागीं थोडक्यांत लौकीक मिळवून देणारें दुसरें संशोधन नाही, प्रवास नकोत, कष्ट नकोत, सूक्ष्म तौलनीक ज्ञान नको, अशा तऱ्हेचा एका टीकाकाराचा दावा होता; तर दुसऱ्या एका टीकाकाराने टोपण नांवाचा बुरखा घेऊन संस्थेवर चोरटा हल्ला केला होता. महात्मा गांधीपासून थेट नागपूरांतील खानावळींचा त्याने समाचार घेतला असून, त्याच्या फटकाऱ्याच्या कक्षेंतून इतर कांही साहित्यसेवकहि सुटले नव्हते. या संस्थेचे आयोत्पादक डॉ. देशपांडे यांना तर त्याने लेखणीचा चांगलाच प्रसाद दिला होता. "विदर्भ साहित्य संघ ह्यांत असतां आणखी अशा (शारदाश्रमसारख्या) निष्क्रीय संस्था निघतात तरी कशाला ? कोणास तरी अध्यक्ष वा चिटणीस म्हणून मिरवितां यावें, आणि कांही लब्ध-प्रतिष्ठितांना आपल्या लेखणीचा व जिभेचा पट्टा चालवावयास मिळावा याकरता ही संस्था काढण्यांत आली आहे असा त्या टीकाकाराने शारदाश्रम संस्थेच्या चालकास हेतू चिकटविला होता. शारदाश्रमने विदर्भ साहित्य संघाशीं सवता सुभा केला अशा गैरसमजूतीमुळे त्या बिचाऱ्या टीकाकाराचें माथें ठणकत होतें.

संशोधन कार्याकरता किती व्यासंग ठेवावा लागतो; किती प्रवास व पायपिटी करावी लागते, यांची त्या टीकाकारांना काय कल्पना ? डॉ. देशपांडे यांनी शारदाश्रम निर्माण करण्यापूर्वी पंजाब, पेशावर, जमरूडपासून तो दक्षिण हिंदुस्थानांत दूरवर किती प्रवास केला, प्राचीन कागदाचा एकेक तुकडा मिळविण्याकरता काय कष्ट केले व संशोधन कार्याला जरूरीच्या अशा इतर शास्त्रांचेंहि किती खोल अध्ययन केलें याची त्या टीकाकारांना थोडीशी जरी कल्पना असती तर ते असली बेजबाबदार विधानें करण्यास धजतेना !

पण संस्थेचें तारू लो. अणे, कै. डॉ. भा. म. टेंबे, डॉ. देशपांडे, श्री. वा. ना. देशपांडे, श्री. रा. द. दामले या कुशल कर्णधारांच्या हातीं

असल्यामुळे अशल्या झंझावाताला तिने भीक न घालतां ध्येयाचें पैलतीर गाठलें !

केवळ १०–१२ वर्षांच्या अवधींतच शारदाश्रमच्या कार्याचा किती जयजयकार झाला व या टीकाकाराचें भाष्य कसें खोटें पडलें, हें विद्वानांनी शारदाश्रमसंबंधी वेळोवेळीं प्रकट केलेलीं मतें व विशेषतः यूरोपमधील जागतिक इतिहास परिषदेकरता प्रतिनिधी पाठविण्याच्या आलेल्या निमंत्रणावरून दिसून येतें. यापैकी दोनच अभिप्राय उधृत करतों.

"शारदाश्रम या संस्थेची कीर्ती वऱ्हाड–मध्यप्रांताच्या चतुःसीमेच्या बाहेर हिंदुस्थानभर तर पसरली आहेच; पण तिच्या संशोधन कार्याची महति आंतरराष्ट्रीय संशोधन क्षेत्रांत मान्य होण्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत !"

१८–१०–३७ ना. के. बेहेरे

श्री० बेहेरे यांनी केलेलें हें भविष्य एकाद्या द्रष्ट्याच्या वाणीप्रमाणे इतक्या अल्पावधींत खरें ठरलें या विषयी त्यांच्या आगामी दृष्टिचें खरोखर कौतुक करावेसें वाटतें !

"We visited Sharadashram today, and were very much pleased to see the arrangement, made for saving old Sanskrit and Marathi manuscripts and historical records from destruction. Such an institution is a national asset, at the centre like **Yeotmal**, and we wish it success.

Date 17/7/30

Jadunath Sarkar
G. S. Saradesai
Y. M. Kale.

इतिहासत्रैमूर्तींनी दिलेल्या वरील अभिप्रायावरून, संस्थेने केवळ दहावर्षांच्या अवधींतच आपल्या धेयाच्या ध्रुवाकडे किती मजल मारली होती हें सहज लक्षांत येणारें आहे !

कोणत्याहि संस्थेचा उत्कर्ष मुख्यतः दोन गोष्टींवर अवलंबून आहे. संस्थेचें बाह्यवैभव, व तिचें अंतरंग. बाह्यवैभवांत, इमारत, फर्निचर, आरामशीर बसण्याच्या व अभ्यासाच्या सोयी, वेतन घेऊन निरनिराळी

कामकर्ती मंडळी, नोकर चाकर यांचा समावेश होतो. हे तर अर्थात आवश्यक आहेच, पण त्यापेक्षाहि संस्थेचें अंतरंग म्हणजे, वाङमयसंस्था असल्यास, तिने ग्रंथसंपत्ति वगैरे निर्माण करून वैचारिक वैभवांत किती भर टाकली हें निःसंशय कितीतरी जास्त महत्वाचें आहे.

आजहि दृष्य स्वरूपांत शारदाश्रम पाहिल्यास, त्यांत दारिद्र्यच डोकावलेलें दृष्टोमत्तीस पडेल! शारदाश्रम मंदीरावर बाह्यैश्वर्याचा सुवर्ण कळस झळकत नसला तरी त्याच्या अतरंगाच्या गाभ्यांत ध्येयाची मूर्ति विराजमान आहे, हें पाहून कोणासहि समाधान वाटल्याशिवाय राहणार नाही.

शारदाश्रमला बाह्य वैभवापैकी एकहि गोष्ट समाधानकारक लाभली नाही. याला कारणें कोणतीहि असलीं तरी तें त्याचें एक वैगुण्यच मानावें लागेल. कर्त्यांचा तो एक दोष असेल किंवा जनतेचा म्हणतां येईल. कोणत्याहि संस्थेला मुख्यतः दोन प्रकारची मंडळी लाभावी लागतात. एक डोक्याचें काम करणारी व दुसरी हाताचें करणारी. वाङ्मयसेवक हा उत्तम संस्थाचालक असेलच असें म्हणवत नाही. शारदाश्रमला जी मंडळी लाभली त्यांतील बरीच केवळ वाङ्मयप्रेमी आहेत. फंड गोळा करून प्रचार करणें इत्यादि करता राजकीय पक्षोपपक्षांत जसे लोक हौसेने पुढे येतात व जास्त प्रमाणावर मिळूं शकतात, तसे दुर्दैवाने या संस्थेला लाभले नाहीत.

शारदाश्रमने ग्रंथ प्रकाशनद्वारे ज्ञानसत्र उघडण्याचें कार्य मात्र मोठ्या प्रमाणावर केलेलें दिसेल.

डॉ. य. खु. देशपांडे यांचे ग्रंथ साध्या सोप्या पण भरगच्च माहितीने भरलेले असतात. श्री. वा. ना. देशपांड्यांच्या सूक्ष्म विचार व मननाच्या संवयीमुळे, त्याची ग्रंथरचना भरीव झालेली आहे. संशोधन क्षेत्रांत त्यांचें कर्तृत्व अव्वल दर्जाचें दिसून येतें. कसोशीने पूर्वतयारी करून लिहिलेले त्यांचे गद्यलेख अचुक, मार्मिक व नावीन्याच्या वैशिष्ट्याने नटलेले असतात. कै. डॉ. टेंभे यांचे ग्रंथ बहुविध माहिती, सुसंबद्ध मांडणी व समतोल विचारसरणी यामुळे केवळ वाचनीयच नव्हे तर अभ्यासनीयहि झाले आहेत. शारदाश्रमच्या सदस्यांनी निर्माण केलेली ग्रंथसंपत्तीची यादी परिशिष्टमध्ये जोडलेली आहे.

यापैकी बरींच पुस्तकें वेगवेगळ्या विश्वविद्यालयांच्या अभ्यासक्रमांत नेमलीं गेलीं आहेत व बऱ्याच ग्रंथांना निरनिराळ्या विश्वविद्यालयांकडून व वाङ्मयीन संस्थांकडून मानाची पारितोषकेंहि मिळालेलीं आहेत. संस्थेमार्फत प्रकाशित झालेले इतर विद्वानांचेहि कांही महत्वाचे ग्रंथ आहेत.

वरील ग्रंथाखेरीज संस्थेमध्ये आतापर्यंत तीन हजाराच्यावर निरनिराळ्या विषयावरील हस्तलिखित ग्रंथ व एक हजारावर ऐतिहासिक कागदपत्र इत्यादिकाचा संग्रह झालेला आहे.

या कागदपत्रांत, न्यायशास्त्र, तर्कालंकार, तंत्रशास्त्र, वैद्यशास्त्र, तीर्थासंबधी कागद, मंत्रतंत्र, ज्योतिशास्त्र, स्त्रीधर्म, पंचागाचें गणित, मुसलमान अमलांतील पत्रें, शासनपत्रें, धर्मनिर्णय, शाहू महाराजांचीं पत्रें, पेशव्यांचा पत्रव्यवहार, नागपूरकर भोसले यांचें कागदपत्र, सामाजिक वगैरे संमिश्र कागद, सिंदखेडचे जाधव यांचे राजकारणी कागद वगैरे अनेक महत्वांच्या विषयासंबंधी नवीन माहिती देणारें लिखाण संकलित झालें आहे. वेदांतपर पोथ्यापासून तो तहत कामशास्त्राचे ग्रंथावरील झालेला संग्रह पाहून शारदाश्रमने, ज्ञानार्जन करण्याला लागणाऱ्या बहुतेक साधनांची सोय करून ठेवण्यांत किती तत्परता दाखविलेली आहे हें दिसून येईल.

वरीलपैकी कांहीं ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत.

पंचरत्नी गीता ही प्रसिद्ध पोथी काश्मिरी स्त्रियांनी कशिद्याप्रमाणे मूळ ग्रंथ पाहून लिहिली आहे.

महाभारत (उद्योगपर्व) सचित्र. याचा विशेष हा आहे की, प्रत्येक पानावर रंगित चित्र आहे. हीं चित्रें प्रेक्षणीय रजपूत कलेचा नमुना असावा.

वरील कागदपत्राप्रमाणेच संस्थेने ताम्रपट, शिलालेख व नाणीं दक्षतेने मिळविलीं आहेत. यापैकी खंडेश्वर[1], जयनद[2], (यथार्थ दर्शन) बार्शीटाकळी[3],

---

१ मंदिराच्या प्रवेशद्वारावरील लेख. हा इ स. १२५५ मधील कन्हरदेव यादव याच्या कारकीर्दीतील आहे. २ हा सूर्याचे देवळांतील आहे. चालुक्य शाखेंतील राणी पद्मावती हिने आदित्य मंदिर बांधल्याचा. ३ हा यादव कालापूर्वीचा असून, त्यांत हेमाद्री देव, मालुगी देव, इत्यादि राजांचीं नांवें आहेत.

(यथार्थ दर्शन) उनकेश्वर[४], रामटेक[५] (यथार्थ दर्शन) प्रति, कळंब (यथार्थ दर्शन) राळेगाव, रीथपूर, वरंगळ[६] (यथार्थ दर्शन) माहूरझरी येथील मुद्रा[७], माहूरझरी येथील मुद्रा[८], माहूरझरीचे मणी,[९] इत्यादि व इतरहि अनेक महत्वाचे आहेत.

त्याचप्रमाणे चंद्रगुप्त द्वितीय याचें सोन्याचें नाणें, ४-५ व्या शतकांतील (फोटो), शकांची सस्यानिअन नाणीं, मोगल बादशहांचे रुपये, निजामचीं जुनीं नाणीं, मोगली पैसे, वगैरे शेकडो गोळा केलेले आहेत. इंडिअन रेकॉर्ड्स कमिशन, ऑल इंडिया हिस्ट्री कॉंग्रेस, ओरिएन्टल कॉन्फरन्स, महाराष्ट्र साहित्य परिषद इत्यादिकांच्या बऱ्याचशा अधिवेशनांत, बैठकांत व प्रदर्शनांत, शारदाश्रम पुराणवस्तु संग्रहापैकी निवडक भाग ठेवण्यांत आलेला होता व डॉ. देशपांडे यांचे भारत इतिहास संशोधकाच्या त्रैमासिकांत वरील कागद-पत्र शिलालेख वगैरेवर अनेक शोधनिबंध प्रकाशित झालेले आहेत.

या शिवाय संस्थेकडून महत्वाच्या विषयावर, परप्रांतांतून आलेल्या विद्वानांकडून वेळोवेळीं व्याख्यानें करविलीं जातात. संस्थेने दरवर्षी दसऱ्याच्या नवरात्रांत शारदोत्सव सुरू केलेला आहे. या आठवड्यांत व्याख्यानें, वक्तृत्वाच्या चढाओढी, काव्यगायनें, ऐतिहासिक वस्तूचें प्रदर्शन, इत्यादि विविध-प्रकारचे कार्यक्रम केले जातात. विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे डॉ. देशपांडे आलेल्या सर्व व्यक्तींना, प्रदर्शनामधील पुराणवस्तूवर व इतरहि ऐतिहासिक

४ महादेवाचे मंदिरात दरवाजाजवळ आहे. शके १२११ मधील. मराठींत. मंदिरास गावें दान दिल्याचा उल्लेख आहे. ५ लक्ष्मणाच्या मंदिराच्या प्रवेश द्वाराजवळील भिंतीवर यादवांचा आहे. ६ टेकडीवर पद्मावती देवीच्या गृहमंदिरासमोर तेलगूमध्ये आहे. ७ 'अप्रमाद' ही पेटिका शीर्षक अक्षरें चौथ्या पांचव्या शतकांतील आहे. ८ या मुद्रेवर दुसऱ्या शतकांतील 'उत्तलीए' अशीं अक्षरें आहेत. ९ शेतांतून पावसाळ्यांत असे मणी व मुद्रा वगैरे सापडतात. येथे प्राचीन काळीं निरनिराळ्या रंगाचे, दगडाचे मणी व मुद्रा करण्याचे कारखाने असावेत असे तज्ञांचें मत आहे.

विषयावर, तासन्तास मिशनऱ्याच्या चिकाटीने माहिती देत असतात! या उत्सवांत स्त्रियाहि भाग घेतात. संस्था दरवर्षी भवभूतीदिन साजरा करते. त्याचप्रमाणे बाहेरगावच्या 'स्कॉलर्स'ना संस्थेंत अभ्यास करण्याची सोय केलेली आहे. लोकनायक बापूजी अणे हे संस्थेचे सुरवातीपासून अध्यक्ष व मार्गदर्शक आहेत. श्री० अमृतराव साकळे वकील यांच्याहि अमोल सल्याचा संस्थेला वारंवार उपयोग झालेला आहे. श्री० ना. रा. उर्फ बाबूराव कुळरवार यांनी कित्येक वर्षांपासून ऑडिटरचें काम चोखपणे केलेलें आहे. श्री० पु. गो. उर्फ आबासाहेब देशपांडे यांनी सुरवातीला संस्थेच्या कार्यवाहकाचें काम आस्थापूर्वक केलेलें होतें. श्री० ना. झु. नंदुरकर हे सध्याचे कोषाध्यक्ष आहेत.

संस्थेच्या कांही सभासदांचा व कार्यकर्त्यांचा उल्लेख मागे आलेलाच आहे. बाकीच्या सभासदांचा व कार्यकर्त्यांचा अल्पपरिचय येथे करून देणें, अस्थानी होणार नाही.

**श्री. वा. ना. देशपांडेः**—नामवंत कवि व वाङ्मयसमीक्षक. यांचे 'आराधना' व 'अनामिका' हे काव्यग्रंथ, 'आद्य मराठी कवयित्री' व 'स्मृतिस्थळ' हे संशोधनपर ग्रंथ आणि 'रामशास्त्री' व 'विचार-समीक्षा' हे टीकाग्रंथ प्रकाशित आहेत. हे सर्वच ग्रंथ वरच्या दर्जाचे आहेत. नियतकालिकांतून व वृत्तपत्रांतून विविध विषयावर त्यांचें विपुल मौलिक लेखन प्रकाशित झालें आहे व होत असतें.

**श्री. रा० द० दामलेः** यांनी संस्थेच्या कार्यवाहाचें काम १० वर्षे उत्साहाने केलें. यवतमाळांत जवळ जवळ अशी एकहि संस्था नाही की जिच्याशीं श्री० दामले यांचा थोडा बहुत तरी संबंध नाही. डॉ. देशपांडे यूरोपला जाण्याचे वेळीं त्यांनीच मुख्यतः गावोगावीं फिरून, बराच निधी गोळा केला; व नाटकांचे वगैरे कार्यक्रम करून शारदाश्रमला आर्थिक मदत केली. टाऊन हॉल समोरील 'पार्क'मध्ये, कै. डॉ. टेंभे, यांचा अर्ध पुतळा उभारून, त्यांनी त्या स्थळाच्या सौंदर्यांत शाश्वत भर टाकण्याचें कार्य केलेलें आहे. शारदाश्रमच्या बाह्यांगांत असलेल्या बऱ्याचशा उणीवा श्री. दामले यांच्याच प्रयत्नाने भरून निघालेल्या आहेत.

**श्री. द. बा. महाजनः**—हे एक उदयोन्मुख संशोधक आहेत. यांचा 'जाधव घराण्याची बखर व पत्रव्यवहार' हा ग्रंथ प्रकाशनाचे मार्गावर आहे. गोसावीनंदन यांच्या कवितांचा त्यांनी संग्रह केलेला आहे. त्याचप्रमाणे राष्ट्रकूट राजा गोविंद ३ रा याचे दोन ताम्रपट व विंध्यशक्ति वाकाटक हा व इतर कांही ताम्रपट यांच्या प्रयत्नाने पुढे आलेले आहेत. १२ व्या शतकांतील कांही शिलालेख त्यांनी संग्रहीत करून शारदाश्रमला दिलेले आहेत.

**श्री. पां. श्रा. गोरेः**—हे विदर्भाचे एक सत्कवि असून त्यांनी वऱ्हाडी लोकगीतें संकलित करून प्रकाशिलेलीं आहेत. 'बोबडे बोल' व 'वाणीचा हुरडा' हे त्यांचे दोन काव्यसंग्रहहि प्रकाशित आहेत.

**कै. मा. श्री. दाऊः**— यांचा संस्कृतवरील व्यासंग दांडगा होता. यांचा 'विनोदलहरी' हा काव्यग्रंथ प्रसिद्ध आहे.

**डॉ. अणेः**—संस्थेचे सभासद डॉ. अणे (वणी) यांनी विदर्भांतील, वैदिक घराण्यांतील प्राचीन संस्कृत पोथ्या संकलित करण्याचे कामीं फार प्रयत्न केले. त्यांनी अशा १२०० पोथ्यांची सूची १०-१२ वर्षांपूर्वींच करून ठेवलेली आहे.

**श्री. टोंगोः**— हे कादंबरीकार म्हणून पुढे आलेले आहेत. त्यांच्या आतापर्यंत 'स्वीकार' 'पुन्हा एकदा' 'लकेरी,' 'प्रत्यय' इत्यादि सहा कादंबऱ्या, व 'तिसरें राज्य' हें एक नाटकहि प्रकाशित झालें आहे. कांही उत्कृष्ट लघुकथाहि प्रकाशित आहेत.

**श्री. दे. महाजनः**—यांना जैन संशोधनाची आवड आहे. हे मध्यप्रदेश जैन 'इन्स्टिटस्टयूट'चे कार्याध्यक्ष आहेत. हे हिस्ट्री कांग्रेसच्या अधिवेशनांना उपस्थित असतात. त्यांनी कायरला जाऊन तीर्थंकराच्या जुन्या मूर्ति वगैरे तपासल्या.

**श्री. ना. ना. हुडः**— १० वर्षे शारदाश्रमचे कार्यवाह. यांचा 'पराग' हा मराठी–इंग्रजी काव्यसंग्रह, नागपूर विश्वविद्यालयाने एम्. ए. व बी. ए. ऑनर्सला 'टेक्स्ट' म्हणून नेमला आहे. दुसरा काव्यसंग्रह 'निराभास' सध्या मुद्रित करणें चालू आहे.

संस्थेच्या सध्या दोन उणीवा फार मोठ्या आहेत. इमारती संबंधाने खटपट करूनहि तें जुळलें नाही. 'फायर प्रुफ' इमारत बांधण्याची महत्वाकांक्षा धरून संस्थेला साधीहि इमारत उभारतां येऊं नये, हें खचित स्पृहणीय नाही. संस्थेचा हस्तलिखित ग्रंथसंग्रह व पुराणवस्तु संग्रह आतापर्यंत येथील 'ज्युबिली लायब्ररीं'त ठेवण्यांत आलेला आहे. त्याचप्रमाणे संस्था आपलें एकहि मुखपत्र काढूं शकली नाही व त्यामुळे तिचें कार्य दृश्यस्वरूपांत म्हणावें तसें दिसून पडत नाही. मागे, संस्थेचें प्रत्येक वर्षांत झालेलें कार्य दर्शविण्याकरता 'शारदाश्रम' वार्षिक काढण्याचा प्रयत्न संस्थेने केला होता. एक अंक निघाला. त्यांत प्रो. हंटर, श्री. आ. रा. देशपांडे वगैरेंचे मौलिक लेख प्रकाशित झाले होते. पण द्रव्यनिधीच्या अभावीं तोच पहिला अंक शेवटचा ठरला!



# डॉ. देशपांडे यांचें स्वतंत्र संशोधन ३.

महानुभावीय वाङ्मयेतिहास, जैन व बुद्ध वाङ्मयेतिहास, मुसलमान पूर्व कालांतील वाङ्मयेतिहास, मार्कंडचा शिलालेख, उनकेश्वरचा शिलालेख, भांदक ग्रँट, कायरचे सातवाहनकालीन शिलालेख, वाकाटकांचे विंध्यशक्ति वगैरे ताम्रपट, राष्ट्रकूट नन्नराज याचे दानपत्र, प्राचीन महाराष्ट्रासंबंधी व इतर विषयावरील लेख इत्यादिकांचा डॉ. देशपांडे यांच्या स्वतंत्र संशोधनांत अंतर्भाव होतो. वरील शिलालेख व ताम्रपट यांचें संशोधन करून डॉ. देशपांडे यांनी महाराष्ट्राच्या इतिहासाची विदर्भातील साधनें प्रकाशांत आणण्याचा प्रयत्न केला आहे.

## महानुभावीय तत्वज्ञान

'जेव्हा लटक्याला मोल येतें, कर्तव्य आणि श्रेयाची दिशाभूल होते, बुद्धीचे डोळे फुटतात, त्यावेळीं ज्ञानेश्वरासारखे बंडखोर प्रेमाच्या पायावर समतेची इमारत बांधतात.' ही बी कवींनी 'डंका' या कवितेंत वर्णिलेली स्थिति तेराव्या शतकाच्या सुमारास अखिल महाराष्ट्रांत उत्पन्न झाली होती. चातुर्वर्ण्याची पोलादी चौकट अधिकाधिक कठीण कणखर होऊं लागली. वैराग्यभूमी भोगभूमी बनली! ब्रह्मज्ञानाची मिरास फक्त उच्च वर्णीयांकडे जाऊन त्या पवित्र मंदिराचीं दारें संस्कृत भाषेच्या कडीकुलपाने कायमचीं बंद करण्यांत आलीं होतीं. तान्हेल्याला ढगांतून पाणी मिळतें; व त्यांतूनच एकादेवेळीं त्याजवर वीजहि पडते! ज्या वैदिक धर्मातून दिव्य तत्वाचें 'जीवन' जनतेला मिळालें त्यामधूनच कर्मकांडाची वीज तिच्यावर पडून ती त्यांत होरपळून जावयास लागली. अशा विपरित परिस्थितींत चक्रधरासारख्या श्रेष्ठ पुरुषाने, "नको गा: केशवदेया: येणे माझिये स्वामीचा सामान्यु परिवारु

नागवेलकी: परमेश्वरें तरी जांनाचेया संकोचिता आन अनेक व्यसना अयोग्यता जाणौनी: आन काठिण्यता चुकवोनी सकळांसी अल्पायासे ब्रह्मविद्येचिये ठाये गिवसता यवौनि परमेश्वर लाभुद्यमा वावु होआवा: म्हणौनिचि महाराष्ट्रीये निरोपिले का गा: म्हणौनि केशवा संस्कृत सूत्रबद्ध प्रकरण न करी तूं की: ॥ अशा तऱ्हेचा आदेश देऊन, ज्ञानगंगेचा आजवर कोंडून ठेवलेला ओघ आबालवृद्धाकरता मोकळा केला.

चक्रधरापूर्वी, त्याच्या समकालीं व मागावूनहि अशीं अनेक 'बंडाचीं-वादळें' उठली होतीं. बौद्ध धर्मियांनी संस्कृत भाषेंमधून ज्ञान पाली भाषेंत आणलें. कानडी भाषेंतील कवि विठ्ठल पुरंदर यानेंहि ज्ञानभांडार कानडींतहि प्रसृत केलें ज्ञानेश्वराने भागवत सांप्रदायाचे, माध्वाने माध्व सांप्रदायाचें, रामानंदाने रामानंदी पंथाचे, बसवाने लिंगायत सांप्रदायाचें-अशीं वेगवेगळीं रणशिंगें फुंकलीं. हे सांप्रदाय एकाच परिस्थितिमुळे व एकाच ध्येयानें अस्तित्वांत आले.

सर्व विश्व हें शक्ति ( Energy ) व प्रेरणा ( Force ) या दोन तत्वांवर चाललेलें आहे. शक्ति वस्तूंना बाहेर घालविते. तर प्रेरणा त्यांना मागे खेचते. त्याचप्रमाणे समाजांतहि अशा सारख्याच दोन विरोधी सामर्थ्यांची क्रिया प्रतिक्रिया चाललेली असते. पुरोगामी लोकांची क्रिया शक्तीप्रमाणे तर सनातन्यांची प्रेरणेप्रमाणे असते. समाजांत पुरोगामियांचेंच फक्त सामर्थ्य वाढलें असतें, तर समाजाची दुर्गतीच्या खडकावर आदळून शकलें झालीं असतीं! सनातनीयांचे बळ पुरोगामियांच्या दुर्दम्य अतिरेकी उत्साहाला मागे ओढतें म्हणूनच समाजाचें आसन स्थिर राहतें. समाजांतील सनातनी सामर्थ्याविरुद्ध एकदम सर्वांस जाण्याने समाजाचें कल्याण न होतां तो एकाएकी कोलमडण्याचा संभव असतो, हें जाणूनच की काय चक्रधराने सनातन वैदिक धर्माचें मूळच छेदून न टाकतां, त्या धर्माच्या ज्या शाखा कित्येक ठिकाणीं सडलेल्या होत्या, त्याच फक्त तोडून टाकून, त्यावर नवपल्लवयुक्त महानुभावीय पंथाचें हलक्या हाताने कलम बांधलें! आर्यधर्माच्या स्फुल्लिंगावर पाणी शिंपडून, त्याला अजिबात नामशेष न करतां, त्यावर आचारधर्माची पसरलेली राख तेवढी फुंकूत, त्या धर्माची ज्योत

अधिक उज्वल करण्याच्या त्यांच्या महत्कार्यांत, अचाट श्रेयस्कारक कल्पकतेबरोबरच श्रेष्ठ दर्जाच्या व्यवहाराचें प्रेयहि दिसून आल्याशिवाय राहात नाही!

चक्रधराने पुरस्कृत केलेल्या महानुभावीय पंथांत विसाव्या शतकांतहि शोभून जातील अशा कित्येक पुरोगामी व तेजस्वि तत्वांची पखरण झालेली दिसून येते.

चक्रधराने द्वैत मताची पताका फडकाविली; एवढेच नव्हे तर "सृष्टीमध्ये कव्हणे करणे मुचिजेना एका परमेश्वरावीण" अशा प्रकारचें, एकाच परमेश्वराकडे लक्ष केंद्रित करून, तेहतीस कोटी देवांचा गोंधळ नाहीसा करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचप्रमाणे इतर देवतांना कमी प्रकारचें लेखून श्रीकृष्ण व दत्तात्रय यांनाच आत्मसमर्पण करण्याचा मार्ग दाखविला आहे. अलिकडच्या प्रगतिपर काळांत एकेश्वरी तत्व बरेंच अमलांत येऊन लोकांच्या मनाची पकड घेऊं पाहात आहे. आर्यसमाज, प्रार्थनासमाज वगैरे सारख्या अनेक धर्म समाजांत त्याचा प्रसार झालेला दिसून येतो.

वेदांत जरी मूर्तिपूजा सांगितली नाही तरी, ती हिंदूंच्या रोमारोमांत भिनलेली असल्यामुळे ती एकदम मोडावयाची कशी ? तर मूर्तिपूजा न करतां परमेश्वराच्या अवताराची क्रीडा झाली आहे तीं स्थळें पवित्र मानून, त्यांची पूजा करावयाची असा त्याने मार्ग काढला.

जातिभेदाच्या उच्चाटणाचें आता आतापर्यंत समाजाच्या पचनीं न पडणारें तत्व, चक्रधराने तेराव्या शतकांतच अमलांत आणलें. पण हें करतांना त्याने जातिभेदाचा पांगुळगाडा मोडून तोडून फेकून न देतां पंथांतील उपदेशीय लोकाकरता जतिधर्म कायमच ठेऊन, सन्यासदीक्षा घेतल्यानंतर मात्र त्याची आवश्यकता ठेवली नाही. त्यामुळे शूद्रहि ब्राम्हणाचा गुरु बनल्याचीं उदाहरणें घडून आलीं.

तसेच अवतारवादाच्या संपूर्ण वैदिक कल्पनेला कलाटणी देऊन, त्याने चक्रधर व प्रशांत हे दोनच अवतार मानावयास लोकांना शिकविलें.

वैदिक धर्मावर आलेली करंटेपणाची क्रियानष्टता घालवून लावण्याकरता 'न ऋते श्रांतस्य सख्याय देवाः' असा त्याने प्रयत्नवादाचा धडा घालून

दिलेला आहे. एवढेच नव्हे तर अहिंसावादी महानुभावीयांकडे वाकडा डोळा करून, त्यांची अवहेलना करणाऱ्यांना "ये ऐसी उघडी नागवी दिसते असति परि याचा वास कव्हणाही पाहो नये: याही: एकु अभिमानिये आति: ते जरि क्षोभले होइल तरि मा काई करीतिः (आचार १२२)" असा करडा इशारा दिला आहे!

परंतु वरील इशाऱ्याबरोबरच "जरी वैरिआंचा दे ॐ जाला: तरि तो काई दगडे म्हणोनि: फोडावा: ना जी: (४८१)" असा परधर्मसहिष्णुतेचा उपदेशहि केलेला आहे. 'कव्हणाचीही चेष्टा न करावी: चेष्टे तवं ईश्वर धर्मू जाऐ: आन परत्रीं नरका भाजनु होऐ. (पु. च. २४१)' इत्यादि वर वर्णन केलेली उच्च विचारसरणी सर्व धर्म व पंथ ठेवतील, तर 'सहनाववतु' या महान वैदिक सिद्धांताचें साफल्य झाल्याशिवाय कसें राहील?

या पंथांत स्त्रियाबद्दलहि उदारवृत्ति दिसून येते. त्यांत कित्येक विदुषी स्त्रिया होऊन गेल्या. नागदेवाचार्यांची शिष्यिण कमळाबा वगैरे सारख्या स्त्रिया विशिष्ट आम्नायांच्या प्रवर्तक होत्या. चक्रधराची प्रमुख शिष्यीण महदंबा, ही तर महानुभावीय वाङमयांत आद्य कवयित्री म्हणून प्रसिद्धच आहे.

या पंथाचीं धर्मतत्वें तर उज्वल आहेतच; पण बहुतेक आचार विचार व रूढीहि आदर्शवत् आहेत. मद्यमांसाचें सेवन न करणें, प्रिय व सत्य बोलणें, सरळ वर्तन ठेवणे, लोचटपणा न करणें इत्यादि आज्ञा लक्षांत घेतां, या पंथाला 'ओखटी दूषणें' देण्यांत कित्येकांनी फाजील डोळसपणा दाखविला होता असे म्हणणे भाग पडते.

प्रेतावरील वस्त्रे वापरण्याची मुभा, लहान मुलामुलींना कोवळ्या वयांत संन्यास देणें, इत्यादि रूढीमुळे* व इतर अनेक कारणांनी या पंथाबद्दल गैरसमज पसरले गेले होते. डा. भांडारकरांनी मानभाव हा शब्द 'मांगभाव' या शब्दाचा अपभ्रंश नसून, महानुभाव शब्दाचा आहे, असें सिद्ध केलें व

* आजकाल या पंथांत बरीच जागृति झालेली असून, वरील सारख्या बऱ्याच रूढी काढून टाकण्याचा प्रयत्न करण्यांत येत आहे.

लोकमान्य टिळक, शि. म. परांजपे इत्यादि रथीमहारथींनी या पंथाच्या श्रेष्ठतेबद्दल निर्वाळा दिला.

, ब्राम्हण, क्षत्रिय व इतर जातींतील कांही लोकांनी तर हा पंथ स्वीकारला होताच; पण शहामुनीसारख्या अनेक मुसलमानांनाहि तो स्वीकारण्याच्या मोह आवरला नाही, हें लक्षांत घेतलें म्हणजे या पंथाचें महत्व पटल्याशिवाय राहात नाही.

चक्रधराने विदर्भांत लावलेल्या या वटवृक्षाच्या शाखा, यथाकाल विदर्भातील सर्व प्रदेश आक्रमून, माळव्यांत इंदूरपर्यंत व पुढे पंजाब देशापर्यंत पसरून, काबूल, कंदाहार, काश्मिरपर्यंतहि त्याच्या पारंब्या विस्तारल्या गेल्या ! मराठ्यांचीं घोडीं अटकेवर एकदाच पाणी प्यालीं; पण पंथांतील कर्तबगार प्रज्ञावंतांनी दूरच्या प्रदेशांत एकदा जो यशोदुंदुभी गाजविला, त्याचे पडसाद अजूनहि नगाधिराज हिमालयाच्या गिरिकंदरांत घुमून राहिलेले आहेत !!

## मराठी भाषेची जन्मभूमी

विदर्भ, मराठी भाषा, महानुभावीय वाङ्मय व यादव घराणें या चतुःसूत्रीचा एकमेकाशीं अविभाज्य संबंध आहे असे दिसून येतें !

आर्यांनी, दक्षिणेंत प्रथम विदर्भांत वसाहत केली. विदर्भांतील संबंध असलेल्या ऋषींचीं, इंद्र आणि मरुत् देवताचीं स्तोत्रें वेदांत सापडतात. रामायण, महाभारत, (सभापर्व, नलोपाख्यान वगैरे) जैमिनी उपनिषद् ब्राह्मण, बृहदारण्यकोपनिषद्, मार्कंडेयपुराण, रघुवंश, दशकुमारचरित्, वराहमिहिराची बृहत् संहिता इत्यादि प्राचीन ग्रंथांतून विदर्भाबद्दलचे ( विदर्भ, वेणातट किंवा दक्षिणापथ) अनेक उल्लेख आलेले आहेत. इतकेंच नव्हे तर, परकीय ग्रंथकार पेरिक्लीज (पहिलें शतक) वगैरेंच्या ग्रंथातहि विदर्भदेशवाचक नांवें, वगैरे इतिहास विखुरलेला आहे. यावरून दक्षिण हिंदुस्तानांतील सर्वात प्राचीन देश विदर्भच होय, या विषयीं शंका उरत नाही. मराठी भाषेचा संभव, संगोपन व संवर्धन या विदर्भातच पहिल्याने झालेलें आहे. व म्हणून वऱ्हाड हाच मराठी भाषेची जन्मभूमी आहे.

## महानुभावीय गद्यवाङ्मय

१२-१३ व्या शतकांत मराठी भाषेचा जीवनदायी गंगाप्रवाह निरनिराळ्या भाषांचे जलौघ मिळून, विस्तृत स्वरूपांत वाहूं लागला ! या

काळांत मुकुंदराजाचा विवेक सिंधु, ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी व महानुभावीय गद्यपद्यग्रंथ यांचा समावेश होतो.

११८७ हें वर्ष मराठी भाषेच्या इतिहासांत सुवर्णाक्षराने लिहून ठेवावें लागेल! भिल्लम यादवाने कृष्णा नदीच्या उत्तरेकडील मुलखावर आपलें अधिपत्य प्रस्थापित करून, देवगिरी उर्फ दौलताबाद आपल्या राज्याचें केंद्र बनविलें. यादवांच्या कारकीर्दीत मराठी भाषेला अपूर्व वैभव लाभून ती वाङमयोपासकांची आराध्यदेवता बनली. मानाच्या सिंहासनावर अधिष्ठित झालेली ही अनर्घ्यरत्नांकित सौंदर्यसीमंतिनी, यादवांच्या ऐश्वर्यभूमींत आपल्या ललित विलासाबरोबरच आत्मप्रत्ययाचें तेजहि दाखवावयास लागली! अपभ्रंश भाषेपासून भिन्न होऊन, आता स्वतंत्र स्वरूपांत आलेल्या आमच्या मराठी भाषेचे पदन्यास, सहजरमणीय तितकेच अप्रतिबंधित होऊं लागले होते. राजदरबार, राजप्रासाद, राजास्त्रियांचीं अंतःपुरें इत्यादिबरोबरच तिच्या पैंजणनूपुरांचा प्रतिध्वनी, श्रेष्ठ कवींच्या काव्यांत, व लोकसमाजांतहि अविच्छिन्न निनादित होऊन राहिला होता! तिचें भव्य आणि आकर्षक स्वरूप पाहूनच की काय संतोषमुनीसारखे महानुभावीय सारस्वताचे लाडके कवि

**"तैशी छप्पन्न भाषांचिया मुकुटी**
**शोभे सहावी सुंदर मराठी"**

अशा तऱ्हेचे तिजविषयी गौरवाचे उद्गार काढीत होते!

मराठींत प्रथमतः गद्यग्रंथ लिहिण्याचें श्रेय, महानुभावीय पंथाचा जो आद्यग्रंथ लीळाचरित्र, त्याच्या कर्त्याकडेच आहे. हे चक्रधराचे पट्ट शिष्य महींद्रव्यास होत. त्यांतील प्राचीन मराठी शब्दांच्या व्युत्पत्तीचा केलेला विचार मराठी भाषेच्या अभ्यासूंना फार उपयुक्त आहे. या ग्रंथाची भाषा ज्ञानेश्वरीच्या समकालीन आहे. यादवांच्या राजवटींतच हा ग्रंथ निर्माण झाला. पहिल्या भीष्माचार्यांचा व्याकरणविषयक 'पंचवार्षिक' या ग्रंथांत, एखाद्या पाश्चात्य जाड्या पंडिताप्रमाणे, अगोदर प्रमेय व नंतर सिद्धता या गोष्टी साधलल्या दिसतात. 'चक्रधर परिसिद्धांत सूत्र' हा महत्वाचा ग्रंथ आहे. व्यवहारांत प्रचलित असलेले शब्द चक्रधराने जितके वापरले, तितके ज्ञानेश्वरींतहि सापडत नाहीत. भाषेचें

लोण बहुजन समाजाच्या लौकिक थरांत पोहचविण्याची चक्रधराची कामगिरी अलौकिक म्हटली पाहिजे! बहुतेक सर्व महानुभावीय ग्रंथांत तद्भव शद्वापेक्षा तत्सम शब्दांचा भरणा अधिक दिसतो. केशवव्यासांचा सूत्रपाठ, आनेराज व्यास उर्फ गोपाळ पंडितांचे 'लक्षण रत्नाकर,' व 'द्वात्रिंशत्‌लक्षण' हे ग्रंथ महत्वाचे आहेत. प्रसिद्ध 'साती' ग्रंथावरील कठीण शब्दांच्या कोशासारखे 'टीपग्रंथ' हि बरेच आहेत. हयग्रीव व्यास यांचा 'गद्यराज,' मुनिराज व्यास कुमाराम्नाय यांचा 'स्थानपोथी', दिनकरमुनींचा 'मतिरत्नाकर' इत्यादि ग्रंथ उल्लेखनीय होय. या शिवाय शेकडो गद्य ग्रंथ महानुभावीय वाङ्मयांत लिहिले गेले आहेत. भगवद्गीतेपासून तो निरनिराळया इतर ग्रंथावरील टीका, त्यावरील भाष्यें, महाभाष्ये, शब्दकोश, व्याकरणें, व्युत्पत्तींचा विचार, इत्यादि सर्व विषयांचा परामर्ष, महानुभावीय प्रगाढ पंडितांनी घेतलेला आहे! महानुभावीय वाङ्मयसागरांत, त्याकाळीं विभवगिरीच्या अत्युच्च शिखरावर तळपणाऱ्या, यादवांच्या भाग्यरवींच्या किरणशलाकांची प्रभा फाकलेली दिसते! यादवांच्या राजवंशाचीं, त्यांच्या छत्राखालीं असलेल्या स्थळांचीं, त्यांतील लोकसमाजाचीं, धार्मिक घडामोडींचीं व व्यक्तींचीं चित्रें, या ग्रंथांत पाहावयास मिळतात. या शिवाय आणखीहि पुष्कळ ऐतिहासिक घटनांसंबंधी नवीन माहिती या ग्रंथाच्या योगानें पहिल्यानेच उपलब्ध होत आहे. 'मूर्तिप्रकाश' ग्रंथांत, चक्रधराचे गुरु गोविंदप्रभु यांच्या जीवनकथे-बरोबरच, विदर्भाच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक आंदोलनांचा बराच सुसंबद्ध इतिहास मिळतो. बहुतेक जेष्ठ श्रेष्ठ महानुभावीय कवि व ग्रंथकार विदर्भाच्याच पावनभूमींत उदयास आले, त्यामुळे त्यांच्या ग्रंथाची भाषा सध्याच्या वऱ्हाडी भाषेला बरीच जुळती आहे.

## 'सारस्वती जन्मभू'

सौंदर्याचें सौंदर्यस्थान, अशा काव्यदेवतेचा विलास, विदर्भाच्या स्वप्नाळू भूमींत सुरवातीपासूनच पाहावयास मिळतो. सत्काव्याची कल्पलता याच पावन-प्रदेशांत अनेक वेळेला फुलामंजिऱ्यानी बहरून आलेली आहे. राजशेखर कवीने प्रभु रामचंद्राच्या मुखांतून याच देशाला 'सारस्वती भू' असें प्रशस्ति पत्र देवविलें आहे. वैदर्भीरीतीचा कीर्तिसौरभ याच भूमीमधून दिगंतात दरवळला.

पहिल्या शतकांत हालाची सप्तशती लिहिल्या गेली. हा ग्रंथ नर्मदा नदी, विंध्य किंवा गोदावरी यांच्यामध्ये कोठे तरी लिहिला गेला आहे. त्यांत महाराष्ट्री किंवा प्राकृत भाषेंतील उत्कृष्ट काव्याचा फुलवरा फुलारलेला आहे. श्लेषगर्भ कल्पना, वेधक सुभाषितें, ध्वनियुक्त काव्याची कलाभिज्ञता यांनी हीं काव्यें नटलेलीं आहेत.

**पत्तणि अंबप्फंसा ण्हाणुत्तिण्णाऍ सामलङ्गीए**
**जलबिंदु एहि चिहुरा रुअन्ति बन्धंस्स एव भयेण ।**

या ओळींतील कल्पना, महानुभावीयांचा काव्यमुकुटमणी, भास्करभट्ट बोरीकर यालाहि एवढी विलोभनीय वाटली की, तिचा उपयोग आपल्या 'शिशुपालवधा'त करण्याचा त्याला मोह आवरला नाही !

गाथा सप्तशतींत राजप्रासादांतील जीवनावरोबरच, ग्रामीणजीवनाचींहि वेधक शब्दचित्रें पाहावयास मिळून कर्त्याच्या सर्वस्पर्शित्वाची साक्ष पटल्याशिवाय राहात नाही !

**उद्धच्छो पिअई जलं जहि जहि विरलांङ्गुली**
**पावालिआ वि तह तह धारं तुणई पि तुणई ॥ २-६१ ॥**

या प्रकारचा, यौवनांतील मादक सहजोल्लास, कोणाला भारून टाकणार नाही ?......या नंतरच्या अनेक शतकांतील अनेक नामवंत कर्त्यांची मालिका विदर्भास भूषणभूत झालेली आहे.

### महानुभावीय पद्यवाङ्मय

गद्यग्रंथाप्रमाणेच महानुभावीय पद्यवाङ्मयाने मराठी भाषेवर मोलाची लेणीं चढविलेलीं आहेत. त्यांत काव्यग्रंथ बरेच असले तरी 'शिशुपालवध,' 'एकादशस्कंद,' 'रुक्मिणी स्वयंवर,' 'वत्सहरण,' 'ऋद्धिपुरवर्णन,' 'सह्याद्रिवर्णन,' व 'ज्ञानप्रबोध' हे काव्यांचे 'ग्रंथसप्तक' विशेष महत्वाचे आहे.

आध्यात्माच्या अधिष्ठानावर, सदभिरुचीस रुचतील अशा बहुतेक सर्व रसांच्या मनोहर छटा, निसर्गाचीं रम्य वर्णनें, चित्तवृत्ति रंगविणाऱ्या, काव्यलतावलयावरून पिंगा घालणाऱ्या, फुलपाखरासारख्या तरल कल्पना, अनुभूतीचे दत्रमणी, हस्तिदंताने किंवा शंखाने घासून, एकाद्या वृक्षाच्या

खडबडीत सालीला आणलेल्या मृदुलतेप्रमाणे भाषेचें मार्दव, इत्यादि महानुभावीय काव्याचे विशेष होत.

शृंगाररसाच्या द्राक्षांचे हिरवे मळे उभविणारा 'शिशुपालवधा'चा कर्ता भास्करभट्ट बोरीकर हा महानुभावीय काव्यसाम्राज्ञीच्या गळयांतील मेरुमणी होय. हें मराठी भाषेतील पहिलें ललितकाव्य म्हणतां येईल. काव्याचें नांव 'शिशुपालवध' असलें तरी कर्वीनें त्यांतील शृंगाराचें काव्यकुंजच आपल्या उज्वल प्रतिभेच्या वसंत वैभवानें मोहरविलेले आहेत. हें काव्य वाचून **'प्राची नितंबिनिय मुखबिंब देळेनगेय्'** या ओळीनें सुरू होणाऱ्या लक्ष्मीकविकृत, कन्नड भाषेंत चंद्रप्रकाशाचें वर्णन केलेल्या यक्षभूमींतच आपण वावरत आहोंत की काय असा भास झाल्याशिवाय राहात नाहीं!

ऋद्धिपुर वर्णन अनुक्रमाने सातवा ग्रंथ असला तरी विषय महात्म्यानें पहिला म्हणतां येईल. हें ऋद्धिपुर आता जीर्णावस्थेंत आहे. पुष्करिणीमधील रम्यजल नाहींसे होऊन आता गाळ मात्र उरलेला आहे. भव्य देवालयांच्या महाद्वारासमोरील राजबिदी भग्नावस्थेत असली तरी कविप्रतिभेनें, तिचें भूतकालांतील दर्शन अमर करून ठेवलें आहे. दामोदर पंडित यांचे 'वत्सहरण' व आद्यकवयित्री महदंबाकृत 'श्रीकृष्ण रुक्मिणी विवाह पर धवळे' आणि 'मातृकी स्वयंवर' हे काव्यग्रंथ उत्कृष्ट प्रतीचे म्हणून म्हणतां येतील.

या शिवाय रवळो व्यासकृत ओविबद्ध 'सैह्याद्रि वर्णन[१]', विष्णुदासनामाकृत त्रोटक ओविबद्ध 'महाभारत', अवचितसुत (काशी) कृत श्लोकबद्ध 'द्रौपदी स्वयंवर', दीपराजसुत राघव महानुभाव यांचा 'वत्सला स्वयंवर', मुनि गोपाळदासकृत 'सुदाम चरित्र', आत्माराम संन्यासकृत 'भगवत्‌गीतेची आमोद टीका', मयंकशिष्य कविकृष्ण डिंभ याचा 'कृष्णलीला[२]', 'निष्कळंकपुराण[३]', गोपिराज विद्वांस यांचा 'दानव्रत कथा[४]', 'आरतीसंग्रह[५]'

१ यांत दत्तात्रय स्तुति आहे २ यातील ओवीचा विशेष हा की या ओवांचे चारी चरण समान असून चारी चरणांना सारखीं यमकें आहेत. ३ हा कृष्णार्जुन संवादरूप तत्वज्ञानात्मक ओवीबद्ध मराठी ग्रंथ आहे. याचा प्रतिलेखक भिवापुर येथील मणिराम महार होय. ४ या पोथींत वृत्तबद्ध चंद्रावळी आख्यान आहे. ५ हा उर्दू लीपींत व मराठी भाषेंत, ६५ वर्षांपूर्वी पंजाबांत छापलेला आहे.

मुकुंददास कवि डिंभ याचीं काव्यें व 'हंसाबा स्वयंवर', 'रुक्मिणी स्वयंवर' यावरील अभंग इत्यादि अनेक महानुभावीय काव्याचे चांगले नमुने म्हणून सांगतां येतील. या खेरीज जे शेकडो लहान मोठे चांगल्या प्रतीचे ग्रंथ आहेत त्यांची मोजदाद कोठवर करावी ?

महानुभावीय पंथाच्या संशोधनामुळे त्याचें उज्वल स्वरूप कसें प्रकाशांत आलें, इतिहासाच्या कार्याला कशी अमोल साधन सामग्री लाभली, मराठी भाषेवर कशी अनर्घ्य लेणीं चढविल्या गेली व त्याबद्दलचें संशोधन कार्य किती महत्वाचें होतें, याची कल्पना वरील विवेचनावरून सहजच होण्यासारखी आहे. "महानुभावीय सांकेतिक लिपी शिकून, ग्रंथाचा प्रत्यक्ष परिचय करून घेऊन, त्याबरोबरच महानुभावियांची परंपरा काय आहे, त्याची माहिती प्रमुख महंतांकडून मिळवून, डॉ. देशपांडे यांनी महानुभावीयाचें जें संशोधन केलें, त्याबद्दल मला विशेष आदर वाटतो. कै० चांदोरकर यांच्या विपरित संशोधनाने महानुभाव पंथासंबंधी झालेले गैरसमज दूर होण्यास, आप्पासाहेब यांचें संशोधन कार्य मुख्यतः कारणीभूत झालें" असे जे उद्गार श्री. ह. ना. नेने यांनी एका आठवणींत काढले आहेत ते योग्य नाहीत असें कोण म्हणेल ?

"शारदाश्रमच्या प्रस्तुतच्या सेवेने ( महानुभावीय वाङ्मय ) मराठीच्या प्राचीन इतिहासाचें केंद्रहि वऱ्हाडच ठरणार यांत संशय नाही." "वऱ्हाडांतच प्राचीन मराठी वाङमय अधिक सापडणार; ते शोधून काढण्याचें भाग्य तुमच्या संस्थेला लाभलें म्हणून अभिनंदन" इत्यादि प्रकारचे उद्गार अनुक्रमें कै. बाळकृष्ण अनंत भिडे व न. चि. केळकरांनी काढून, डॉ. देशपांडे यांचा यथोचित गौरव केलेला आहे. "श्री. देशपांडे यांनी स्थापन केलेल्या शारदाश्रमाने, संशोधनाची नवीन परंपरा या प्रांतांत सुरू केली. महानुभावीय वाङमय हें या प्रांताचें विशिष्ट सांस्कृतिक धन असून, त्याच्या संशोधनार्थ चालविलेल्या अविश्रांत परिश्रमाबद्दल श्री. य. खु. देशपांडे प्रभुतींना धन्यवाद दिले पाहिजेत"* अशासारखे अनेक अभिप्राय लक्षांत घेतां 'स्वतःला

* स्वागताध्यक्षीय भाषण कुलगुरु श्री. भवानी शंकर नियोगी यांचें. १८ वें महाराष्ट्र साहित्य संमेलन, नागपूर.

संस्थेचे अध्यक्ष वा चिटणीस म्हणून मिरवितां यावें, व लब्धप्रतिष्ठितांना आपल्या जिभेचा पट्टा चालवितां यावा' एवढ्याच महत्वाचें (!) हें कार्य नसून तें, एक आवश्यक राष्ट्रकार्य होतें, या बद्दल कोणासहि आता शंका घेण्याचें कारण उरणार नाही !!

## मार्कंड येथील शिलालेखाचें संशोधन

मार्कंड हा गाव चांदा जिल्ह्यांत आहे. मार्कंडेश्वराच्या देवळाभोवती वैदिक देवता, यज्ञसंस्था, मंदिराच्या कालांतील सामाजिक प्रसंग या संबंधी तळापासून वरपर्यंत कोरीव मूर्ति आहेत. या मूर्ति भारताचे मूर्तिशास्त्रावर विशेष प्रकाश पाडणाऱ्या आहेत. सभामंडपाचे खांबावर दोन लेख आहेत. एका खांबावरील अक्षर व टिका ५–६ व्या शतकांतील सारखी दिसते. दुसऱ्या खांबावरील लेखाला, कृष्णदेव यादवाच्या राजवटींतील, महाराष्ट्राच्या अगदी पूर्वटोकाचा मराठी शिलालेख म्हणून फार महत्व आहे. तत्कालीन मराठी लिपीच्या दृष्टीने हा लेख उल्लेखनीय आहे. इ काराची पद्धति, तसेच ऊ सारखे काढलेले ओ चें रूपहि, लेखाच्या प्राचीनत्वाची साक्ष देतात. व्याकरणाच्या दृष्टीनेहि या लेखाचें महत्व कमी नाही. अकारान्त नामाची उकारान्त रूपें, तो या सर्व नामाचे तेहाचा हें षष्ठीचे रूप आणि चतुर्थीचें अकारान्त रूप हीं लक्षांत घेण्यासारखी आहेत.

## उनकेश्वरचा शिलालेख (यादवकालीन मराठी)

उनकेश्वर उर्फ उनकदेव हे स्थळ निजाम सरकारचें हद्दींत आहे. येथे गरम पाण्याचे झरे आहेत. झऱ्याचें मुखाचें ठिकाणीं दगडी कुंडें बांधलेलीं आहेत. गायमुखाच्या दगडी पन्हाळांतून, एका कुंडांतील पाणी शेजारींच बांधलेल्या दुसऱ्या कुंडात पडते. एका लहान कुंडांत कुष्ठादि रोग्यांना आंघोळी करण्याची परवानगी आहे. एका कुंडातलें पाणी इतके गरम आहे की, यात्रेकरूंनी तांदुळ देऊन त्याची पुरचुंडी करून त्या कुंडांत भरून टेवावी. स्नान पूजा वगैरे होईपर्यंत भात शिजून तयार होतो असें म्हणतात. मंदिर कळाशीदार दगडाने बांधलेलें आहे. हें मंदिर केव्हा व कोणी बांधलें इत्यादिबद्दलचा शिलालेख सभामंडपाच्या भिंतींत बसविलेला दृष्टीस पडतो. दुसरा शिलालेख या मंदिराचा जीर्णोद्धार केल्याबद्दलचा आहे. तिसरा शिलालेख

जवळच्या दीपमाळेवर बसविला असून, ही दीपमाळ कोणी बांधली याचा त्यावर उल्लेख आहे.

वर नमूद केलेल्या शिलालेखांपैकी एक यादवकालीन मराठी शिलालेख विशेष महत्वाचा आहे. प्रथम ओळींत शक दिला आहे १२११. त्यावरून ज्ञानेश्वरीच्या एक वर्ष अगोदर हा शिलालेख लिहिलेला आहे असें दिसतें. या शिलालेखावरून मराठीच्या निरनिराळ्या अंगांचा बोध होतो.

त्यावेळीं प्रताप श्री रामचंद्र देव राजा होता. हेमाद्रि प्रधान होता. व्यंकदेव, सोमदेव पंडित व सरणु या तीन व्यक्ती आपणास प्रथमच कळतात. या शिलालेखावरून तत्कालीन मराठी भाषेचें अविकृत स्वरूप आपणास पाहावयास मिळतें.

या लेखावरून—

१ बाराव्या शतकाच्या अखेरीस देवनागरी मराठी भाषेचें स्वरूप, वर्णमाला कोणत्या स्वरूपाची होती हें समजतें. महानुभावीय सगळ लीपी ही तेराव्या शतकाच्या अखेरीस निर्माण झाली. त्या लीपीमध्ये संकेताचे जे वर्ण योजले आहेत, ते वर्ण वरील शिलालेखांतील वर्णांशीं जुळतात.

२ मराठी विरामचिन्हें इंग्रजी अमलानंतर प्रचारांत आलीं. पंधराव्या शतकानंतरच्या लिखाणांत वाक्यपूरणार्थ वगैरे अशा । एक, अगर अशा ॥ दुहेरी रेघेचा उपयोग करण्यांत येत असे. प्रस्तुत शिलालेखाच्या काळी असा: दोन उभ्या टिंबांचा उपयोग गद्यांत करीत असत. हीच पद्धति महानुभावीयांच्या बाराव्या तेराव्या शतकांतील गद्यांत दिसते व तीच महानुभावीयांनी कायम ठेवलेली आहे.

यादवकालीन आणखी लेख सापडलेले आहेत. बार्शी टाकळी येथील प्राचीन लेख, रोहिणखेडा येथील देवीच्या मंदिरावरील लेख, नांदगाव खंडेश्वर येथील लेख, इ०. हेमाडपंती देवळाच्या रूपाने यादवांचीं स्मारकें सबंध विदर्भांत विखुरलेलीं आहेत. महानुभावीय मराठी वाङ्मय यादवकाळांत उत्पन्न झालें. उपरोक्त ग्रंथामध्ये यादव घराण्याचा इतिहास जसा पाहावयास मिळतो, त्याचप्रमाणे विदर्भाचाहि इतिहास त्यांत गोवला गेला आहे.

## भांदक ताम्रशासन

या 'ग्रँट' मधील उल्लेखिलेलीं गावें यवतमाळ जिल्ह्यांतीलच आहेत. या ग्रँटमधील नांदीपूर हें गाव, सध्याचे बेंबळा नदीतीरावरील नांदूरा असावें, असें डॉ. देशपांडे यांचें मत होतें. श्री. दीक्षित (माजी डायरेक्टर जनरल ऑफ ऑर्किऑलाजी, इंडिया) यांच्याशीं त्यांनी याबद्दल विचार विनिमय केला. व दीक्षित यांनी त्या विचारविनिमयाच्या आधारें १९२२ मध्ये, कलकत्ता येथे भरलेल्या प्राच्यविद्या परिषदेच्या द्वितीय अधिवेशनापुढे, या विषयावर निबंध वाचला; त्यांत नांदिपूर म्हणजे नांदूरा, हें मत निश्चित प्रतिपादिलें आहे. नांदिपूर येथे मुक्काम असतांना, राष्ट्रकूट कृष्ण १ ला याने उदुंबरमन्ती येथे असलेल्या आदित्याच्या मंदिराला, णगणपुरी हा गाव दान दिला होता.

दीक्षितांनी जो निबंध वाचला, त्यांतील कांही भाग पुढीलप्रमाणे आहे:-

"The Bhandak grant is the first record of Rastrakutas to be discovered so far, north-east of their dominions. In the present case Rai Bahadur Hiralal has proposed to identify the places.........in Amraoti and Wardha districts. I consulted a friend of mine, from Yeotmal, Mr. Y. K. Deshpande. With the help and information received from him I am now able to indentify the localities. The place where the king encamped, was Nandipura or Nandura. The place suggested by Rai Bahadur Hiralal was Nandura in Wardha Tahasili, which is to be rejected. Rai Bahadur Hiralal points out उमरावती is the modern equivalent for उदुंबरमन्ती, but the modern town of Amraoti, besides being too far from the localities in question.......The old town उदुंबरमन्ती is modern town of Rani Amraoti in Yeotmal Taluq, about five miles south-west of Nandura."

वरील ग्रँट संस्कृतमध्ये आहे. हीं गावें केवळ वऱ्हाडमधीलच नव्हे, तर खुद्द यवतमाळच्याच आसपासचीं असल्यामुळे यवतमाळच्या लोकांना या ग्रँटबद्दल जास्तच कुतुहल वाटावयास हवें. णगणपुरी=गणोरी. हें नांव येथील

वकील श्री. पु. बा. गणोरकर देशपांडे यांच्याच गावाचें आहे. गणपुरी=गणोरी. व एका गावचें नांव तर खुद्द माझ्याच गावचें आहे. तें म्हणजे कवठा=कोठा. गणपुरी-च्या चतुःसीमा ताम्रपटांत अगदी निःसंदिग्ध दिसून येतात. उदुंबरमन्ती=उमरावती. नागामा=नायगाव. अंतरैग्राम=अंतरगाव. कपित्थग्राम=हें हल्ली कोठे दिसत नाही, पण त्याचे जागीं हल्ली बाभुळगाव नावाचें गाव आहे. आदित्याच्या देवळाचे दगड सध्याहि तेथे पडलेले दिसतात. त्या ठिकाणीं मुसलमानांचा निमाजगा आहे. देवतटाक व राजनीतटाक या तळ्यांचा ताम्रपटांत उल्लेख आहे. हा ताम्रपट ८ व्या किंवा ९ व्या शतकांतील आहे. या ताम्रपटावरून राष्ट्रकूटांच्या राज्याची मर्यादा नांदीपूरपर्यंत होता, हा महत्त्वाचा व निश्चित शोध लागलेला आहे.

## कायरचे सातवाहनकालीन लेख

डॉ. देशपांडे हे कायर ता० वणी येथे संशोधन कार्यार्थ गेले असतांना, त्यांना मारोतीच्या ओट्यामध्ये मढलेला एक अडीच फुटी शिलालेख पाहावयास मिळाला. त्यांतील ब्राम्ही लिपींतील दोन ओळी मजकूर उपलब्ध झालेला आहे. पहिल्या ओळींतील 'महासेनापती' एवढाच शब्द लागलेला आहे. हें दानपत्र महासेनापती (Military governor) चें असावें. वणीच्या भागांत सातवाहनांचें राज्य होतें आणि तो भाग (Military governor) च्या ताब्यांत होता असें या शिलालेखावरून अनुमान होतें. हा शिलालेख दुसऱ्या शतकामधील असावा, असें त्यांतील अक्षरवटिकेवरून दिसतें. तसाच कायर येथे सापडलेला एक दुसरा शिलालेख शारदाश्रमांत आहे. तोहि ब्राम्ही लिपींतच असून त्याचाहि काळ दुसऱ्या शतकाचाच असावा. त्या शिलालेखांत ब्राम्ही लिपींतील '**घरे दया पेक्क पच्छी**' अशीं अक्षरें आहेत. याचा अर्थ 'घरोघर दयेचा प्रसार करावा' असा आहे. हें एकाद्या जैनग्रंथामधील सूत्र असावें असा अंदाज आहे. या व इतर सातवाहन कालीन लेखाचें प्रकाशन अजून व्हावयाचें आहे.

## वाकाटकांचीं ताम्रशासनें

आजवर वाकाटकांचे जे ताम्रपट प्रसिद्ध झाले, त्यापैकी कांही रामगिरी-(रामटेक,) नंदिवर्धन (नागपूरकडील नागरधन) वत्सगुल्म व प्रवरपूर

येथून दिल्या गेलेले आहेत. प्रवरपूर कोठे आहे याचा अद्याप शोध नाही. रा. ब. का. ना. दीक्षित व डॉ. देशपांडे हे १९३० सालीं, पौनार येथील अवशेषाचें निरीक्षण करीत असतांना, पौनार हेंच प्राचीन वाकाटकांचे प्रवरपूर असण्याचा संभव आहे, असें दीक्षित यांनी मत व्यक्त केलें होतें; पण अद्याप त्याबद्दल निश्चित पुरावा मिळालेला नाही. पाटण्याचे क. डॉ. जयस्वाल यानी History of India (150 A. D. to 350 A. D.) लिहिलेला असून, त्यांत वाकाटकासंबंधीची माहिती दिलेली आहे. डॉ. जयस्वालचे मत नाचना आणि गंज येथील शिलालेख हे वाकाटकासंबंधी सर्वात जुनें लिखाण होय, असे होतें, पण प्रा. म. म. मिराशी यांनी डेवटेकच्या शिलालेखावरील लिखाण हें वाकाटकासंबंधी सर्वांत जुनें लिखाण आहे असें दर्शविलें होतें. विंध्यशक्ति ताम्रशासन प्रकाशित होईपर्यंत, प्रभावती गुप्ता हिने, नंदिवर्धन वरून काढलेलें ताम्रशासन, हा वाकाटकासंबंधी सर्वात जुना लेख आहे, असें मानल्या जात होतें.

## विंध्यशक्ति ताम्रशासन

वाकाटकांचें विंध्यशक्ति हें ताम्रशासन वाशिम येथे मिळालें. श्री० द. बा. महाजन यांच्याकडे ते डॉ. देशपांडे यांना पाहावयास सापडलें. हा ताम्रपट नारायणराव धनागरे वकील वाशिम व त्यांचे वडील बंधु श्री० वासुदेव शास्त्री, यांच्या परिश्रमाने उजेडांत आला. डॉ. देशपांडे यांनी या ताम्रपटाचा छाप घेऊन, त्याचें वाचन केलें व त्यावरील लेख कलकत्ता येथे १९३९ सालीं 'ऑल इंडिया हिस्ट्री कॉंग्रेस'च्या अधिवेशनामध्ये विद्वत्सभेसमोर वाचला. या ताम्रपटामध्ये वाकाटकवंशीय विंध्यशक्ति राजाने वाशीम (वत्सगुल्म) येथील विद्वान ब्राम्हणांना, वत्सगुल्म येथूनच दान दिल्याचा उल्लेख आहे. या ताम्रपटाचा काल साधारणपणे इ. स. च्या तिसऱ्या चवथ्या शतकांत येतो. त्यावेळीं वत्सगुल्माचा वाकाटकांशीं घनिष्ठ संबंध होता व त्यावेळीं भिन्न गोत्रांचीं अनेक विद्वान ब्राम्हण घराणीं याठिकाणीं वास करीत होतीं हें निश्चित दिसून येतें. या ताम्रपटाचा विशेष हा की त्याची पहिल्या पानाची भाषा संस्कृत आहे व बाकीच्या पांच पानांची भाषा तत्कालीन

प्राकृत असून, त्यावरून चौथ्या शतकांत तेथे प्रचलित असलेल्या भाषेचें स्वरूप लक्षात येतें. मराठी भाषेचा इतिहास लिहिण्यास या ताम्रशासनाचा चांगला उपयोग होण्यासारखा आहे. तत्कालीन सामाजिक, राजकयि वगैरे इतिहासावर प्रकाश पाडण्याच्या दृष्टीनेहि या ताम्रशासनाचें महत्व आहे. वाकाटकाचे (हा ताम्रपट सोडून) सारे ताम्रपट संस्कृतमध्ये आहेत. यावरून वाकाटकाच्या राज्यांत संस्कृतचें पुनरुज्जीवन (Revival) झालें असावें, या डॉ. जयस्वालच्या म्हणण्याला पुष्टी मिळते.

या ताम्रपटाची भाषा, वररुचीच्या महाराष्ट्री भाषेच्या नंतरच्या व्याकरणाला अनुसरून आहे. तिच्यांतील प्राकृत भाषेमुळे हें ताम्रशासन जास्तच महत्वाचें झालें आहे. ताम्रशासनाची भाषा, लोकांना समजावी म्हणून कांहीशीं लोकभाषेसारखी (Colloquial) आहे. या ताम्रपटाची भाषा, या विभागामधील मराठी भाषेच्या सुरवातीच्या अवस्थावर प्रकाश पाडण्यास उपयुक्त होईल, एवढेच नव्हे तर भाषाविषयक अनेक संशयित प्रश्नांचाहि तिच्या योगाने उलगडा होण्यासारखा आहे.

म. म. प्रा. मिराशी यांनी नागपूर युनि. हिस्टॉरिकल सोसायटीच्या ॲन्युअल बुलेटिन (सन १९४६) मध्ये मध्यप्रांत-वऱ्हाडमधील वाकाटक वंशासंबंधाने शोधपूर्वक विस्तृत लेख लिहिलेला आहे. उपलब्ध साधनावरून प्रा. मिराशी यांनी वाकाटक वंशाचा सुसबंद्ध इतिहास प्रकाशांत आणलेला आहे. वाकाटकांच्या विंध्यशक्ति ताम्रशासनाचें प्रा. मिराशी यांनी 'एपिग्राफिआ इंडिका' मध्ये संपादन केलें आहे. वरील ग्रँटमध्ये विंध्यशक्ति पाहिला याचें दानपत्राचा उल्लेख आला आहे. पण डॉ. डी. सी. सरकार, कलकत्ता, आणि प्रा. मिराशी यांनी सुचविल्याप्रमाणे, वाकाटक वंशांत दोन विंध्यशक्ति झाले असून, वाशीम येथून दान देणारा, दुसऱ्या नंबरचा विंध्यशक्ति होता असें स्पष्ट दिसतें. या संबंधी प्रा. मिराशी यांनी हैद्राबाद ऑर्केऑलॉजिकल सिरीज नं. १४ मध्ये, आणि सह्याद्रि (वर्ष ११ अंक ७ जुलै १९४९) मध्ये विवेचन केलें आहे.

## नन्नराज याचें दानपत्र

डॉ. देशपांडे यांना १९४८ मध्ये आकोल्याला श्री० एम्. डब्ल्यू. समुद्र ॲडव्होकेट यांचे मार्फत, ऐतिहासिक दृष्टीने एक फार महत्त्वाचा ताम्रपट मिळाला. हा ताम्रपट शके ६१५ चा म्हणजे इ. स. ६९३ चा आहे. एलिचपूर येथे सातव्या शतकांत राज्य करीत असलेल्या राष्ट्रकूट नन्नराज अपरनाम युद्धासुर या राजाचें तें दानपत्र आहे. आजवर या राजाचे दोन ताम्रपट अनुक्रमे सन १८९९ व १९१० मध्ये उपलब्ध झाले होते. या नवीन ताम्रपटाच्या उपलब्धीमुळे या राष्ट्रकूट शाखेसंबंधाने प्राच्य विद्वानांनी (डॉ. फ्लीट, डॉ. हिरालाल व डॉ. अळनेकर) पूर्वी जी अनुमानें बांधलीं होतीं, त्यापैकी कांही अनुमानें बदलून, एलिचपूरच्या राष्ट्रकूट शाखेच्या इतिहासावर बराच नवीन प्रकाश पडलेला आहे असे डॉ. दशपांडे सांगतात. हा ताम्रपट संस्कृतमध्ये असून, त्यावेळच्या ब्राम्ही लीपीमध्ये कोरलेला आहे. त्याचे एकूण तीन पत्रें (Plates) असून, मधल्यावर मागील व पुढील मजकूर मजकूर लिहिलेला आहे. या संबंधीचा शोधनिबंध 'पराग' या ऐतिहासिक मासिकांत प्रकाशित झालेला आहे.

डॉ. देशपांडे यांनी आतापर्यंत १) महानुभावीय मराठी वाङ्मय २) ऋद्धि-पूरवर्णन, ३) चक्रपाणी चरित्र, ४) एलिचपूर वर्णन इत्यादि ग्रंथ प्रकाशित केलेले आहेत व 'वऱ्हाडी लोकगीतें,' 'मेवाडचे वीर' 'विष्णुदासाची कविता' (भाग २ रा), 'वत्सगुल्म' इत्यादि ग्रंथाच्या प्रस्तावना लिहिलेल्या आहेत. यापैकी 'वत्सगुल्म महात्म्य' या ग्रंथाची छापील शंभर पानांची विस्तृत प्रस्तावना विशेष उल्लेखनीय आहे.. या प्रस्तावनेकरता त्यांनी जवळजवळ तीन वर्षे अभ्यास केला व वत्सगुल्माशीं संबंध असलेले शिलालेख, ताम्रपट, काव्यें, पुराणें इत्यादि मूळांतून वाचली. त्यांत त्यांनी 'पौराणिक कथांची सत्यासत्यता' 'वाकाटकांचे ताम्रपट,' 'वात्सोमी रीति,' 'स्थळाचें ज्योतिःशास्त्रविषयक महत्व,' 'मुसलमान-कालीन वाशीम,' 'उदाराम कालु इत्यादि घराणी,' 'पुराणाचा काल,' 'नृत्य गायनादिकला,' 'कर्मविपाक' 'महात्म्यकार व स्त्री वर्ग' 'महा-त्म्यांतील काव्य व सुभाषितें' इत्यादि अनेक महत्वाच्या विषयांचा परामर्ष घेतलेला आहे.

या शिवाय त्यांचे 1) History of Raje Udaram, 2) Maharastra under the Satvahanas 3) Formation and development of Marathi Language इत्यादि संकल्पित ग्रंथ आहेत.

डॉ. देशपांडे यांनी प्रथम महानुभावीय संशोधनापासून सुरवात करून, आता पुरातन अवशेष संशोधनाच्या निरनिराळ्या दालनांकडे आपल्या कार्याचा ओघ वळविला आहे.

## डॉ. देशपांडे यांच्या पुढील कार्याची रुपरेषा

डॉ. देशपांडे मराठी भाषेची उत्पत्ति, घटना व विकास या संबंधी इंग्रजी भाषेमध्ये एक ग्रंथ लिहीत आहेत. त्याचे दोन भाग होतील.

पहिल्या भागांत महाराष्ट्रांतील राजकीय, सामाजिक, धार्मिक इत्यादि ऐतिहासिक घटनांचा मराठी भाषेवर कसा परिणाम होत गेला याचें, व दुसऱ्या भागांत महाराष्ट्रांतील इतर भाषांचा मराठी भाषेवर कसकसा परिणाम होत गेला याबद्दल, विवेचन येणार आहे.

राजकीय, सामाजिक, आर्थिक वगैरे परिस्थितीमुळे निरनिराळ्या प्रांतांचा एकमेकाशीं संबंध येऊन, त्या संघर्षामुळे त्या त्या प्रांताच्या भाषेंत फरक पडत जातात.

महाराष्ट्रावर सातवाहन, वाकाटक, पूर्वचालुक्य, राष्ट्रकूट, उत्तर चालुक्य व यादव इत्यादिकांचे राज्य होतें व त्याचप्रमाणे वैदिक, जैन, बुद्ध या तीन प्रमुख धर्मांचा महाराष्ट्रांत प्रसार झाला. या सर्वांचा परिणाम भाषेवर होऊन, ती निरनिराळ्या स्थित्यंतरांतून गेल्यामुळे, तिच्या स्वरुपांत बदल होणें अपरिहार्यच होते.

एका भाषेचा दुसऱ्या भाषेवर सांस्कृतिक दृष्टीने कसा परिणाम होतो, हें पाहणें मनोरंजक, उद्बोधक एवढेच नव्हे तर भाषाशास्त्राच्या दृष्टीने आवश्यकहि आहे. उ० आर्यांच्या भाषेवर, आर्यांच्या खालच्या थरांतील लोकांच्याच भाषांचा परिणाम झाला असे नव्हे, तर उत्तर ध्रुवाकडून भारतांत येतांना, त्यांचा ज्या परकीय लोकांशीं सहवास झाला, त्यांच्याहि भाषांचा परिणाम

झालेला आहे. ऋग्वेदामध्ये सुद्धा खाल्डि लोकांच्या भाषेंतून शब्द आलेले दिसतात. त्यांत कांही शब्द वैदिक भासत असले तरी, त्यांचें मूळ म्लेंच्छ भाषेंत आहे असे मीमांसकारांनी जैमिनीसूत्रांत दर्शविलेलें आहे.

भारतीय आर्य भाषेच्या वैदिक स्वरूपापासून, पुढे अनेक रूपांतरें होत होत आजच्या मराठीचें स्वरूप बनलेलें आहे. आजपर्यंत तिच्यावर आर्यांच्या अनेक बोली, वैदिक, संस्कृत, व प्राकृत भाषा यांचे संस्कार झालेले आहेत. संस्कृत भाषेपासून निरनिराळ्या प्राकृत भाषा उत्पन्न झाल्या, त्यांपैकी महाराष्ट्री प्राकृत भाषेवरच मुख्यःत मराठी आधारलेली असली तरी, पाली, मागधी वगैरे प्राकृत भाषाचेंहि ऋण तिने घेतलेलें आहे. संस्कृत अपभ्रष्ट अनेक शब्दांचा भरणा तींत झालेला आहे. त्याच प्रमाणे बंगाली, सिंधी, गुजराथी याहि भाषांशीं तिचें नातें आहे. मराठीवर द्राविडियन भाषा (विशेषतः कानडी) व अरेबिक, पोर्तुगीज इत्यादि भाषांचाहि परिणाम झालेला आहे असें दिसून येईल.

पाश्चात्य पंडित जुले ब्लॉक (Jules Bloch), सर ग्रिअर्सन, व भारतीय पंडित भांडारकर, गुणे, राजवाडे, यांनी मराठीच्या उत्पत्ति, घटना व विकास या संबंधी मौलिक लिखाण केलेलें आहे. प्रो. कुळकर्णी यांचें, बाकीच्या पंडितांचें, या संबधांचे लिखाण, एका ग्रंथांत एकत्रित करण्याचें कार्य उल्लेखनीय आहे. "Linguistic Survey of India" या ग्रंथांत मराठीच्या अनेक उपभाषांचीं वैशिष्ट्यें दिलेलीं आहेत.

"De La Langue Maratte" या ग्रंथाचे कर्ते जुले ब्लॉक यानीं इंडो आर्यन भाषावरील लिखाण १९३० सालीं प्रकाशित केलें आहे. या भाषांच्या अभ्यासाबद्दलचें हेच पहिलें शास्त्रीय लिखाण होय. डॉ. टर्नर (नेपाली), डॉ. चाटर्जी (बेंगाली), डॉ. कात्रे (कोंकणी) यांचें, इंडोआर्यन भाषांच्या संबंधी लिखाण आहे. १८०० सालीं बीम्स याने हिंदुस्थानच्या आधुनिक भाषांचें तुलनात्मक व्याकरण लिहिलें आहे.

इंडो आर्यन भाषांचा तुलनात्मक अभ्यास, मराठी भाषेचा उत्पत्ति व विकास दाखविण्याकरिता फार उपयोगी पडण्यासारखा आहे. वरील सर्व

विद्वानांच्या ग्रंथांच्या आधाराने या भाषांशीं मराठीचा नक्की कसा संबंध आहे, व एकमेकावर त्यांचा कसा परिणाम झाला, याबद्दलचें विवेचन डॉ. देशपांडे यांनी आपल्या ग्रंथांत करण्याचें योजलें आहे. सर्वस्पर्शी (exhaustive) आणि अधिकृत (authoritative) अशी 'मराठी भाषची उत्पत्ति व विकास' अजून लिहिल्या गेला नाही, असें डॉ. देशपांडे यांचे मत आहे व हें लक्षांत घेऊन ते आपली ग्रंथ रचना करणार आहेत. पुढील प्रगती होण्यास कोणत्याहि क्षेत्रांत वाव असतोच; पण आतापर्यंत या विषयावर एवढे सुरेख व सुस्पष्ट लिखाण झालें आहे की, डॉ. देशपांडे यांच्या या ग्रंथाने त्यांत विशेष भर पडेल की काय अशी शंका मात्र मनास चाटून गेल्याशिवाय राहात नाही!

## द्रविडियन भाषांचे मराठीवर परिणाम

मराठी ही प्रमुख इंडो-आर्यन भाषा आहे. द्रविडियन भाषांचा-विशेषतः तेलगु व कानडी या भाषाचा मराठी भाषेशीं बराच संबंध आहे. महाराष्ट्र हा आंध्र व कर्नाटक यांच्या उत्तरेच्या बाजूने लागूनच असल्यामुळे, त्या दोहोंमध्ये, भाषाच्या घटनांच्या आगोदरपासूनच दळणवळण होतें. प्राचीन राजकीय इतिहास असे दर्शवितो की, महाराष्ट्राचें द्रविडियन देशावर, कित्येक शतकें स्वामित्व होतें, तर आंध्र व कर्नाटक यांचेहि महाराष्ट्रभागावर, बराच काल वर्चस्व होतें. यामुळे, व महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्यांतील इतर सर्व संबंधामुळे, संस्कृति-संगम घडून आलेला आहे. बिशप कॉल्डवेलने, वरील देशांच्या भाषाचे एकमेकावर परिणाम, द्रविडियन भाषाचें व्याकरण लिहून दाखविले आहेत. आल्फ्रड मास्टरने त्याच्या "Some parallelisms in Indo Aryans and Dravidians, with special reference to Marathi, Gujrathi and Kanerese"* या लेखात या संबधी आपल्या स्वतःच्या अभ्यासाचे निष्कर्ष दिलेले आहेत; व्ही. के. राजवाडे व प्रो. जोशी यांनी विशेषतः ज्ञानेश्वरीच्या संदर्भाने, द्रविडियन भाषांचे मराठीवर परिणाम दाखविलेले आहेत.

वरंगळचा राजा काकतीय रुद्रदेव, याचा समकालीन कवी पारकुरकी सोमनाथ, याने 'वृषाधिप शतक' या नांवाचा ग्रंथ लिहिलेला आहे. त्याने संस्कृत, कानडी, तेलगू, तामील वगैरे भाषेमध्ये, लिंगायत धर्माचा मूळ संस्थापक बसव, याच्या स्तुतीपर श्लोक केलेले आहेत. त्या ग्रंथामध्ये एरिया

*बी. बी. आर्. ए. सोसायटी जरनल १९३२

( आर्य ) भाषेमधून, बसवाची आता स्तुति करतो असें लिहून, मराठी पद्य दिलें आहे.

" देव परी तुम्हीच
गरुदेव म्हणुनु तरि तुम्हीच
गोसावी तरी तुम्हीच
तुमचाच प्रसाद आम्ही
कृपा करा हे वरदा "

हा बाराव्या शतकांतील ग्रंथ प्रकाशित झालेला असून, आर. सुब्बाराज ( हेड ऑफ तेलगु डिपार्टमेंट, उस्मानिया युनिव्हर्सिटी ) यांनी प्रो. भुसारी यांच्या निदर्शनास आणला व त्यांनी तो देशपांडे यांना दाखविला. पुढचा सर्व ग्रंथ तेलगु भाषेंत आहे.

तेलगु भाषेंतील 'अभिलषितार्थ चिंतामणी' या ग्रंथामध्येहि दशावताराच्या स्तुतीपर असे बरेचसे श्लोक आहेत व ते कानडी, तेलगु, संस्कृत, व्रज, बंगाली व मराठी भाषा यांत आहेत. त्यामध्ये चार मराठी पद्यें आहेत. त्यापैकी दोन पूर्वी राजवाड्यांनी प्रकाशित केलीं होतीं. बाकीचीं दोन पद्यें डॉ. देशपांडे यांच्या नजरेला आलीं व तीं त्यांनी भारत इतिहास संशोधक मंडळाकडे प्रकाशनार्थ पाठविलीं होतीं. तीं अशीः—

" जेणे रसाळउणु मत्स्यरूपे वेद आणियले ।
तो संसारसायरतारणु महते राखो नारायणु ।
जो सुवरूपे पायलु पैशी दाणवु
हरिणकछपु माचवी दाढ गोविंद धरणी
उद्धरिअे सो देउ ।
बुद्धरूपे दानवसुरावंचवुनी वेद दुषणु
बोल्लवुणी मायामिहिया त देऊ माझी पसाऊ करु ।

अशी दुसरीहि कित्येक स्थळें दर्शवितां येऊन, निरनिराळ्या भाषांचा एकमेकावर कसा परिणाम होतो हें दाखवितां येईल.

## अरेबिक भाषेचा मराठीवर परिणाम

महाराष्ट्र सुमारे सहा शतकें मुसलमान अमलाखाली होता; त्यामुळे परशिअन, अरेबिक या भाषांचा परिणाम मराठीवर झाला आहे. मराठी वाङ्मयावर झालेल्या परिणामापेक्षा, अर्थातच मराठी बोलीवर जास्त परिणाम झाल्याचें दिसून येतें.

## पोर्तुगीज भाषेचा मराठीवर परिणाम

यूरोपीयन राष्ट्रांपैकीं, सर्वांत आगोदर, पोर्तुगीजांचा हिंदुस्तानशीं संबंध येऊन, त्यांनी कांही भागावर सत्ता प्रस्थापीत केली होती व त्यांनी येथे ख्रिश्चन धर्माचा प्रसार करण्याकरता सुरवात केली. अनेक लोकांचें ख्रिश्चन धर्मांत जबरदस्तीने धर्मांतर केलें गेल्यामुळें, गोव्यांतील ख्रिश्चन धर्मप्रसाराची कहाणी अत्यंत कारुण्यपूर्ण आहे! या धर्मांतरीत लोकांकरता ख्रिश्चन वाङ्मयाचें मराठींत भाषांतर करण्यांत आलें होतें. इंग्लिश जेसुइट फादर स्टिफन याने मराठी ओवीबद्ध असें ख्रिस्तपुराण तयार केलें व त्याचाच कित्ता कित्येक यूरोपीयन जेसुइट्सनी गिरवून, मराठी व कानडीमध्ये वाङ्मय निर्माण केलें. १७ व्या शतकांतील हें वाङ्मय मराठीच्या दृष्टीने बरेंच महत्वाचें असलें तरी, त्याच्या मागील आसुरी इतिहासाने तें डागळलेलें आहे! त्यांनी मराठी भाषेंत पुष्कळ आरमारी शब्द, हत्यारांचीं नावें, खलाशांची बोली, यूरोपीय पदार्थांचीं व पशुपक्षांचीं नांवें इत्यादि आणून तिला थोडेबहुत समृद्ध केलें आहे.

## इंग्रजी भाषेचा मराठीवर परिणाम

डॉ. कॅरे यांनी १८०६ सालीं मराठी व्याकरण इंग्रजींत लिहिलें. या अमदानींतील बऱ्याचशा गद्य व पद्य ग्रंथावर इंग्रजी वाङ्मयाची छाप पडलेली आहे. नियतकालीकें व वृत्तपत्रें सुरू झालीं. मराठी वाङ्मय व इतर भाषांतील वाङ्मयांनी इंग्रजी राजवटींत प्रगतीचा बराचसा पल्ला गाठलेला आहे.

महानुभावीय पंथियांनी ज्ञानेश्वरीच्या थोडक्याच काळाच्या अगोदर गद्य वगैरे ग्रंथरचना करावयास सुरवात केली. हें सर्व वाङ्मय देवगिरीच्या यादव-

कालीन आहे डा. वि. भि. कोलते व प्रा. ह. ना. नेने यांनी महानुभावीय लिखाणामधील व्याकरणाची व इतर वैशिष्ट्यें शोधून काढलेलीं आहेत.

डॉ. देशपांडे यांनी आपला ग्रंथ इंग्रजी भाषेंत लिहिण्याचें ठरविलें, हें निःसंशय स्वागतार्ह आहे. मराठी भाषेंतील संशोधन केवळ महाराष्ट्राच्या चार भिंतींतच घुटळमळत राहून, बाहेरील जगास त्याची कांही दःखल असूं नये, हें खचित स्पृहणीय नाही. महाराष्ट्रीय संशोधन, आंतर्राष्ट्रीय संशोधनाच्या मान्यतेस मंजूर व्हावयाची महत्वाकांक्षा असल्यास, इंग्रजीसारख्या जगन्मान्य भाषेचा कास धरल्याशिवाय गत्यंतर नाही! इतिहासाचार्य राजवाडे यांचें संशोधन इंग्रजामध्ये न झाल्यामुळे, महाराष्ट्र-भाषासंशोधनाचा किती तोटा झाला हें पुढील दोन तज्ज्ञांच्या उद्गारावरून दिसून येण्यासारखें आहे.

"मराठी भाषेशिवाय इतर भाषेने मी आपली लेखणी विटाळणार नाही, हा कै. राजवाडे यांचा अभिमान त्यांच्या श्रेष्ठ देशभक्तीचा निःसंशय द्योतक होय. परंतु या इतिहासाचार्याने केलेल्या प्रचंड कार्याचा प्रसार, इतर सहव्यवसायी भिन्नवाङ्मयोपासकांत न झाल्यामुळे, त्यांच्यापेक्षा कमी दर्जाच्या अनेक बंगाली व तामील लेखकांना, संशोधक व इतिहासज्ञ म्हणून जगतांत सहज मिरवितां आले; व सर्व महाराष्ट्रीयांच्या परिश्रमपूर्वक चालविलेल्या संशोधनप्रयत्नांबद्दल सर्वत्र प्रतिकूल ग्रह निर्माण करता आले. मायभाषेंतून चाललेल्या, महाराष्ट्रीय संशोधनाच्या कार्याचें ज्ञान, इंग्रजीसारख्या जगाच्या बाजारांत चालणाऱ्या भाषेंतून, कोणी परकीयास करून देत नसल्याने, मराठी इतिहास बदलेले तरी, इंग्रज इतिहासकारांची दृष्टि अजून पूर्वीसारखीच आहे!!"*

"विशेषतः मराठी इतिहासाचें संशोधन राष्ट्रपोषक व राष्ट्रसंवर्धक व्हावयाचें असेल तर, राजवाड्यांच्या संशोधनांतील महत्वाचे मुद्दे हिंदुस्थानास कळणाऱ्या इंग्रजी भाषेंत बाहेर आले पाहिजेत. दोन हजार पानांत त्यांच्या

* लो० मा० श्री० अणे; अध्यक्षीय भाषण; ग्वाल्हेर महाराष्ट्र साहित्य संमेलन.

संशोधनाचें सार इंग्रजींत दिल्याशिवाय राजवाड्याच्या श्रमाचा उपयोग राष्ट्रेतिहासास बिलकूल होणार नाहीं!!*

स्वतंत्र भारतांत इंग्रजी भाषेचा अस्कारा, निदान व्यवहारांत जरी पूर्वीइतका राहणार नसला, तरी कोणत्याहि विचाराचा जागतिक प्रसार करण्याच्या व जागतिक मान्यता मिळण्याच्या दृष्टीने, निदान वाङ्मयप्रांतांत तरी इंग्रजी भाषेचें महत्व कमी होण्याचें कारण दिसत नाही!

डॉ. देशपांडे यांच्या इंग्रजी भाषेचा नमुना म्हणून त्यांचें १९४९ सालच्या, प्राच्यविद्यापरिषदेचें मराठी शाखेचें अध्यक्षीय भाषण (Presidential address) वाचनीय आहे. त्यांत मांडलेले विचार व भाषापद्धति ही लक्षांत घेतां त्यांचा संकल्पित ग्रंथ "Formation and Development of Marathi Language" चांगला होईल अशी आशा आपण करूं या. डॉ. देशपांडे यांच्या 'स्वतंत्र संशोधना'च्या शेवटीं एवढे नमूद करून ठेवावेसें वाटतें की, त्यांच्या संशोधनांत कांही उणीवा आहेत, त्यांचा विचार पुढच्या कोणत्या तरी प्रकरणांत करतां येईल.

* राजवाडे आणि त्यांचें संशोधन – गो. स. सरदेसाई; विद्यासेवक.

————

# यूरोपची यात्रा* • • • ४.

१९३७ च्या जुलैमध्ये झ्यूरिच (स्वित्झरलंड) येथून, आंतर्राष्ट्रीय इतिहास परिषदेचे प्रमुख कार्यवाह प्रो. हाफमन यांचें, शारदाश्रम यवतमाळ या संस्थेला, वरील परिषदेकरता प्रतिनिधी पाठविण्याबद्दलचें आमंत्रण आलें. संस्थेच्या प्रगतीच्या दृष्टीनें, प्रतिनिधी पाठविणें आवश्यक असल्यामुळे, संस्थेच्या कार्यकारी मंडळाने मला पाठविण्याचें ठरविलें. संस्थेजवळ पुरेसा द्रव्यनिधी नसल्याने थोडीशी अडचण भासली. पण संस्थेचे अध्यक्ष श्री. बापूजी अणे यांनी खर्चासंबंधी व्यवस्था होईल, असें आश्वासन देतांच ती अडचण दूर झाली. निमंत्रण स्विकारल्याचें प्रो. हाफमन यांना कळविण्यांत आलें.

केसरी ट्रस्ट फंडाच्या शाखेच्या सभासदांनी यूरोपच्या प्रवास खर्चाकरता एक हजार रुपये मंजूर केले होते; ते त्यांनी पुण्याहून पाठविले. व या शिवाय येथेहि उरलेली जरूरीची रकम गोळा करण्यांत आली. नंतर पासपोर्ट काढण्यांत आला.

---

* यूरोपमधून आल्यानंतर, डॉ. देशपांडे यांचीं 'यूरोपचा प्रवास व तेथील कार्य' या विषयावर दोन व्याख्यानें झालीं. त्यांतून या प्रकरणांतील कांही माहिती घेतलेली आहे. व त्यांनीच ती सांगितली अशी कल्पना करून स्वतःच्या भाषेंत हा भाग लिहिलेला आहे. श्री. आनंदराव जोशी यांच्या मुलाखतींतून कांही माहिती घेतली आहे. त्याचप्रमाणे श्री. शालिग्राम यांच्या लेखांतील व विद्यासेवक व सह्याद्रि या मासिकांतील थोडीथोडी माहिती या प्रकरणांत आली आहे. '१९३८ सालीं डॉ. देशपांडे याचा प्रवास झाला व त्यानंतर जागतिक महायुद्ध झालें. त्यामुळे त्यावेळीं अवलोकन केलेल्या स्थळांत व इतर बाबतींतहि बराच फरक झाला असल्याचा संभव आहे.

पाश्चात्य व पौर्वात्य पंडितांनी, विशेषतः फ्रेंच पंडितांनी, भारतीय आर्य भाषा-संबंधी ( Indo Aryan Languages ) जें संशोधन केलें आहे व मराठी भाषेच्या उत्पत्ति व विकासासंबंधाने पौर्वात्य व पाश्चात्य पंडितांनी व जुन्या-नव्या महाराष्ट्रीय पंडितांनीं जें लिहिलेलें आहे, त्यापैकी जरूर त्या लिखाणाचा उपयोग करून आपण इंग्रजी ग्रंथ (मराठी भाषेची उत्पत्ति व विकास व इतर भाषांचा मराठीवर परिणाम) तौलनिक पद्धतीने लिहावा, असा संकल्प फार दिवसापासून माझे मनांत वागत होता. पण यूरोपला जाऊन पाश्चात्य पंडितांचें लिखाण मूळांतून अभ्यासावयास मिळेल व तेथील भाषाकोविदांना समक्ष भेटून कांही विचारविनिमय करतां येईल, अशी कल्पना स्वप्नांतहि मला नव्हती. अनायासे यूरोपला जाण्याचा राजयोग आलाच, तर कॉंग्रेस संपल्या-नंतर तसेच परत यावयाचे त्यापेक्षा, वरील ग्रंथांच्या अभ्यासाकरता आणखी कांही महिने तेथे राहण्याचें मी ठरविलें.

यूरोपच्या प्रवासाला निघण्यापूर्वी मी पॅरिस युनिव्हर्सिटींतील प्रो. जुले ब्लॉक यांना एक पत्र घातलें होतें की, मी पॅरिसला येत आहे. मूळ ग्रंथ शक्य तो फ्रेंच मधून वाचतां यावे म्हणून फ्रेंच भाषेचा अभ्यास सुरू केला आहे. त्यांचें मला उलट उत्तेजनपर पत्र आलें.

4-5-38

I shall be very glad to meet you when you come...... We will meet at Oriental Congress in Brussels. I think your stay here will be too short, to take full advantage of mixing with variety of scholars. But I and my friend Mr. Kalelkar will give you what help we can. In the meanwhile you will in your turn help him in the research, for which I am also thankful.

Jules Blcch.

श्री. ना. गो. कालेलकर, एम. ए. हे प्रो. ब्लॉक यांच्या नेतृत्वाखाली भाषाशास्त्राचा अभ्यास करीत होते. बडोदा सरकारने त्यांना स्कॉलरशीप देऊन यूरोपला अभ्यास करण्याकरता पाठविले होते. त्याचा विचार, महानुभावियाचा

सूत्रपाठ म्हणून जो प्रसिद्ध गद्यग्रंथ आहे, त्यावर भाषेच्या दृष्टीने प्रबंध, फ्रेंच भाषेंत लिहून, पॅरिस युनिव्हरसिटीला पी एच्. डी. करता सादर करावयाचा होता. त्यांना महानुभावीय ग्रंथासंबंधी कांही माहिती पाहिजे होती. 'मी पॅरिसला येत आहे, तेव्हा येथील त्या विषयावरील काही ग्रंथ घेऊन येईन व आपल्याला लागेल ती माहिती देईन' असें मी त्यांना कळविले होतें.

ता. २२-७-३८ च्या एक्सप्रेसने मुंबईस जावयाचें ठरलें होतें. मी बाहेर देशीं जाणार म्हणून निरनिराळ्या संस्थांकडून व मित्रमंडळींकडून सत्कार करण्यांत आला. यवतमाळच्या कांही संस्था, 'सी. पी. अँड बेरार रिसर्च इन्स्टिटयूट,' 'विदर्भ साहित्य संघ,' 'मुंबई साहित्य संघ,' व 'मराठी ग्रंथसंग्रहालय' यांनी मला प्रेमाचा निरोप देऊन, माझ्या कार्यात सुयश चिंतिलें.

नव्या जीवनाची थोडे दिवसापासूनच तालीम घ्यावयास सुरवात केली होती. दाड दोन महिन्यापूर्वी डोक्याचे केस राखण्याला सुरवात केली! जुलैच्या ४-५ तारखेला मुंबई येथे जाऊन, इंडोबर्मा मॅनेजरचे सल्याने 'शानी आणि कंपनींत' दोन गरम सूट, सहा शर्ट, एक फ्लॅनेलची पँट वगैरे कपडे करावयास टाकले होते! यापूर्वी नव्या पद्धतीने केस कधीहि ठेवले नव्हते व पँटहि कधी घातली नव्हती. पण निघण्यापूर्वी केसावरील पोमॅटम पासून 'कोल्डक्रीम शू पॉलीश' पर्यंत, नखशिखांत अद्यावत् पोषाक-प्रसाधन केलें होतें! पॅन्ट, फॅन्सी उलन कोट, स्टिफ कॉलर्स, करकरीत शू, गार्टरस्, हँडकरचिफ पोर्टमँटो, इत्यादिकांच्या उपाधीनें युक्त असा मी देशपांडेच आहे की काय, असा मलाच प्रश्न पडला.

'बॅलड पिअर' वर निघण्याच्या दिवशीं साडेचार वाजतां पोहोचलों. तेथे नागपूरचे व्ही. व्ही. चितळे, श्री. आप्पासाहेब व श्रीमती बकुळाबाई अभ्यंकर, डॉ. पारधी वगैरे मंडळी भेटली. सुमारे पांच सव्वापांच वाजतां पोर्टच्या आवारांत गेलों. थोड्यावेळाने कांही 'स्नॅक्स' घेतल्यानंतर बोटीवर चढलों व बोटीचा भोंगा होऊन, तिने हिंदुस्तानचा किनारा सोडला!

जहाजावर बसल्यापासून नवीन जगांत पदार्पण केल्यासारखे, व दृष्टी-समोर नवीन क्षितिज उघडल्याप्रमाणे वाटलें! समुद्राचीं वर्णनें व देखावे

ग्रंथांत अगर चित्रपटांत वाचलेलें व पाहिलेले असले तरी, प्रत्यक्ष अवलोकन करण्यांत किती तफावत पडते हें दिसून आले! अफाट सागरावर आमचें जलयान डुलत असता समुद्राचे जे रोमांचकारी व विराट दर्शन झालें, तें कधींहि विसरण्यासारखें नाही! कधी कधी लहरींचे मनोज्ञ नर्तन चालें, तर मधूनच प्रक्षुब्ध-अजस्र लाटांचे तांडव सुरू होई! त्यामुळे त्याचें स्वरूप जितकें आकर्षक तितकेंच भयानक वाटे! सूर्योदय समयीं सागराचे विस्तीर्ण-अगाध पृष्ठभागावर हेलकावत असलेली किरणांची पंक्ति अनुपम सुवर्ण-भांडार उघडे करी, तर रात्रीच्या वेळीं, चंद्रकिरणांत रजत-रसाचा नवल परिपूर्ण पाऊस पडल्याचा भास झाल्याशिवाय राहात नसे. काळोख्या रात्रीं मात्र लाटांचा भीषण गंभीर ध्वनी वैतागांतील विकट हास्याप्रमाणे कर्णरंध्रांत घुमत राही. सागराचे प्रशांत संगीत ऐकून विश्वांतील कुणीतरी अज्ञात-गूढ शक्ति, वायूची धनुकली करून, समुद्राच्या लाटातरंगावर फिरवीत, रौद्रवीणा वाजवीत आहे की काय असा संभ्रम पडे!

त्या दिवशींची हवा स्वच्छ होती तरी 'रेड सी' मध्ये मात्र ती कोंदट (Sultry) झाली. व मधून मधून समुद्रावरचा खारा वावरा वारा त्रास देत होता: 'सुएझ कॅनल' ओलांडेपर्यंत मनस्वी उकडत होतें व तेथपर्यंतचा पल्ला थोडासा कंटाळवाणा झाला.

बोटीवर पहिला वर्ग, दुसरा वर्ग, आणि 'एकॉनामिक क्लास', असे मुख्यतः तीन वर्ग होते. चवथा एक 'डेक क्लास' अगदीच कमी दर्जाचा होता. त्रितळे, प्रारर्था मंडळींचे एकॉनामिकचेच पास होते.

प्रत्येक वर्गाची खाण्यापिण्याची निरनिराळी व्यवस्था होती.

'कॉन्टेवर्डे' ही इटालियन बोट असून, हिचे वजन दोन हजार टन होतें व तीवर एकंदर चार मजले होते. वरच्या मजल्यावर पहिला वर्ग, त्या खाली दुसरा व शेजारच्या बाजूला 'एकॉनामिक क्लास' होता. माझी केबीन नं. ४६ ची होती. केबिनला दोन वर व दोन खाली असे चार बर्थ होते. निघतांना माझ्या केबीनमध्ये मुंबईचा दारा जहांगीर हा एक पारशी तरुण, रेव्हरंड लारेराम म्हणून अलाहाबादचा एक ख्रिश्चन मिशिनरी,

कलकत्ता युनि० चे फाईन आर्टचे प्रोफेसर मि. शहीद सुहरावर्दी व मी स्वतः असे चौघे जण होतों. एणेप्रमाणे आमच्या केबीनमध्ये पारशी, ख्रिश्चन, इस्लाम व वैदिक या चारी धर्मांचे प्रतिनिधी एकत्र जमण्याचा सुयोग आला होता. काँग्रेसला प्रतिनिधि म्हणून जात असल्याने, त्यांचें व माझें प्राचीन इतिहास, शिल्पशास्त्र इत्यादिसंबंधी बरेच बोलणें झालें व प्रवासांतील, त्यांच्या सहवासांत माझा वेळ चांगला गेला.

आमच्या केबीनचें प्रवेशद्वार जहाजाच्या मुखाच्या बाजूसच होतें. दरवाजाच्या दोन्ही बाजूस आलमाऱ्या भिंतींत काढलेल्या होत्या व त्यांत कपडे ठेवण्याकरता खुंट्या होत्या. छताला छिद्रें असून, त्याला दाटोळे 'एअर चेंबर' होतें. 'डायनिंग हॉल'च्या समोरच्या बाजूला जिना चढून गेले असता 'स्मोकिंग रूम' लागे. तेथे 'बार'हि असे. त्यांत जेवणानंतर कॉफी, लेमोनेड वगैरे मिळण्याची व्यवस्था असे. त्याचप्रमाणे बीअर, ब्रँडी, हीहि विक्रीला असत. 'स्मोकिंग रूम' मध्ये लहान टेबल व भोवती चार चार खुर्च्या सर्वत्र मांडलेल्या असतात. तेथे बसून पुरुष व स्त्रिया निरनिराळे बैठे खेळ पत्ते, व बुद्धिबळ खेळत. पुरुषांइतक्याच स्त्रियाहि जहाजावर असत. मी येथे विशेष हें पाहिले की, स्त्रियाही पुरुषासारख्या पँट घालीत व कधी कधी हाफ पँटाचाहि उपयोग करीत! तेथेच एक छोटेखानी पुस्तकालय होतें. त्यांतून पुस्तकें घेऊन वाचतां येत असत. बहुतेक पुस्तकें इटालियन भाषेंत होतीं. रेडिओ 'स्मोकिंग रूम' मध्ये व भोजनाच्या हॉलमध्ये होता. शिवाय 'स्मोकिंग रूम' मध्ये पियानोचेहि वर्णमधुर स्वरसंगित कर्णपथावावर पडे! अकराच्या 'लंच'च्या आधी कधी कधी सात आठ वाद्ये देऊन, वादक मंडळी 'स्मोकिंग रूम' मध्ये अर्धा पाऊण तास वाद्यांचे सुस्वर ध्वनी काढीत असतात. यामुळे जहाजावर करमणूकीला तोटा पडत नसे.

त्याचप्रमाणे रात्रीं नऊ वाजतां कधी कधी पहिल्या वर्गांत, तिसरे चौथे दिवशीं 'टॉकी' लावित असत. 'एकॉनामिक क्लास' करताहि लावीत. असली टॉकी पाहावयास तीनदां गेलो होतों. पण त्या 'टॉकीज' इटालियन भाषेंत असल्यामुळे समजल्या नाहींत. पहिल्या वर्गांत सुखसोयी जास्त होत्या. तेथे वरच्या मजल्यावर उत्कृष्ट बांधलेलें असे एक पोहण्याकरतां टाकें होतें.

'एकॉनॉमिक' क्लासमध्ये लाकडाच्या फळ्यांचें व 'कॅनव्हास' लावून तयार केलेलें एक टाकें होतें, त्यांत पाणी आणून सोडीत. त्यांत कांही पुरुष, स्त्रिया व मुलें जलविहार करीत. काळ्या रंगाची विशिष्ट चड्डी पोहण्याकरता घालीत. बहुधा युरोपीयन व इटालियन प्रवासी पोहत. हिंदुस्तानांतील प्रवाशांपैकी दोनतीनच पोहणारे असत. पण त्या तऱ्हेची चड्डी मजजवळ नसल्यामुळे, मी कधीहि टाक्यांत उतरलों नाही! व आमच्या नूतन स्नेह्यांपैकी कोणास पोहण्याची आवड दिसली नाही!

जहाजावर एक छापखानाहि होता. त्यांत त्या त्या दिवशींच्या भोजनाचा 'मेन्यु' छापवून प्रत्येक टेबलावर ठेवीत. तसेच मधून ज्या महत्वाच्या बातम्या येत त्या, व कांही व्यंगचित्रेंहि देऊन रोज एक, चार वाजता, छोटेखानी वर्तमानपत्र, अर्धा इटालियन व अर्धा इंग्रजी भाषेंत छापवीत. ते 'स्मोकिंग रूममध्यें' वाचावयास मिळे. त्याचप्रमाणे प्रवाशाला कळविण्याच्या नोटिसी, 'चाकोलेट'च्या, 'हॉर्मरेस'च्या, व 'शूटिंग' पैजेच्या जाहिराती करमणुकीचीं साधनें असत. पहिल्या वर्गात 'म्युझिक रूम' होती तिची सजावट विशेष वेधक होती.

जेवण्या वगैरेचा कार्यक्रम म्हणजे सकाळीं ७॥ वाजतां ब्रेकफास्ट (चहा रोट्या वगैरे), ११॥ वाजतां लंच (जेवण), ४ वाजता पुन्हा 'रिफ्रेशमेंट' आणि सायंकाळीं ६॥ वाजतां डिनर (पूर्ण जेवण). वरील पारधी वगैरे मंडळींची ओळख होऊन आम्ही एकच टेबलवर जेवत असूं.

सकाळच्या ब्रेकफास्टच्या वेळीं एक 'स्टुअर्ट' लाकडाच्या बोर्डवर 'बटन' लावलेलें असें एक वाद्य आणीत असे; व तें डाव्या हातांत घेऊन उजव्या हाताने, लहानशा रंगीबेरंगी कार्डाने वाजवीत, सर्व केबीन समोरून, स्मोकिंगरूम, डेकवरून, ब्रेकफास्टची वेळ झाली म्हणून ललकारी देई! ब्रेकफास्टच्या वेळीं टेबलावर जामचा टीन व चमचा, एकेबाजूस ब्रेडचे तुकडे असलेली टोपली, लोणी असलेलें पात्र व साखरेच्या वड्या असलेलें छोटेसें भांडें ठेवलेलें असे. प्रत्येकासमोर एक ट्रे, काटेसुरी, कपबशी व एक कागदाचा रुमाल हात व तोंड पुसावयास ठेवीत. मध्यंतरी खिरीसारखा पदार्थ, 'कॉर्न-

फ्लेक' (गव्हाच्या कणकेच्या केलेल्या चकल्या) आणि चालत असे त्यांना 'आमलेट' देण्यात येई.

दुसऱ्या लंचला ११ वाजेपासून सुरवात होत असे. शाकाहारी टेबलावर एक प्लेटमध्ये भाजी व पापड व 'शेडेड व्हीट' ठेवलेले असे. शेजारी प्रत्येका-करता एक घडी केलेला टॉवेल असे. सुरवातीस, मांडीवर कांही सांडूं नये म्हणून तो पसरून ठेवावयाचा असे.

प्रथमत: 'व्हिजिटेबल सूप' (एक पातळ पदार्थ) वाढीत. तो झाल्यावर ती 'प्लेट' उचलून 'करी' व 'राईस' वाढीत. ती संपल्यावर उकडलेले बटाटे अथवा उकडलेल्या मिश्र भाज्यांची प्लेट येई. इच्छेस येईल त्याप्रमाणे मीठ व मिरपूड घ्यावयाची असे. नंतर काकडी, टोमॅटो याच्या चकत्या आणि 'सेलरी' म्हणून भाजीचीं पानें अशी कधी प्लेट देत. याला 'सॅलड' म्हणतात. यानंतर शेवटीं 'डेझर्ट' म्हणून केळीं, संत्रीं अथवा सफरचंद असे मिळे. कधी कधी 'चीझकेक' आणि 'आइसक्रीम'ची प्लेट घ्यावयाची असे.

चारच्या सुमारास पुन्हा चहा होई. त्यावेळीं चहा, कॉफी, 'चाकोलेट' आवडीप्रमाणे घ्यावयाचें असतें. त्याबरोबर 'ब्रेड टोस्ट', 'जाम' व लोणी एवढेच सकाळप्रमाणे असे.

संध्याकाळीं सहा वाजतां डीनर असे. त्यावेळीं एकाद दुसरा खुमासदार पदार्थ जास्त असे. भात, 'करी' उकडलेल्या भाज्या घातलेलें सूप हेहि असतच. मेन्यु छापवून (बहुतेक मांसाहारी लोकाकरता) तयार असे. त्यांतून आणखी कांही 'फर्मास' पदार्थ मागवितां येत असत. नंतर जेवण झाल्यावर 'स्मोकिंग रूममध्ये' जावे लागे.

जहाजावर एक पद्धत अशी असे की, रात्रीं निजावयाच्या वेळीं पायजमा किंवा सूट घालावयाचा. केबिनच्या बाहेर पडावयाचे असेल तर पायजमा-सूटवर 'ड्रेसिंग गाउन' घालावयाचा असे. पण हें सव्यापसव्य सगळेच पाळीत असे नव्हे !

आमचें जहाज मुंबईपासून सुटलें तें मसावा, आफ्रिडी बंदर, सुएझ, पोर्टसय्यद, ब्रिंडीसी मार्गे वीनसला जाऊन पोहोचलें. वीनसपासून पुढे रेल्वे मार्ग आहे.

फ्रान्सला पहिल्या प्रथम 'व्हेलवेटिआ' हॉटेलमध्ये उतरलों. बर्ग फ्रॅग् वरून श्री. कालेलकराचें पत्र आलें होतें.

"Come early. There is a change at Rengai Flayers. You can do a little French here. Relieve me of the monotony of my solitary life. Winter is on the move and cold winds are already making appearance."

फ्रान्सला आठ एक दिवस राहून बर्गफ्रॅगला गेलों. बर्गफ्राग हें ठिकाण समुद्रकाठीं 'सॅनिटोरीयम' सारखें आहे. उन्हाळ्यामध्ये बाहेरगावचे बरेच लोक हवापालट करण्याकरता तेथे येतात. तेथे समुद्रस्नानाची सोय उत्तम आहे. पुरुष आणि स्त्रिया 'स्विमिंग ड्रेसेस' घालून यथेच्छ जलक्रीडा करीत होते. स्त्रियांना फक्त वक्षःस्थळ व कमरेखालील थोडासा भाग झाकण्या इतकें वस्त्र असे ! जलविहार झाल्यानंतर स्त्री-पुरुष समुद्राच्या वाळवंटांत बसून, तासन तास सनबाथ (सूर्यस्नान) घेत पडलेले असत व मौजेने हितगुज करीत. वाळवंटांत राहुट्या वगैरे दिलेल्या असत. वर्षांतून थोडेच दिवस सुखोष्ण सूर्यकिरणांची मौज लुटावयास मिळत असल्याकारणाने, यूरोपमधील देशांत सूर्यस्नान हें अपरूप गणल्या गेल्यास नवल नाही ! कित्येक तरुण, रंगेल पोषाक करून, बटनहोलमध्ये 'ब्लॅकप्रिन्स,' 'सनसेट' इत्यादि घालून, इतस्ततः फिरत, युवतीगणावर 'इंम्प्रेशन' मारण्याचा प्रयत्न करीत होते. निरनिराळ्या आकाराच्या वेण्या घालून, सौंदर्यसाधन केलेल्या कित्येक नवयुवती त्यांच्याशीं सलगी करतांना दिसत. आजूबाजूस वनश्री विरळच; पण दिलखुलास हास्याचे ध्वनी वातावरणांत घुमून, तिची कमतरता भरून येई !

फ्रान्समध्ये पुन्हा कांही दिवस राहून, झ्यूरिच येथे ता. २८ आगष्ट ते ४ सप्टेंबरपर्यंत भरणाऱ्या, आंतर्राष्ट्रीय इतिहास परिषदेकरतां जाण्यास निघालों. पहिल्याने 'लिमटीथ' हॉटेलमध्ये उतरलों.

कॉंग्रेसचें अधिवेशनाचें स्थान निरनिराळ्या आधुनिक पद्धतीने सुसज्जित केलेलें होतें. परिषदेच्या मुख्य 'हॉल'मध्ये एक विजेचा 'बोर्ड' लावलेला होता, त्यावरून 'इलेक्ट्रिक' अक्षराने कोणता पेपर कोणत्या 'रूम'मध्ये वाचला जाई हें कळत होतें. सर्व विभागांतील लेखांचें वाचन एकाच वेळीं चालत असें.

काँग्रेसचें उद्घाटन व अध्यक्षीय भाषणें इटालियन, जर्मन, इंग्लिश व फ्रेंच या चार भाषेंत झालीं. या परिषदेकरता निरनिराळ्या ४५ देशांतील प्रतिनिधी उपस्थित होते. अध्यक्षस्थान प्रो० टेंपर्लो यांनी मंडित केलें होतें. हिंदुस्थानांतून मुंबई, कलकत्ता, पंजाब आणि उस्मानिया विद्यापीठें 'ग्रेटर इंडिया सोसायटी,' 'इंडियन हिस्टॉरिकल असोशिएशन,' व शारदाश्रम (यवतमाळ) या संस्थांनी आपापले प्रतिनिधी पाठविले होते. मुंबईचे सेंट झेविअर कॉलेज-मधील प्राध्यापक फादर हेरॉस, कलकत्त्याचे डॉ. घोसल, हैद्राबादचे प्रो. शेरवानी, पंजाबचे प्रो. वार्ड हे निरनिराळ्या संस्थांतर्फे हजर होते. इतिहासाचे एकूण १६ गट पाडले होते. व एकेका गटाकरता एकेका अध्यक्षाची निवड-णूक होऊन, त्यांच्या अध्यक्षतेखाली निरनिराळ्या गटामधे निबंध वाचन व चर्चा करण्यांत आली. इतिहासपूर्व काल, प्राचीन इतिहास व पुराणवस्तु मानकविभाग, इत्यादि त्यांत प्रमुख होते. हिंदुस्थानच्या प्रतिनिधींचे निबंध अर्थातच हिंदुस्तानविषयक होते. त्यांत माझे निबंध भारतीय मूर्तिशास्त्र (Indian Econography) व खडकावरील इतिहासपूर्वकालीन लेख (Prehistoric Rock paintings in India) या विषयावर असून, डॉ. घोसल यांचा 'कांबोडियामधील मंदिराचा एक नमुना,' फादर हेरास यांचा 'मोहेंजोदारो येथील लेखाच्या आधारें मिनोनोरची कथा,' डॉ. सेठ अमरावती यांचा 'मौर्यांच्या अमलांतील खोतान,' (चिनी तुर्कस्थान) इत्यादि निबंध प्रमुख होते. प्रो. शेरवानी यांनी 'इस्लामियांचें राजकीय तत्वज्ञान' हा निबंध वाचला. माझ्या प्रबंधाच्या वेळीं डॉ. ड्यूरेस्ट हे अध्यक्ष होते, इतरहि निरनिराळ्या देशाच्या संस्कृतीवर प्रबंध वाचल्या गेले.

मी आपला प्रबंध स्वतःच वाचला. वाचन झाल्यानंतर लगेच कांही फ्रेंच व स्विस विदुषी मजकडे येऊन, माझा शोधनिबंध बराच उद्बोधक व मनोरंजक झाला असें सांगून, त्यांनी माझें हार्दिक अभिनंदन केलें. व स्विस लेडी जेन मायकेल व फ्रेंच लेडी मेरी नागेली यांनी विशेषच आस्था दाखविली. मॅडम मेरी नागेली इने तर 'आपली येथे राहण्याची वगैरे गैरसोय होत असल्यास आपण माझेकडे खाजगी पाहुणे म्हणून यावे' अशी मला विनंति केली व 'आपली स्वतंत्र व्यवस्था होईल' म्हणून सांगितलें. "आपल्या स्नेहशील

अगत्याबद्दल मी फार आभारी आहे" मी म्हटलें. "माझी गैरसोय होत आहे असें वाटल्यास मी जरूर आपल्या आतिथ्याचा लाभ घेईन! थँक्स!" मला तिची वागणूक इतकी आपुलकीची वाटली की, तिने दिलेल्या 'व्हिजिट कार्ड'-वर 'Received just after paper reading on 4 8-38 ही नोंद मी तेव्हाच करून ठेवली व तें कार्ड अजूनहि माझ्या संग्रहीं आहे!

वरील विदुषींनी नंतर माझी डॉ. ओटमार विडमेर यांच्याशीं ओळख करून दिली व त्यांनी मला स्विस युनि. मधील मूर्तिसंग्रह दाखविला. स्विस युनि. ने हिंदुस्तानांत आपले प्रतिनिधी पाठवून येथील कित्येक मूर्ति तिकडे नेलेल्या आहेत. त्यामध्ये कांही जैनांच्या मूर्ती (कांही पुतळे) कांही रामकृष्ण दशावतारांच्या मूर्ति, कै. लो. टिळक, गांधी यांचे स्वाभाविक आकाराचे (Life Size) पुतळे (गांधी सूत काढीत आहेत असा एक) इत्यादि होते. मूर्तिसंग्रहावर देखरेख करीत असलेल्या तेथील विदुषीला 'इंडियन मायथॉलाजी' संबंधी बरीच माहिती दिसली. बऱ्याच धातुमूर्तींच्या प्रभावळीवरील निरनिराळ्या लिपींत कोरला असलेला मजकूर, तिने मला वाचून दाखविला. त्यामध्ये एक विष्णूची मूर्ति होती. तिच्यावरील अक्षरें मात्र तिला लागली नाहीत. ती मी वाचून दाखविलीं:—

**"संवत १८५१ वर्षे प्रागवाह ज्ञातीय बाहीरीडी पुण्य, श्री"** याचा अर्थ संवत १८५१ या वर्षी प्रागवाह (पोरवाह) जातीच्या रीडी नांवाच्या बाईने हें पुण्यकर्म (मूर्तीची स्थापना करण्याचें) केलें. ही अक्षरवटिका देवनागरी लिपींत होती. मूर्तिवरील लिखाण मी ओळखल्यानंतर तिने जरासें आश्चर्य प्रगट केलें. तेथील गृहस्थांना शारदाश्रमबद्दलची वगैरे माहिती मी दिली व त्यांनीहि आस्थापूर्वक कित्येक प्रश्न कुतूहलाने विचारले.

त्यानंतर संस्कृतचे जर्मन प्रो. व्होजेल, डॉ व्हेबली (झ्यूरीच युनिव्हर्सिटीतील भूगोल संस्थेचे प्रमुख) इ. च्या ओळखी झाल्या. सायंकाळीं स्विस युनिव्हर्सिटीच्या मागच्या बाजूस अल्पोपहार देण्यांत आला व दोन दिवस चाललेल्या ज्ञानयज्ञाची सांगता झाली.

स्विट्झरलंड या देशांत जर्मन, फ्रेंच इटालियन या तीनहि भाषा प्रचलित असून राजभाषा आहेत. झ्यूरीच, बर्न, जिनिव्हा व लॉसेन इत्यादि विद्यापीठें प्रसिद्ध आहेत.

या देशाचें सर्वांत मोठें वैशिष्ट्य म्हणजे येथील सृष्टिसौंदर्य! सृष्टि-सौंदर्याचें साम्राज्य चोहिकडे पसरलेलें असून, त्याचा आविष्कार आल्प्स, मौटरोजा इत्यादि गिरिवरांच्या परिसराबरोबरच, मेळ्याच्या आकाराच्या लहान लहान इतस्ततः विखुरलेल्या टेकड्यांच्या रांगारांगामधूनहि झालेला दृष्टीस पडतो! त्यावरील घनदाट वृक्षराजींचें रमणीय दर्शन मनास गोड आंदोलनें दिल्याशिवाय राहात नाही. त्याच्याच जोडीला मधून मधून चकाकत असलेल्या सरोवरावरील हरितगार वनवासंतीचा मुक्त विलास कित्येक ठिकाणीं यक्षभूमीची आठवण करून देतो! अप्रतीम सृष्टिसौंदर्य, चित्तप्रसन्न देखावे, हिवाळ्यांतील खेळ यांचा आस्वाद घेण्याकरतां बाहेरील देशाचे लक्षावधी प्रवासी तेथे जातात. बेल्जम ही जशी यूरोपची रणभूमी, त्याचप्रमाणे स्वित्झर्लंड हें यूरोपचें क्रीडागण आहे, असें यथार्थतेने म्हणतां येईल!

येथील कित्येक सरोवरांतून उत्खनन करून काढलेले प्राचीन अवशेष पुराणवस्तुसंग्रहालयांत ठेवलेले आढळले. यूरोपांतील बहुतेक अशा संग्रहांत हे जपून ठेवलेले अवशेष फार महत्वाचे गणल्या जातात. या सरस्-पुराणवस्तु-उत्खननाचा पहिला आरंभ होण्याचा अग्रमान. या झ्यूरीच शहरासच आहे. इतिहासपूर्व पुराणवस्तुशास्त्राचें खरेंखुरें संशोधन याच अवशेषावर बहुतांशी अवलंबून आहे यांत शंका नाही. यापैकी कांही अवशेष मला पाहावयास मिळाले!

परिषद आटोपल्यावर तेथे जमलेल्या कांही 'स्कॉलर्स' बरोबर खास मोटारींने आम्ही कांही प्रेक्षणीय स्थळें पाहाण्याकरता लहान मोठ्या सफरी काढल्या. त्यापैकी ऱ्हाईन नदीचा धबधबा व फ्लायबर्गचा किल्ला पहाण्याकरता काढलेल्या सफरी उल्लेखनीय होत.

ऱ्हाईन नदीच्या काठीं पुन्हा एकवार आपल्याला सृष्टीच्या रुद्र सौंदर्याचें दर्शन होतें. ४०० फुटावरून कोसळून, खडकाखडकांना बेगुमानपणे धडका

देत, मार्गात येणाऱ्या लहान मोठ्या वस्तूंना क:पदार्थ लेखीत, आपला मार्ग तुफान गतीने आक्रमणारा हा प्रचंड रजतशुभ्र जलस्तंभ, मनाला विस्मयचकित केल्याशिवाय राहात नाही! आसमंतातील चराचर सृष्टीवर स्वामित्व गाजविणाऱ्या, या जलसाम्राटाच्या जयनादाचे प्रतिध्वनी दऱ्याखोऱ्यातून कित्येक मैलपर्यंत घुमत असलेले ऐकूं येतात. त्याची विस्तीर्ण जलराशी जेव्हा खडकाखडकावर खळखळत येते, त्यावेळीं सूर्याच्या सप्तरंगी किरणाचे त्यावर परिवर्तन होऊन, त्याचे शोभावैचित्र्य द्विगुणीत होतें!

ऱ्हाईनच्या भव्योदात्त धारासंपाताने किंचित् विस्मयोत्फुल्ल झालेल्या मनावर, 'फ्रायबर्ग'चा भग्नहृदय किल्लेकोट पाहून, उद्वेगजनक विषण्णतेचें सावट पडल्याशिवाय राहात नाही. काळयाकुट्ट, धिप्पाड पण पडिक बुरुजांचे निशाचर, आपल्या जुनाट खचलेल्या चुनेरी जबड्यांतून, त्यांच्या अस्तंगत वैभवाचें उपहासमिश्र भेसूर मृत्यूगीत गात असलेले दिसून येतात!

'फ्रायबर्ग कॅसल' हा १२ व्या शतकांत बांधला गेला आहे. त्यामध्ये एक अजब वस्तुसंग्रहालय आहे. याला 'पोलिश म्युझिअम' म्हणतात. म्युझियममध्ये एक शुकशुकाट असलेलें तळघर आहे. प्राचीन काळीं येथे गुन्हेगाराची कत्तल करीत असत. तेथे एक भला मोठा चौरस दगड मांडून ठेवलेला दिसला. जवळच एक गंजलेली भयानक कुऱ्हाड ठेवलेली होती व बाजूला एक मनुष्याच्या कोटाच्या आकाराचा पोलादी पिंजरा होता. या पिंजऱ्याचे वरपासून खालपर्यंत उजवे डावे असे दोन भाग होते. ते दुभागून या पिंजऱ्याच्या आंत गुन्हेगाराला ठेवावयाचे असे. पिंजऱ्याच्या एका बाजूला चक्र असें. तें फिरविलें म्हणजे पिंजऱ्याचे दोन्ही भाग दोन्हीकडून सरकत येऊन गुन्हेगाराच्या आंगाला घट्ट बसत. व त्याच्या आंगांतून रक्ताच्या चिरकांड्या उडून तो गतप्राण होई. गुन्हेगारांना पिंजऱ्यांत घालून ठार करीत किंवा कुऱ्हाडीने त्याचें डोकें धडावेगळें करीत. वरील माहिती तेथल्या एका गृहस्थाकडून मिळाली. अंगावर शहारे आल्यासारखे करून तो आपल्या भाषेंत म्हणाला "बाबूजी! असे किती तरी फितूर राजद्रोही या भीषण नरकामध्ये पिळून निघून, मृत्यूच्या थडग्यांत कायमझोप घेत आहेत!"

झ्यूरिचवरून ता० ४ सप्टेंबर १९३८ ला ब्रुसेल्स (बेल्जम) येथे भरणाऱ्या प्राच्यविद्यापरिषदेला जाण्याकरतां निघालों. पहिल्याप्रथम पथिकाश्रम 'सिन्यु' मध्ये दोन दिवस राहून विद्यापिठाच्या निवासस्थानावर गेलों.

झ्यूरिच येथील ऐतिहासिक परिषदेपेक्षा येथील प्राच्यपरिषदेला भारतांतील बरेच जास्त प्रतिनिधी आलेले होते.

प्राच्यविद्यापरिषदेच्या वेळीं, 'रॉयल म्युझिअम' मध्ये सत्तरीच्या छायेंत आलेले, साधारणतः स्थूल बांध्याचे व डोळ्यांत बुद्धिमत्तेची चमक असलेले एक गृहस्थ भेटले. हेच फ्रान्स युनिव्हर्सिटींतील, व्युत्पन्न (भारतीय) भाषापंडित जुले ब्लॉक होत. माझी ओळख झाल्यानंतर त्यांनी हस्तांदोलन केलें. ते १९०७ सालीं भारतांत आले होते व पुण्याहून त्यांनी बरींच हस्तलिखितें व विशेषतः महानुभावीयांच्या पोथ्या संकलित करून स्वदेशाला नेल्या. महंत दत्तराजाची स्वदस्तुराचा एक पोथी त्यांच्या संग्रही आहे. महानुभावीय वाङ्मयाच्या संशोधनाविषयी, मा तोंपर्यंत झालेल्या प्रगतीची त्यांना माहिती दिली. विशेषतः उनकेश्वर, मार्कंड व वाकाटकाच्या संशोधनाविषयी त्यांना समाधान झाल्यासारखे दिसलें. ज्युल ब्लॉकचे Formation de langue Maratte या ग्रंथाचा मराठींत अनुवाद केलेल्या, फर्ग्युसन कॉलेजमधील डॉ. गोपाळ विष्णु परांजपे यांची त्यांनी विचारपूस केली. इकडील संशोधन संस्थासंबंधीहि त्यांनी आस्थापूर्वक विचारलें व त्यांबद्दलचीहि माहिती मी त्यांना सांगितला.

डॉ. ब्लॉक यांनी, भाषांतील शब्दांचीं रूपें, प्रत्यय, विभक्ति इत्यादि कसे बदलत गेले यांचा इतिहास अभ्यासतांना, ग्रंथाच्या अलीकडील हस्तलिखित प्रती अगदी निरुपयोगी असून, प्रत्यक्ष ग्रंथकाराच्या हातची, किंवा त्याच्या काळीं छापलेली प्रतच उपयोगी पडेल; ग्रंथकाराच्या काळींच पांचपंचेवीस वर्षांत त्याची तयार झालेली नक्कल कांहीशीं कामास पडेल, असें सांगितलें व याकरता शिलालेख, ताम्रपट, इत्यादि अखंड लिखाणें संशोधणें फार महत्वाचें आहे असें सुचविलें.

प्राचीन ग्रंथ प्रकाशित करतांना, एकाच पोथीवरून संहिता ( Text ) निश्चित करावयाची, की अनेक पोथींतील पाठ लक्षांत घेऊन ती निश्चित करावयाची हे जुले ब्लॉक याना विचारण्याकरता, श्री० वा० ना० देशपांडे यांनी डॉ. देशपांडेना सांगितले होते. ब्लॉक यांनी पूर्वोक्त गोष्टीच्या बाजूने मत दिलें..हीच राजवाडे यांची पद्धति होती.

डॉ. ब्लॉकनीच माझी 'लंडन स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीज'चे प्रमुख ए. सी. मास्टर, डॉ. रॅन्डेल इत्यादिकांशीं ओळख करून दिली व त्यांच्या खटपटीनेच माझा फ्रान्समध्ये पुढे, 'बिब्लिऑथिक न्यॅशनेल'चे सुपरिन्टेंडेंट डॉ. फिलिओझा यांच्याशीं परिचय होऊन, त्या लायब्ररींतील मराठी हस्तलिखितें व इतर ग्रंथ मनाप्रमाणे अभ्यासण्याचें कार्य मला सुलभ झालें.

प्राच्य विद्यापरिषदेस जगांतील एकंदर ३५ देशांतील निरनिराळीं विद्यापीठें व प्राच्यविद्यासंशोधनसंस्था यांचे प्रतिनिधी जमले होते. हिंदुस्तानांतून मुंबईची 'अंथ्रॉपॉलॉजिकल सोसायटी', 'भांडारकर इन्स्टिटयूट' मुंबई व कलकत्ता येथील 'रॉयल एशियाटिक सोसायटी', 'कामा इन्स्टिटयूट', निजाम सरकारचे पुराणवस्तु संशोधन खातें, 'ग्रेटर इंडिया सोसायटी' 'हिंदु गुरुकुल' व 'इंडियन रिसर्च इन्स्टिटयूट' या संस्थांचे प्रतिनिधी परिषदेस हजर होते. इतिहास परिषदेप्रमाणे या परिषदेंतहि निरनिराळे गट पडले होते. इजिप्त, आफ्रिका, असिरिया, मध्य आशिया, हिंदुस्तान, इंडोनेशिया, सेमेटिक लोक व भाषा, यहुदी व 'जुने टेस्टामेंट' इस्लाम, पौर्वात्य, ख्रिश्चन असे गट होते. निबंधवाचन झ्यूरिचप्रमाणे जर्मन, फ्रेंच व इंग्रजी भाषेंत चाललें होतें. दुसरीकडेच बाजूस प्राच्य हस्तलिखितांचें प्रदर्शन होतें. निरनिराळ्या गटांतून निबंध वाचनाबरोबर त्या त्या विषयावर चर्चाहि झाली.

भारतीय विषयक एकूण ३५ निबंध निरनिराळ्या देशांच्या पंडितांनी वाचले. त्यांत डॉ. व्होजेल (लंडन) यांचा 'भारतीय प्राचीन भौगोलिक कोशाची योजना' डॉ. फिलिओजा, (पॅरिस) यांचा 'नागार्जुन व अगस्त्यवैद्य व रसायन, पंचाक्षरी' ड्यूमॉं (बाल्टिमोर) यांचा 'वैदिक विधींत अग्नि-होत्राचें महत्व' पिसानी (रोम) यांचा 'महाभारताच्या आवृत्ति' आल्फ्रेड

मास्टर, (पेन्शनर आय. सी. एस) याचा 'ऋग्वेदांतील फलिंग शद्बाचा अर्थ' डॉ. रघुवीर यांचा 'रामायणाच्या संस्करणाची योजना' इत्यादि निबंध उल्लेखनीय होते.

या परिषदेत जर्मन, पोलंड, हॉलंड, फ्रान्स, इंग्लड वगैरे देशांतील निरनिराळ्या विद्वानांच्या भेटी व चर्चा झाल्या व त्यांनी स्मरणार्थ निरनिराळ्या भेटी दिल्या.

येथील 'कांगो म्युझिअम' पाहाण्यासारखा आहे. 'कांगो म्युझियम' च्या बाजूला प्रेक्षणीय असा एक तलाव असून, आजूबाजूला रंगीबेरंगी व टपोऱ्या दळदार फुलाफुलांचे लांबच लांब ताटवे पसरलेले आहेत. बेलजम हा देश फुलांच्या लागवडीकरता प्रसिद्ध असून, इतर दुसऱ्या देशांत न दिसणारीं अशी नयनरम्य फुलेंच फुलें जिकडे तिकडे या देशांत दृष्टोत्पत्तीस येतात.

या देशांतील प्रख्यात युनिव्हर्सिटी लोवेन ही आहे. याशिवाय लीज, घेंट व ब्रुसेल्स हीं विद्यापीठें आहेत. बेलजम् लोकांचें वाङ्मय अत्यंत विस्तृत आहे. लोवेन ही १२ व्या शतकांतील कॅथोलिक युनिव्हर्सिटी आहे. तेथे १८ लक्ष ३० हजार ग्रंथ आहेत, असे तेथील 'लायब्ररीन'च्या सांगण्यावरून कळून आलें.

झ्यूरिकप्रमाणेच येथेहि कांहीं इतिहासप्रसिद्ध स्थळें पाहण्याचा कार्यक्रम ठेवण्यांत आला होता. त्यांत बेल्जिक म्युझिअममधील, मृत्यूशय्येवरील नेपोलियनच्या आयुष्यांतील दृश्य जितकें हृदयस्पर्शी, तितकाच वाटर्लुच्या रणभूमीचा देखावा नवलपरिपूर्ण होता.

नेपोलियन बिछान्यावर गलितगात्र पडलेला आहे व त्याची बहीण बिछान्यावर पायथ्याशीं बसून अश्रू ढाळीत आहे, असें पुतळ्याच्या रूपाने उभे केलेलें दृश्य, मनांत विषादलहरी उत्पन्न करीत होतें! सुवर्ण-गरुडाने अंकित झालेलें ज्याचें निशाण, इतर साम्राट-खगांना एके काळीं 'त्राहि भगवान' करीत विजयोन्मादाने फडकत होतें, त्याचीं आज अशी शोचनीय स्थिति झालेली पाहून 'कालाय तस्मै नमः' हेच उद्गार मुखांतून निघाल्याशिवाय राहात नाही! वाटर्लुच्या रणमैदानांत बराच उंच असा दगडाचा चुनेरी वर्तुलाकार बुरुज आहे व कांहीं अंतरावर चौफेर भिंत आहे. ह्या भिंतींवर

लढाईचीं चित्रें आहेत, त्यास 'पॅनोरामा' म्हणतात. मधल्या रिकाम्या मैदानांत मोडक्या तोफा, घोड्यांचे पुतळे, धारातीर्थी पतन पावलेल्या शिपायांचे हात-पाय तुटलेले पुतळे आहेत. बुरुजावर उभे राहून पाहिले असतां जणू काय प्रत्यक्ष लढाईच चाललेली आहे असा भास होतो. हा देखावा एका फ्रेंच कलावंताने चित्रित केलेला आहे.

बेलजम् येथील प्राच्यविद्यापरिषद आटोपून पॅरिसला गेलों. इंग्रजी भाषेत अशी एक म्हण आहे की, प्रत्येक मनुष्य दोन देशावर प्रेम करतो. एक म्हणजे मायदेश व दुसरा फ्रान्स. फ्रान्समध्ये सौंदर्यदेवतेचें पूजन सर्वत्र मनोमन चाललेलें दिसून येतें. फ्रेंच लोक भोगलोलुप ललितकलासक्त, कल्पक व सुधारणाप्रेमी आहेत, याचें प्रत्यंतर पॅरिसमध्ये पाय ठेवतांच पहिल्याच प्रथम आलें! 'गॅरेडुलायन' स्टेशनवर सुरवातीला उतरतांच भपकेदार 'फॅन्सी' पोषाक केलेल्या स्त्रीपुरुषांची एकच गर्दी दिसली! निरनिराळया तऱ्हेचा परिवेष करून, उंच टाचेचे बूट घातलेल्या स्त्रिया व फ्रेंच 'सॅबॉट' घातलेले तरुण उत्साहाने मिरवीत होते. फ्रान्समधील नृत्यांच्या कार्यक्रमाला जाण्याचें कांही प्रसंग आले. एके, ठिकाणीं एकाच वेळीं शंभर मुली Skin colour पोषाक घालून, एकदम नाचत असत. फ्रान्समधील कांही भाग द्राक्षाच्या हरितगार मळयांनी फुलून गेलेला आहे. जगांतील दारू पैकी अर्धी दारू केवळ एकट्या फ्रान्समध्ये तयार होतें हें पाहून, फ्रान्सला 'द्राक्ष्यभूमी' हें नांव यथार्थतेने द्यावेसें वाटतें!

पॅरिसमध्ये 'बिब्लिओथिक' वाचनालय आहे. तिला 'बिब्लिओथिक नॅशनेल ऑफ फ्रान्स' म्हणतात. तेथे प्राच्यवस्तूसंग्रहहि आहे. याच वाचनालयांत दररोज मी माझ्या ग्रंथाकरता टिपणें घेत असे. तेथील 'सुपरिन्टेंडेंट'च्या सूचनेवरून, दोन तीन दिवस एका हस्तलिखित ग्रंथाची लीपि ओळखण्यास जात असे. तो हस्तलिखित ग्रंथ नंद लीपीमध्ये लिहीला असून, त्यासंबंधी मी त्यास माहिती दिली.

'युनिव्हर्सिटी लायब्ररी' निराळी आहे. तेथील पूर्वीच्या राजवाड्याचें रूपांतर 'म्युझियम' 'लूर' मध्ये केलें आहे. त्याच्याच शेजारला लागून 'लुव्हे गार्डन' आहे.

युनिव्हर्सिटी 'सितेर् युनिव्हर्सितेर्' मध्ये एकंदर सात हजारावर विद्यार्थी आहेत. विद्यार्थिनींचे क्वॉर्टर्स निराळे आहेत. विद्यार्थी विद्यार्थिनींना एकमेकांचे सहवासांत, कॉलेजचे तास खेरीज करून सहसा येऊं द्यावयाचें नाही, असा काटेकोर नियम आहे; रात्रीं दहाऱ्यापुढे दोन दोन वाजेपर्यंत मात्र एकत्र फिरण्याची मुभा आहे !!

दुसरें, येथील पाहण्यासारखें ठिकाण म्हणजे 'पँथियन पार्क' होय. त्यांतील राष्ट्रीय पुरुष, कवी इ. चे पुतळे, कीर्तिमंदिरें, समाधीमंदिरें अत्यंत दर्शनीय आहेत. पँथियनच्या एका भागांत उद्यान-सहल करणाऱ्यां-करता निरनिराळ्या सोई असून, कांही ठिकाणीं बाकें वगैरे टाकलेलीं असतात. तेथे पॅरिसमधील नखरेबाज युवतींच्या मोहजालाची बेछूट दृश्यें दिसतात. या बाजूने फिरकत असतां मधूनच एकादे वेळीं एकाद्या प्रेयसीने आपल्या प्रियकराला दिलेला चुंबन-दानाचा नाजुक-मृदल ध्वनी वातावरणांत उठून विलीन होतो ! इंग्लंडमध्ये सुद्धा ही पद्धत गर्हणीय समजली जाते. तेथील मुग्ध, संयमीत प्रणयप्रकाराचे दर्शन फ्रान्समध्ये बरेच कमी प्रमाणांत घडतें !

फ्रान्समधील निवास आटोपल्यानंतर लंडनची तयारी केली. १-१०-३८ रोजीं लंडनला जाऊन पोहोचलों. मुंबईचे एम्. ए. अभ्यंकर व्हिक्टोरिया स्टेशनवर उतरून घेण्याकरता आले होते. इंग्लंडचे सर्वच अतिशय जगड्व्याळ आहे. विस्मयोत्पादक टोलेजंग इमारती, नेत्रदीपक संपत्तीचें ऐश्वर्य, मुंग्या-सारखी लागलेली माणसांची व वाहनांची रीघ, दिव्यांचा झगझगाट व अजस्त्र यंत्रांचा प्रचंड कोलाहल यांनी कांही वेळ मन भांबाऊन गेल्यासारखें होतें व आपल्या घरादाराचा विसर पडल्यासारखा होतो. अशा गजबजाटाच्या ठिकाणीं कांही दिवस काढल्यानंतर मात्र, त्या वरवरच्या लखलखाटापेक्षा आपल्या कुटीरवजा चिमुकल्या घरांतील मंद प्रकाशच बरा, असें वाटल्याशिवाय राहात नाही.

श्री. अभ्यंकराबरोबर टॅक्सीमधून Hampstead कडे चापेकर हॉटे-लांत गेलों, 'हॅम्पस्टेड' स्टेशनपासून पूर्वेच्या बाजूला ७-८ मैल आहे.

चापेकरांच्या हॉटेलमध्ये आणखी १२-१४ महाराष्ट्रीय गृहस्थ होते. जेवण व बोलणें चालणें सर्व आपल्या महाराष्ट्रीय पद्धतींचें असल्यामुळे, आपण इंग्लंडसारख्या परक्या देशांत आहोंत, ही जाणीव क्वचितच होई. या हॉटेल-समोर पुण्याचे बी. आर्. नाईक यांचें बंगलीवजा घर होतें. त्यांचें नांव लीलाहाऊस (न. ६३). त्यापुढे 'हॅम्प्स्टेड हिल' एक फर्लांग अंतरावर आहे. त्यानंतर दोनशे फुटाचा चढता रस्ता आहे. या हिलवर पुढे वाहनें मात्र जाऊं शकत नाहीत.

इंग्लंडांतील दैनिक कार्यक्रम म्हणजे ६-६॥ वाजतां प्रातर्विधी आटोपून, पहिली गोष्ट म्हणजे 'स्मश्रू' करणें. याचबरोबर दर प्रसंगाला निरनिराळ्या तऱ्हेचे पोषाक घालण्याकाढण्याची कवाईत तर दिवसांतून किती तरी वेळ करावी लागते! इंग्लंडमध्ये 'फॅशन्स'चें वेड अर्थातच फार आहे! एका आठवड्यांतील कपड्याची 'फॅशन' दुसऱ्या आठवड्यांत जुनी ठरे! 'ब्रेकफास्ट'चा, 'डिनर'चा, ऑफीसमध्ये जाण्याचा, फिरावयास निघतेवेळीचा, प्रार्थनेचा, नृत्य पाहाण्याचे वेळचा, व निजण्याच्या वेळचा निरनिराळा पोषाक करावयाची पद्धति आहे आता, मी जरी या सर्व सव्यापसव्यांत भाग घेण्याचें टाळत असें, तरी कांही जरूरीच्या गोष्टी कराव्याच लागत! कित्येक वेळेला हा अकृत्रिमपणा त्रासदायकहि होई. त्याचप्रमाणे काट्याचमच्याने जेवण करण्याची पद्धति पहिल्या पहिल्याने चमत्कारिक वाटे!

स्मश्रू झाल्यानंतर कपडे करून, अर्धा पाऊण तास 'हॅम्स्टेड' हिलवरून फिरून येणें. ब्रेकफास्ट ८-८। वाजतां होई. तास दाड तास वाचन करणें व मग पत्रव्यवहाराचें काम करीं. १०॥-११ वाजतां बसने, किंवा 'ट्यूब रेलवे'ने निघून इंडिया ऑफिस लायब्ररी वा ब्रिटिश म्युझिअममध्ये जाई व अकरा ते दोन वाजेपर्यंत वाचनांत व टिपणें घेण्यांत वेळ घालवी. जवळच्या उपहार-गृहांत 'लंच' घेऊन पुन्हा पांच वाजेपर्यंत वाचनाचें काम चाले. मराठी भाषेच्या इतिहासासंबंधी अशीं टिपणें घेण्याचें काम दोन महिने चाललें होते. या अवधींत मराठी भाषेच्या अभ्यासाशीं सुसंबद्ध अशा भाषा शास्त्रीय ग्रंथांचें अवलोकन करून, त्यांची सूची मात्र मी तयार करू शकलों. नागपूरकर भोसल्याच्या इतिहासासंबधींहि पुष्कळशीं टिपणें घेतलेलीं आहेत.

नंतर सायंकाळीं नदीकडे कधी कधी फिरावयास जाई. टेम्स नदीचा कठडा लाकडी भिंतीसारखा दोन मैलपर्यंत बांधलेला आहे.

हॉटेलसमध्ये सिगारेट्स मिळण्याची एक मजेदार व्यवस्था होती. तेथे एक लाकडी झिलई केलेली सुबक पेटी असते. हॉटेलमध्ये जेवण वगैरे झाल्यावर, एक सहा पेन्सचें नाणें पेटींत टाकलें की एक सिगारेटची डबी बाहेर येई. मग ती ऐटींत शिलगावयाची! स्टेशनवरहि हीच व्यवस्था असते. अर्धा शिलिंग-साडेसहा आण्याचे नाणें त्यामध्ये टाकलें म्हणजे खालचा एकच असलेला खण उघडतो व त्यात सिगारेटचे एक 'पॅकेट' येतें. आपल्याला पाच पाकिटें पाहिजे असल्यास, पांच वेळेला नाणीं टाकून 'ड्रावर'ची उघड झाप करावी लागते.

इंग्लंडमध्ये सुपारी मात्र हॉटेलमध्ये मिळत नाहीं. दूरून जाऊन आणावी लागते व सुपारी खाण्याची पद्धत सर्वत्र कमीच आहे.

यूरोपमध्ये लंडन व पॅरिस येथे अनुक्रमे "ट्यूब" व "मेट्रो" रेल्वेचें जाळें पसरलेलें आहे. लंडन शहरांत रहदारी फार असल्यामुळे 'अंडरग्राउंड' रेल्वेची जी व्यवस्था केली त्यालाच 'ट्यूब' रेल्वे म्हणतात. जमिनीवर 'बसेस'ची व्यवस्था आहे. 'लिफ्ट'ने ५० माणसें एकदम खाली जावयाची किंवा खालून वर यावयाची! खाली गेल्यानंतर स्टेशनवर तिकीट काढावयाचें. गाडी स्टेशनवर आल्यानंतर तिचे दरवाजे आपोआप उघडले जातात व गाडीने शिटी दिल्यानंतर पुन्हा आपोआप बंद होतात! लढाईमुळे अर्थातच वरील सर्व प्रकारांत आता फारच बदल झाला असेल. आंत विजेच्या दिव्यांचा झगझगाट असतो. दहा दहा मिनिटांनी 'ट्यूब रेल्वेज' सुटतात. ट्यूब स्टेशनवर वीजेचा फलक असतो. एक ट्रेन गेली म्हणजे दुसरी केव्हा येणार हें त्या फलकावर लिहिलेलें असतें. चापेकरांच्या हॉटेलपासून थोड्याच अंतरावर पहिलें ट्यूब स्टेशन Bombay Emporium 70, Graften Way Warrant Street हे होते. तेथपर्यंत 'बस'ने जावे लागे.

लंडन येथे महाराष्ट्रीयांचीं दोन निरनिराळीं मंडळें असून, त्यांत स्पर्धा चालू होती व एका क्लबांतील सभासद दुसऱ्या क्लबांतील सभासदांकडे

मित्रत्वाच्या भावनेने पाहात नसत. त्यामुळे वेगवेगळे कार्यक्रम होत असत. प्रत्येकांची 'दिवाळी डॅानर्स' वेगवेगळींच होत. त्यांचें एकीकरण व्हावें म्हणून, दिवाळीमध्ये एकत्र सभा बोलाविली होती. प्रत्येक मंडळातर्फे तीन सभासदांची एक समिती नेमल्या गेली व मला त्याच्या अध्यक्षपदाचा मान देण्यांत आला होता. मी 'गेस्ट ऑफ ऑनर' म्हणून होतों. बडोद्याच्या महाराणीस त्या प्रसंगास मुद्दाम पाचारण करण्यांत आलें होतें. माझ्या अध्यक्षतेखालींच दोन मंडळांची एकच नवीन संस्था 'मराठी मंडळ' म्हणून स्थापन करण्यांत आली. त्यावेळीं तेथील महाराष्ट्रीयांचें संमेलन भरलें होतें. त्यावेळीं लंडनचे बहुतेक महाराष्ट्रीय विद्यार्थीहि हजर होते. 'महाराष्ट्र-भाषेच्या पूर्व पीठिके' संबंधाने माझें भाषण झालें.

लंडन येथे त्यावेळीं मुक्कामास असलेले भारतीय भाषाकोविद सर डॉ. ग्रियर्सन, व तेथीलच वास्तव्य असलेले डॉ. बार्नेट व डॉ. टर्नर यांच्याशींहि मी चर्चा केली. डॉ. सर ग्रीयर्सन हे फारच वृद्धावस्थेंत असल्यामुळे, त्यांच्याशीं औपचारिकच बोलणें झालें. डॉ. बॅार्नेट यांनी भारताच्या प्राचीन इतिहासावर बरेंच लिखाण केलेलें आहे. विदर्भात अनेक राजवंश होऊन गेले; त्याच्याकाळची इतिहासाचीं अनेक साधनें उपलब्ध होण्यासारखी असून, त्याच्या सहाय्याने विदर्भाचा संशोधनपूर्वक विस्तृत असा प्राचीन इतिहास लिहिणें शक्य आणि अवश्य आहे, असें त्यांनी सांगितलें; आणि मी विदर्भांत राहात असल्यामुळे हें कार्य हातीं घ्यावें अशी सूचना केली. विदर्भाच्या अशा इतिहासास उपयुक्त होणारी साधनसामुग्री आजपर्यंत अनेक संशोधकांच्या लिखाणांतून विस्कटलेली असली (मीहि या विषयावर कांहीं लेख प्रसिद्ध केले आहेत) तरी या बाबतींतील संशोधनाचें क्षेत्र संपलेलें दिसत नाहीं!

डॉ. टर्नर यांनी आपल्या ग्रंथांत, भारतीय सहा प्रमुख भाषांच्या समानार्थक आणि समव्युत्पत्ती असलेल्या शद्बांचें महत्वाचें परिशिष्ट जोडलेलें आहे. मी त्यांना मराठी भाषेचा इतिहास लिहिण्याचा संकल्पअसल्याचें सांगितलें. तेव्हा त्यांनी या शतकांत निर्माण झालेल्या भाषाशास्त्रासंबंधाने चर्चा केली; व त्या शास्त्रावरील नवीन ग्रंथाची सूची तयार करुन देऊन ते ग्रंथ वाचण्या-

करता सांगितले. ध्वनीशास्त्र, (Phonology) व्युत्पत्तिशास्त्र (Philology) व एकाच भाषेंतून निघालेल्या भाषांतील समान शब्दांच्या अध्ययनाची आवश्यकता त्यांनी प्रामुख्याने सुचविली.

'ब्रिटिश म्युझिअम' हें जगांतील सर्वांत मोठें व सुप्रसिद्ध वस्तुसंग्रहालय आहे. त्यांत ३५ लाखावर छापील पुस्तकें असून, सहस्त्रावधी हस्तलिखित दुर्मिळ ग्रंथ आहेत. इतिहास संशोधकांना ज्ञानार्जन करण्याची अति उत्तम व्यवस्था या संग्रहालयांत केलेली आहे. येथे अभ्यास करावयास मोफत मिळतें हें विशेष. स्कॉलर्सनी फक्त परवानगी मिळवावयाची असते. 'म्युझिअम' च्या पुस्तकसंग्रहांत, ग्रेट ब्रिटनमध्ये त्याच्या छत्राखालीं असलेल्या देशांत प्रसिद्ध झालेल्या प्रत्येक पुस्तकाची एक प्रत पाठविण्यांत आली पाहिजे असा नियम आहे.

ब्रिटीश म्युझिअमचे इजिप्शियन, सेपल्कर गॅलरी, आर्क्टिक, एशिऑटिक, सुमेरियन, बाबिलोनियन, हिंदी असे किती तरी विभाग केलेले आहेत. तसेच रोमन गॅलरी, सुवर्णालंकाराची खोली, नाण्याची खोली, हेहि विभाग दृष्टोस पडतात. 'एल्जिन्' संग्रहांतील संगमरवरी दगडांचे पुतळे पाहण्यासारखे आहेत. याशिवाय कलाकौशल्याच्या शेकडो वस्तू, नक्षी काम, खोदकाम, हिरे माणकांचे संग्रह, सृष्टपदार्थ ( Geological Specimens ) वगैरेहि पाहावयास सापडतात. हा संग्रह पूर्वी 'आयोनियन' शिल्पकलेचा नमुना असलेल्या भव्य व पुरानन इमारतीमध्ये होता. अलीकडे हा सृष्टपदार्थ संग्रह, शास्त्रीय विज्ञानांच्या असंख्य उपकरणासहीत 'साउथ कॉन्सिंग्टन' येथील अर्वाचीन पद्धतीवर बांधलेल्या इमारतींत नेलेला आहे. 'डिप्लोमा' व 'गिबन्स' गॅलऱ्यांत नामांकित चित्रकारांचीं व आधुनिक प्रसिद्ध कलावंतांचीं चित्रें आहेत. त्यांत वास्तववादी (Realistic ) चित्रें अत्यंत उच्च दर्जाचीं आहेत. वास्तववादी कलेंत पाश्चात्य लोक जवळ जवळ पूर्णावस्थेला गेले आहेत असें म्हटलें तरी चालेल. भारतांतील चित्रकार—कलावंतांनी काढलेल्या वास्तववादी चित्रकलेच्या नमुन्यांनी पाश्चात्य कलावंत स्तिमित होत नाहीत, हें खरें असलें तरी, आपल्या इकडील Indian decorative पद्धति त्यांना मोहिनी घातल्याशिवाय राहात नाही. पौर्वात्य कलेंतील रंगरचना, रेखासौंदर्य व कल्पनामाधुर्य यांचा इतका प्रकर्षास गेलेला त्रिवेणी-संगम

पाश्चात्य चित्रकलेंत सहसा पाहावयास मिळत नाही असें म्हणतां येईल. उलट पक्षी भारतीय चित्रकारांना पाश्चात्त्यांच्या वास्तविक चित्रकलेबद्दल नितांत आदर वाटतो.

पौर्वात्य चित्रकला पद्धतीचा दुसरा विशेष म्हणजे तींतील भावनादर्शन हा होय. बहुतेक देशांतील चित्रकलेवर भारतीय चित्रकलेची छाया पडलेली पाहून, भारतीयांची प्राचीनकाळीं या कलेंत किती प्रगति झालेली होती हें सहज दिसून येतें. कांही विद्वानांचें असें मत आहे की, मेक्सिको व मध्य अमेरिका इत्यादि ठिकाणींहि भारतीय संस्कृतीचा विकास इसवी सनापूर्वी किती तरी आगोदर झालेला होता. कारण तेथील माया मंदिराची रचना भारतीय मंदिराशीं पूर्णपणे जुळणारी अशीच आहे. ख्रिस्ती कलांमध्ये "सृष्टयालोक" (लँडस्केप) एशिआटिक कलेंतून आला असा विद्वानांचा एक अंदाज आहे. "भारतीय चित्रकलेचा प्रभाव चीन, तिबेट, इत्यादि पौर्वात्य देशांतील चित्रकलेवर तर पडला आहेच; पण ग्रीससारख्या देशाची चित्रकला सुद्धा भारतीय चित्रकलेची ऋणी आहे.... यूरोपांतील चित्रकला ही भारतीय चित्रकलेची परंपरा आहे" हेंच मत श्री. रामगोपाल विजयवर्गीय यांनी 'जयध्वनी' मासिकाचे एका विद्वत्तापूर्ण लेखांत मांडले असून, तें मननीय आहे यांत शंका नाही.

भारतीय चित्रकलेबद्दल खालील विद्वानांचीं व तज्ज्ञांचीं मतें पाहण्यासारखी आहेत. श्री. व्ही. एस्. अग्रवाल म्हणतातः *For a sympathetic understanding of the religious thoughts and the aesthetic emotions of the Indian people, the art creations of India so richly felt and exquisitely expressed, provide an infinite range of material both in form and colour.........To understand India we must enter the threshold of art and a new radiant world of beauty will unfold itself to our vision, with a rich record of emotional and spiritual experiences.

* Exhibition of Indian art held at the Government House Nov. 6, & Dec. 3, 1948 (Department of Archaeology) Introduction. P P IX, XVI, XVII

त्यांतल्या त्यांत राजस्थानी चित्रकलेबद्दल डॉ. कुमारस्वामींनी काढलेले उद्गार पाहाः—

"The work of the Rajput painters deserves to be given an honourable place amongst the great arts of the world. Its central theme is love. What Chinese art achieved for landscape is here accomplished for human love......the lovers represented are always Radha and Krishna typifying the eternal motif of man and woman... The typical examples of Rajasthani Paintings have for us this lesson, that what we cannot discover at home and in the familiar events, we cannot discover any where."

(Kumarswami)

या चित्रकलेंत चित्रित केलेल्या स्त्रिया त्यांच्या ध्येयशीलतेनुसारच, हुबेहुब चित्रीत केल्या गेल्या आहेत. "The women of these paintings are true to thair ideals, of feminine beauty-large lotus eyes flowing tresses, firm breasts, slender waists, and rosy hands. The heart of a Hindu woman, with all its devotional and emotional intensity is fully reflected in these paintings."

(Introduction)

विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे 'ब्रिटिश म्युझिअम' मध्ये भारतीय प्राचीन वस्तुसंग्रहाचा भाग वाढविण्याकडे पाश्चात्यांची प्रवृत्ति दिवसेंदिवस वाढत आहे, ही होय. या म्युझिअममध्ये हिंदी विभागांत प्राचीन भारतीय नाणीं, जरीचे कपडे, सोन्याचे दागिने अशा प्रकारच्या वस्तू मांडून ठेवलेल्या आहेत. 'इंडियन रूम' मध्ये दुसऱ्या शतकापासून बाराव्या शतकापर्यंतचा पुराणवस्तु संग्रह केलेला आहे. विशेषतः उत्तर प्रदेशांतील 'गांधार' शिल्पकलांचे नमुने अत्युत्कृष्ट आहेत. (हिंदी कलावस्तूंचे मोठे संग्रह 'आल्बर्ट म्युझियम' आणि 'बोडेलियन लायब्ररी' ऑक्सफर्ड येथेहि आहेत). याशिवाय तुर्कस्तान, इराण, तिबेट, जपान, चीन, ब्रम्हदेश, सयाम येथील चित्रकलेचे व मूर्तिकलेचे नमुने विपुल आहेत. भारतीय अभ्यासकांना, इंग्लंडमध्ये संग्रहीत केलेली ही साधनसामुग्री अतिशय महत्वाची आहे याबद्दल शंका राहात नाही!

सर्वच भारतीय वियाकलांविषयी, पाश्चात्यांत नुसती कौतुकाचीच भावना दिसून येत नसून, त्या कलांची कित्येक ठिकाणीं मोठ्या निष्ठेने उपासना चाललेली दिसून येते. प्रो. जॉली, प्रो. सिंगलिंग, प्रो. नोबेल इत्यादिकांनी व इतर शेकडो वियाव्यासंगी गृहस्थांनीं 'हिंदुधर्मशास्त्र,' 'ऋग्वेदांतील ऋचा,' 'हिंदी काव्यग्रंथांचा पाया' व इतर शेकडो अशाच विषयावर जगन्मान्य ग्रंथ लिहिलेले आहे. इतकेच नव्हे तर त्या त्या वियेच्या वा कलेच्या साधनेकरता आपापलीं जावितें वाहिलेलीं आहेत. उपनिषदें, भगवद्गीता इत्यादिकांतील तत्वांचे अनेक पडसाद पाश्चात्य कवीश्रेष्ठ ए. ई. हूजमन, लॉयोनेल जॉन्सन्, कझिन्स इत्यादिकांच्या कृतींत उठलेले दिसून येतात. भारतीय शास्त्रकलाविषयी वाटणारा नितांत आदर कॅप्टन पी, जान्स्टेन सेट, डॉ. हृशबर्ग इत्यादि पद्वीच्या पाश्चात्य विद्वानांनी वेळोवेळीं मुक्त कंठाने प्रकट केला आहे.

वरील विधानाची सत्यता दर्शविण्याकरता एकच प्रसंगाचा उल्लेख पुरेसा होईल!

* १९५१ मध्ये पोर्तुगालमधील लिज्बन येथे इतिहासप्रसिद्ध जेरोनिमु नामक इमारतींत ख्रिस्ती कलेचें एक प्रदर्शन उघडण्यांत आलें होतें. या प्रदर्शनांत अग्रस्थान पौर्वात्य कलाकारांना मिळालें होतें. पाद्रि हेरास यांच्या देखरेखीखाली हिंद विभागाची मांडणी झाली होती. पोर्तुगाल देशांतील प्रत्यक्ष वसाहत मंत्री सामेत रुद्रीगीश यांनीं पौर्वात्यकला व सुधारणा या विषयी गौरवाचे उद्गार काढले. बहुतेक लोकांचा घोळका हिंद व चीनच्या विभागांत दिसत होता. हिंदी विभागांत अनेक हिंदी कलाकारांचीं चित्रें ठेवलेलीं दिसत होतीं. ऑंजेल फोसेक, व म्हात्रे, शिरसाट वगैरे महाराष्ट्रीय चित्रकार त्यांत तळपत होते. हिंदी चित्रकारांचें रंगकौशल्य व रम्य सृष्टि निदर्शक वातावरण, चित्रांच्या भावनोद्दीपक भूमिका, हिंदी देशभूषा, व मोहजनक विशुद्ध परंपरा इत्यादिबद्दल जिकडे तिकडे प्रशंसोद्गार ऐकूं येत होते. प्रेक्षक आश्चर्याने चकित व मुग्ध होऊन 'जय इंदिया! इंदिया!' हे शब्द घुमवीत होते!!

* सह्याद्रि एकलव्य एप्रिल १९५२.

'ब्रिटिश म्युझिअम'मधील इतर व्यवस्थाहि अत्यंत प्रशंसनीय आहे. नाना देशाचे, पेशाचे व स्वभावाचे लोक 'म्युझिअम' पाहावयास तेथे जातात. एकाद्याला तरी तेथील एकादी वस्तू शर्विलकगिरी करून, बेपत्ता करण्याचा मोह होणें असंभवनीय नाही. याकरता एक मोठी मजेदार योजना तेथे केलेली आढळते. ज्या कांचेच्या पेट्यांत वरील वस्तू ठेवण्यांत आलेल्या असतात त्यांच्या तावदानाला आंतून एक 'गुप्त साखळी' अडकविलेली असून, तिला शेवटी घंटी जोडलेली असते. एकाद्याने वस्तू काढण्याचा प्रयत्न केलाच तर त्या घंटीमुळे विद्युद्वेगाने, 'म्युझिअम'च्या अधिकाऱ्यांना धोक्याची सूचना मिळून गुन्हेगार पकडल्या जातो!

तेथे असतांना, 'इंडिआ ऑफिस लायब्ररींत'हि टिपणें घेतलीं. तेथे स्कॉलर्सना' अभ्यास करण्याकरता सर्व प्रकारच्या उत्कृष्ट सोयी आहेत.

ब्रिटीश म्युझियमचें वाचनालयहि फार विस्तृत आहे. त्यांतील दालनांत रॉयल सोसायटीच्या विख्यात शास्त्रज्ञ-संशोधक सभासदांचे अर्धपुरुषाकृति पुतळे ठेवलेले आहेत. पहिला पुतळा गणितशास्त्रज्ञ न्यूटनचा आहे. अवयवांचे प्रमाण, नैसर्गिक ठेवण व यथोचित भावनाप्रकर्ष यामुळे या शिल्पप्रतिमा जिवंत वाटतात. वरील संस्थेंत व 'स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीज' मध्येहि कांही महत्वाचे ग्रंथ अवलोकन करावयास मिळाले.

इंग्लंडमध्ये शेकडो पाहण्यासारखीं स्थळें आहेत. त्यांची नांवनिशी कोठवर द्यावी? अगदीच अप्रतीम स्थळें सुद्धा ओझरतीच पाहावयास मिळालीं! स्मृतिपटलावर नेहमी ताजें राहणारें एक दृश्य म्हणजे, कवींचीं छायाचित्रें व त्याच्या जीवनाशीं निगडित असलेल्या पुराणवस्तूंनी कवीचें अप्रत्यक्ष दर्शन घडविणारे, कवि कीट्सचें उदासरम्य निवासस्थान! तेथे पदार्पण केल्यानंतर कवीच्या असामान्य व्यक्तिमत्वाने अजूनहि त्या स्थळाचा परिसर कणकणशः भारलेला आहे हें लक्षांत येतें! व शेलेच्या कवि कीट्सवर लिहिलेल्या 'Adonais' मधील

"Times worst statute unrepealed
Are graves from which a glorious Phantom may
Burst to illumine our tempestuous day."

या अमर ओळी सहजच रसनाग्रावर खेळूं लागतात!

इग्लंडमध्ये दोन महिने काढल्यानंतर पॅरिसला पुन्हा सात आठ दिवस होतों. या वेळेला तेथे गेल्या पन्नास वर्षांत पडली नसेल इतकी थंडी पडली होती. दूध व तळघरामधील दारू गोठली होती! फ्लॅनेलचा 'अंडरवेअर,' त्यावर फ्लॅनेलचा पायजमा, त्यावर गरम पँट, अंगामध्ये फ्लॅनेलची घट्ट बसणारी बंडी, त्यावर शर्ट, गरम जाकिट, त्यावर पुल ओव्हर, (स्वेटरसारखे) कोटावर ओव्हरकोट व पायामध्ये एकावर एक डबल पायमोजे, हातांत लेदरचे हातमोजे हे सर्व कपडे एकाचे वेळीं घालून व खोलीमध्ये इलेक्ट्रिक गॅसच्या शेगडीजवळ बसून राहिले तरच थंडीपासून बचाव होई! शेगडीला मिटरसारखे यंत्र असतें. त्यांत जितके शिलिंग टाकाल तितक्यापुरता गॅस येतो व तो आगपेटीने पेटवावा लागतो. वरील प्रकारची सर्व काळजी घेऊन देखील थंडीने शेवटीं आजारी पडावें लागलेंच. सबंध तोंड सुजलें होतें. तेथील एका 'हॉस्पिटल' मध्येच राहावें लागलें. तेथे असतांना मुंबईचे सर एम्. बी. चौबळ यांचा मुलगा फ्रेंच विश्वविद्यालयाच्या 'प्राध्यापकाचा' 'डिप्लोमा' घेण्यास आला होता. त्याची आजारपणांत चांगलीच मदत झाली. परदेशांत असतांना मनुष्य आजारी पडला कीं घरची सारखी आठवण येऊन 'Home sweet home' या एकाच भावनेने मन भरून जातें. महत्वांच्या गोष्टींची व निकट मित्रांची तर राहोच पण लहान सहान वस्तूंचीहि व विशेष परिचय नसलेल्यांचीहि आस्थापूर्वक आठवण यावयास लागते! परदेशांत असतांना सुग्रास भोजनांचा आस्वाद घेत असता आपले इकडील कोरड्या भाकरीकरता देखील कित्येक वेळीं मन आसुसलेलें असतें! यावेळच्या पॅरिसमधील मुक्कामांत चौकर नांवाच्या गृहस्थाच्या घरीं जेवावयास गेलों होतों. त्यावेळीं त्यांच्या कुटुंबाने बाजरीची भाकर करून घातली होती. जवळ जवळ दोन महिन्यानंतरचे तें खास वऱ्हाडी जेवण अगदींच गोड लागलें असल्यास नवल नाही!

अशा स्थितींत आपल्याला स्वदेशाकडील पत्रांचेहि फार महत्व वाटतें व डोळे पोष्टमनच्या वाटेकडे लागलेले असतात. त्याच सुमारास राजाभाऊचे (माझा वडील मुलगा) शालक व्यंकटराव उर्फ भाउसाहेब देशमुख यांचें पत्र आलें होतें. "आमच्यापैकी एक व्यक्ति इंग्लंडसारख्या अत्यंत दूर

देशांत अभ्यास करण्याकरता जाऊन राहिली आहे व आपल्या प्रांताच्या कीर्तीत भर टाकण्याकरता तिचे प्रयत्न चाललेले आहेत, याबद्दल फार पूज्यभाव व आनंद वाटतो.'' तें पत्र वांचून बरें वाटलें. त्याचप्रमाणे ''आपल्या प्रकृतीची काळजी घ्यावी. तिकडील काम अपुरें राहूं देऊं नये. इकडे कधी येणार तें कळवावें म्हणजे मुंबईस येईन.'' अशा अर्थाचें सौ. माईचेंहि (माझी वडील मुलगी) पत्र मिळालें. त्यामुळे मनावरचें उदासीनतेचें पटल पार कोठल्या कोठे लोपून गेलें. विशेषत: माझें कार्याबद्दल तिची आस्था पाहून धन्यतापूर्वक अभिमान वाटला !

पॅरिसवरून हिंदुस्तानांत येण्याकरता जिनेव्हा मार्गाने यावें लागतें. तेथे एक दिवस होतों. पुढे रोम येथे आठ दिवसांचा मुक्काम झाला. त्या अवधींत तेथील 'व्हेटिकन म्युझिअम व लायब्ररी', 'कोलॅसो' इत्यादि प्राचीन अवशेष पाहिले.

रोमनंतर नेपल्सला १–२ दिवस राहाण्याचा योग आला, येथील जीवशास्त्रीय प्रयोगशाळा प्रेक्षणीय आहे. नक्षत्राकार मासे (Star fish) या प्रयोगशाळेचें एक मोठें आकर्षण आहे. डार्विन या विश्वविख्यात शास्त्रज्ञाच्या अर्ध पुरुषाकृति काशाच्या पुतळ्याने या प्रयोगशाळेच्या ग्रंथसंग्रहालयाला शोभा आलेली आहे.

नेपल्सला 'पोर्ट' वरील 'फुटपाथ'वरून जात असता एका शौकिनाने विचारलें "Do you want a girl? Available for five chips! ah!" मी हंसून म्हटलें "Sorry; many thanks !!" पाश्चात्य देशांत वरील प्रकारचे प्रसंग नेहमीच्या परिचयांतील असतात. त्यांत विशेष नाही! पण त्या ऐंद्रजालिक मोहविवर्तातून शिरसलामत बाहेर पडणें म्हणजे एक मोठे अग्निदिव्यच आहे! पाश्चात्य देशांत शिक्षणाप्रीत्यर्थ वगैरे गेलेले तरुणच नव्हे तर अर्धवयस्क व कदाचित उत्तरवयस्कहि आपलें ध्येय सोडून भलतीकडे वाहावलेले दिसतात. कादंबऱ्यांतून व लघुकथांतून यासंबंधी दाखविलेलीं चित्रें अतिरंजित नाहीत! मद्यपान आणि मांसभक्षण शीतनिवारणार्थ जीवनास आवश्यक आहे असें सांगून, कित्येक मित्रांनी त्यांचें सेवन करण्याचा मला पराकाष्ठेचा आग्रह केला होता. निदान अंडी तरी घ्यावयास कांही हरकत

नाही असा सुवर्णमध्य (!) हि सुचविला होता; पण मन खंबीर असल्यास याची काही जरूरी नाही, हें मी स्वतःच्या अनुभवावरून सांगूं शकतों. या वस्तूंवें, एकदाहि मी सेवन केलें नाही हें सांगण्यास मला धन्यता वाटत!

नेपल्सवरून दुसरे दिवशीं 'कॉन्टेबायन् कॅमेनो' या बोटीनें निघून ७ फेब्रुवारी रोजीं मुंबईला उतरलों व येणेप्रमाणे माझा यूरोपचा प्रवास संपविला.



'वरील भागात लेखकाची बरीच माहिती आलेली आहे.'

# डॉ. देशपांडे यांचें व्यक्तिमत्व ५

डॉ. देशपांडे यांना आप्पासाहेब असे खासगी नांवाने संबोधतात. त्यांच्या स्वभावाचे निर्लोभता, स्थितप्रज्ञता, साधेपणा, शांतपणा, सौजन्य निर्मत्सरीपणा, आनंदी वृत्ति इत्यादि अनेक पैलू, आतापर्यंत आलेल्या अनेक उल्लेखांवरून, व ग्रंथाच्या शेवटीं दिलेल्या त्यांच्या मित्रांच्या आठवणींवरून, वाचकांच्या लक्षांत आलेलेच आहेत, किंवा येतील.

आप्पासाहेबांच्या सहवासांत, त्यांच्या निगर्वीपणाचें पदोपदीं दर्शन होतें. आपल्या ज्ञानाचें वेळीं अवेळीं प्रदर्शन करणें हें जसें त्यास आवडत नाही, त्याच प्रमाणे दुसऱ्याचें ज्ञान कितीहि अल्प असलें तरी, ते त्याबद्दल तिरस्कार दर्शविणार नाहीत. आपलीं मतें तींच बरोबर, असा अभिनिवेश त्यांच्यांत नाही. कदाचित् कित्येक वेळेला त्यांचींच मतें ठाम नसतात त्याचा हा परिणाम असेल! त्यांना कोणाचें म्हणणें रुचलें किंवा पटलें नाही तर ते मौन स्वीकारतील पण आपलीं मतें लोकांच्या गळीं उतरविण्याची ते कधीहि खटपट करीत नाहीत. कोणाच्या अंगीं काय गुण आहेत हेच ते पाहतात. कुणी त्यांची स्तुति केल्यास जसें त्यांना मूटभर मास चढल्यासारखें होत नाही, त्याच प्रमाणे कुणी कदाचित् त्यांची निंदा केल्यास तें त्यांच्या गावींहि नसतें. त्यांनी स्वतः कुणाची निंदा केली आहे असें निदान मला तरी स्मरत नाहीं! त्यांची वागणूक सर्वांशीं ममतेची, मनमिळाऊपणाची असते. कितीहि हास्यकारक प्रसंग असला तरी त्याचें ग्रहण (appreciation) ते खळखळून हसत मुळीच करणार नाहीत, तर केवळ मंदस्मिताने करतील. हाच संयम त्यांच्या सर्वत्र जीवनांत दिसून येतो. सभ्य गृहस्थाचे सर्व गुण त्यांच्यांत एकवटलेले आहेत.

त्यांच्या वर्तनांत जसा साधेपणा दिसतो, त्याहूनहि जास्त त्यांच्या पोषाकांत दृष्टीस पडतो. एके प्रसंगीं त्यांना हिंगण्याच्या 'वुइमेन्स कॉलेज' मध्ये जाण्याचा प्रसंग आला. तेथे एक प्राध्यापक खुर्चीवर स्थानापन्न होऊन एक जाडजूड ग्रंथ चाळत होते. आलेल्या इसमाला अगदींच साध्या पोषाकांत—वऱ्हाडी फेटा, लांब कोट व त्यांच्या खिशांतून डोकावत असलेली चंची इ. पाहून त्याला 'या बसा, म्हणण्याची किंवा त्यांच्याशीं एक शब्दहि बोलण्याची त्याना आवश्यकता भासली नाही! तेथे असलेल्या दुसऱ्या खुर्चीत बैठक मारून, व टेबलावर असलेल्या संस्थेच्या अहवालाची इंग्रजी प्रत हातांत घेऊन, ती चाळावयास आप्पासाहेबांनी सुरुवात केली. त्या प्रतींतील एक अक्षरहि त्यांना कळणार नाही अशा समजुतीने, आपल्या जाड फ्रेमच्या चष्म्याच्या दृष्टींतून उर्ध्व दृष्टीपात करीत प्राध्यापक साहेबांनी 'थांबा हं! मी तुम्हाला मराठी प्रत आणून देतों,' असें म्हणून, शेजारच्या खोलीकडे आपलीं पावलें वळविलीं. कांही वेळाने ते परत आल्यावर आप्पासाहेब कवी मायदेव यांच्याशीं बोलत होते. मायदेवांनी त्यांना विचारलें "कसे काय आप्पासाहेब! विदर्भांतील महानुभावियांचें संशोधन कोठपर्यंत आलें आहे?" आपल्यासमोर असलेली व्यक्ति प्रसिद्ध इतिहाससंशोधक य. खु. देशपांडे आहेत हे कळतांच, प्राध्यापकमजकुरांना किती ओशाळल्यागत झालें असेल याची कल्पनाच केलेली बरी! त्यांनी आप्पासाहेबांची सपशेल माफी मागितली! गमतीची गोष्ट ही की, आप्पासाहेबांचा नुकताच प्रसिद्ध झालेला व त्या विद्यापीठाने स्वतःच्या अभ्यासक्रमांत नेमलेला 'महानुभावीय मराठी वाङ्मय' हा ग्रंथहि योगायोगामुळे समोरच टेबलावर पडला होता!

याचबरोबर त्यांच्या स्वभावांतील प्रांजलपणा, त्यांच्याविषयी आदर द्विगुणित करण्यास सहाय्यभूत होतो. एकादी गोष्ट त्यांना माहिती नसली तर 'हें मला माहीत नाही, किंवा येत नाही' असे ते सरळ सांगतील. 'काव्याच्या बाबतींत मला मुळीच समजत नाही' असें ते स्वच्छ सांगतात! मूर्खास देखील आपण विद्वान आहोंत असें भासविण्याचा मोह होतो. अल्पज्ञानाच्या भांडवलावर, आपल्या क्षुद्र बुद्धिमत्तेचा किफायतशीर व्यापार

करणारे थोडे थोडके विद्वान (!) नाहीत! ज्याप्रमाणे ते बोलण्यांत अकारण शब्दावडंबर माजवीत नाहीत, त्याचप्रमाणे लिहिण्यांतहि. 'सोपा विषय, जो जास्त कठीण करून ठेवतो तो खरा विद्वान' अशी कुणीशी विद्वानाची व्याख्या केलेली आहे त्याचें प्रत्यंतर आप्पासाहेबांच्या बाबतींत तरी सुदैवाने येत नाही. त्यांच्या मितभाषणी स्वभावामुळे त्यांच्याकडून अनेकवार विचारणा करून एकादा मुद्दा काढून घेण्याचा प्रयत्न करावा लागतो. प्रस्तुत ग्रंथाकरता मला त्यांचेकडून विशेष अशी कोणतीच माहिती—त्यांतल्या त्यांत त्यांच्या जीवनविषयक मिळूं शकली नाही. मलाच बहुतेक माहिती संकलीत करावी लागली. एका दृष्टीने त्याचा फायदाच झाला. चार दोन ज्ञानकण पदरांत पडले! त्यांच्या अंगीं वक्तृत्वकलेचा बराच अभाव आहे. त्यांच्या भाषणांत आवेश, ठसकेदारपणा, कलात्मक आकर्षकता, इत्यादि कांहीच नसल्यामुळे तीं चटकदार होऊं शकत नाहीत. पण त्यांत असलेल्या माहितीमुळे तीं सुमह्य होतात एवढेंच. शिवाय दुर्मिळतेमुळे एकाद्या वस्तूचें महत्व विशेषच वाटावें, त्याप्रमाणे मितभाषणी गृहस्थाकडून आपल्या कानावर चार दोन शब्द पडावेत, ही उत्सुकता सर्वांसच असते. त्यामुळे त्यांचे भाषण ऐकण्यास मन तयार होतें. या त्यांच्या मितभाषणीपणामुळे त्यांना निरनिराळ्या भाषा अवगत असतील हे सुशिक्षितांनाहि माहीत असण्याचा संभव कमीच असतो. त्याचप्रमाणे त्यांच्या लेखनांत आकर्षकत्व वगैरे नाही, याचा उल्लेख पुढे येईलच.

कित्येक विद्वानांत दिसणारा तऱ्हेवाईकपणा, विक्षिप्तपणा, व एककल्लीपणा इत्यादिकांच्या छटा त्यांच्या वागणूकींत मुळीच दिसून येत नाहीत! कोण्याहि व्यक्तीस आपलें एकाद्या बाबतींत महत्व वाढत आहे याची जाणीव जसजशी होत जाते, तसतसा वरील दुर्गुणांचा तींत आस्ते आस्ते प्रादुर्भाव होत जातो. विद्वत्तेचा मदोन्मत्तपणा तर फार दुर्निवार्य गोष्ट आहे! साहित्यिकांत जितके विक्षिप्त सापडतील, तितके इतर क्षेत्रांत सापडणार नाहीत असें वाटतें. असंख्य उदाहरणें देतां येतील. डॉ. जान्सन जितका विद्वान् त्यापेक्षाहि विक्षिप्त! आपल्यापेक्षा सव्वीस वर्षें वडील स्त्रीशीं त्याने विवाह केला होता हें कुणास माहीत नाही? डॉ. केतकरांच्या वागणुकींतील विक्षिप्तपणा सर्वांस परिचित आहे. राजाराम शास्त्री भागवत स्पष्टवक्ते म्हणून विक्षिप्त भासत

राजवाड्यांचा संतापीपणा व विक्षिप्तपणा तर महशूरच आहे. ग्वाल्हेरच्या एका भिक्षुकाने त्यांना पोथ्या दिल्या नाहीत, तेव्हा ते संतापाने उद्गारले, "तुझ्या विधवा बायकोपासून मी त्या सर्व पोथ्या घेईन !!" साहित्यिकांच्या विक्षिप्तपणावर लिहिलें तर एक विनोदी ग्रंथ तयार होईल. अशा तऱ्हेचा आततायी विक्षिप्तपणा यदाकदाचित् साहित्यिकांच्या विद्वत्तेला शोभून जाऊन, प्रसंगी त्यांचें कौतुक होत असलें व त्यांच्या चरित्रकारांना त्यांच्या तऱ्हेवाईकपणाची रसभरीत वर्णनें लिहिल्याबद्दल वाचकांकडून शाबासकी मिळवून देण्यांत उपयुक्त होत असला, तरी त्या त्या व्यक्तींना तो एक दोषच आहे, असें म्हणावें लागेल. नाकासमोर सरळ जाणाऱ्या गृहस्थासारखा आप्पासाहेबांचा ऋजु आयुष्यक्रम असल्यामुळे, त्यांच्या आयुष्यांत प्रायः एकहि 'लोक विलक्षण' घटना घडून आली नाही.

शिवाय बडा साहित्यिक म्हटला की प्रायः त्याला या ना त्या प्रकारचें एकादें बडें व्यसन जडलेलें असावयाचेंच ! आप्पासाहेबांना विद्याव्यासंगाशिवाय व सुपारीशिवाय दुसरें कसलेंहि व्यसन नाही ! त्यांचें धूम्रपान व्यसनाच्या सदरांत येणार नाही. पण त्या बाबतींत त्यांचें एकमेव खास वैशिष्ट्य आहे ! प्रत्येक वर्षी मध्यरात्रीं ३१ डिसेंबरचा ठोका पडला रे पडला की, त्यांचें धूम्रपानाचें अभिसत्र जें सुरू होतें, तें भडकलेल्या ज्वालामुखी प्रमाणे फक्त एक महिना—एक मिनीटहि जास्त नाही !—चालू राहतें !! त्या अवधींत धूम्रपानाचे यच्चयावत सर्व प्रकार अमलांत येऊन, त्यांच्या नवीन खरेदी केलेल्या व शिलकींत असलेल्या सर्व सिगारेट्सचा फन्ना पडतो ! जानेवारीच्या मध्यरात्रींच्या बरोबर १२ च्या ठोक्याला तें (पुढच्या सालच्या डिसेंबर ३१ रात्रीं बारा वाजेपर्यंत) अजिबात बंद पडतें. मग मधल्या काळांत कोणत्याहि प्रसंगीं ते सिगारेटला शिवत नाहीत ! यावरून स्वतःच्या मनावर त्यांचा किती ताबा आहे हें दिसून येईल.

त्यांच्या विद्येच्या व्यसनाबद्दल लिहावयाचें म्हणजे ते आजीव विद्यार्थी आहेत. विश्वविद्यालयाचें शिक्षण संपल्यानंतर, बहुतेक गृहस्थ आपल्या पुस्तकांच्या दप्तराला गाठ मारून ठेऊन, किंवा तें कोठे तरी टाकून, आपल्या व्यासंगाला कायमची तिलांजली देतात. केवळ ज्ञानाकरता ज्ञान मिळविण्याचा

निष्काम कर्मयोग कोण करीत बसतो? व्यावहारिक दृष्टीला तो एक कालापव्यय वाटतो. विद्येला, साध्य न मानता तिचा साधनाप्रमाणे उपयोग करणें हें 'उपयोगवाद्यां'ना, साजेसेंच आहे! त्याना विद्येच्या सात्विक ब्रम्हानंदाची कल्पना कशी येणार? व त्यामुळे त्या अव्यापारेषु व्यापारांत (!) ते नाहक कशाला पडतील?

आप्पासाहेबाना वाचनाचा हव्यास बराच आहे. तुम्ही त्यांचेकडे केव्हाहि गेलात तरी, ते आपल्या छोट्याशा खोलींत, मळक्या तक्याला टेकून, किंवा आराम खुर्चीत काहीतरी वाचत असलेले तुम्हाला दिसतील. जवळ जवळ संशोधन ग्रंथाइतक्याच आवडीने ते जुनीं नवीं काव्यें, नवीन कादंबऱ्या, हिंदी मासिकांतील प्रणयकथा, गुप्त पोलिसांच्या गोष्टी, मुलामुलींच्या व चिमण्या कावळयाच्या गोष्टीहि वाचतील. भारतांतील इतिहासस्थळें तर त्यांनी पाहिलींच; पण यूरोपमधीलहि अशीं कांही पाहण्याचा त्यांना योगायोग आला व ग्रंथ संग्रहालयांतहि वाचनाची संधी मिळाली. त्यामुळे विदर्भांतील प्राचीन अवशेषांसंबंधी व इतरत्रहि त्यांना जेवढी माहिती आहे तेवढी आपल्या प्रांतांत थोड्यानाच असेल. याबद्दल श्री. गु. ह. देशपांडे यांची एक आठवण देतों.

"जळगांव (पूर्व खानदेश) येथे श्री. न्यायमूर्ति केशवराव कोरटकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या विदर्भ साहित्य संमेलनाकरता, मी व श्री. आप्पासाहेब गेलों होतों. संमेलन आटोपल्यावर आजिंठ्याची लेणी पाहण्याचा आमचा बेत ठरला. त्याप्रमाणे आप्पासाहेब, मी व संमेलनाला उपस्थित असल्यापैकी कांही विद्वान गृहस्थ, एक भाड्याची लॉरी करून अजिंठ्यास गेलों. तेथील दुसऱ्या नंबरची गुहा विस्मयपूर्ण व कुतुहलयुक्त भावनेने पाहत असतां, तींत एक राजदरबाराचें चित्र आम्हाला दिसलें. या चित्रांत राजसिंहासनाच्या डाव्या बाजूला एक टोपीवाला चित्रित केलेला आहे, ही गोष्ट प्रथम माझ्या लक्षांत आली. 'इतक्या पुरातन काळांतील, या चित्रांत हा टोपीवाला कसा?' अशी मी आप्पासाहेबांना पृच्छा केली. श्री. आप्पासाहेबांनी हा दरबार श्रीहर्षकालीन राष्ट्रकूट राजा सत्याश्रय पुलकेशी दुसरा याचा असून, हा टोपीवाला त्याकाळीं या दरबारांत असलेला ग्रीक

वकील (अॅम्बॅसिडर) आहे असें सांगितलें. माझ्यासारख्या इतिहासाभिज्ञास, प्राचीन इतिहासाची व त्यांतील घटनांची आप्पासाहेबास एवढी माहिती असलेली पाहून, त्यांच्याविषयी सादर कुतुहल वाटलें."

सर्व साधारण लोकांत, कांही बाबतीबद्दल जशा आवडी निवडी असतात, तशा फार करून आप्पासाहेबांत दिसत नाहीत. खाद्यपेयाच्या बाबतींत कित्येक लोकांत कमालीचा चोखंदळपणा दिसून येतो! अमुक एक प्रकारचें पक्वान्न किंवा भाजी वगैरे असली तरच कित्येकांच्या मुखावर प्रसन्नता येते. दुसऱ्या प्रकारची असली की त्याचा मर्जी जाते! सात नंबरची बिडी ओढणाऱ्याला 'शिकारी सुंदरी' चालत नाही व 'सन् फ्लॉवर' ओढणाऱ्याला 'पासिंग शो' चा आस्वाद बरा वाटत नाही. आप्पासाहेबांची कोणत्याच बाबतींत कसलीच तक्रार नसते! कोणतेहि खाद्य ते सारख्याच आवडीने खातात! त्यांचे अमुक एक गोष्टीवाचून अडलें आहे, असें कधी घडत नाही. त्यांना द्वंद्वाची बाधा सहसा होत नाही. गुलाबाचें फूल पाहून होणारा आनद व त्याचे काटे पाहून होणारें दुःख यांच्या सीमारेषा त्यांच्या बाबतींत जवळ जवळ एकच असतात. त्याचें सज्जनाबद्दलचें प्रेम व दुर्जनाबद्दलचा तिरस्कार यांच्यांतहि फारशी तफावत नसते. तसे म्हटले तर त्यांना सौंदर्यात्मक दृष्टि, (Aesthetic sense) रसिकता व मार्मिकता बरीच कमी आहे!

एका टोकाला, पै पैशाकरता जिकीर करणारे, 'जित्या काट्या' कडेच (व्यापारी लोक दुसऱ्याकडून माल विकत घेतांना मालाकडून काटा नेहमी झुकता घेतात!) दृष्टि ठेवणारे, कमींत कमी 'प्रिमीअम' देऊन जास्तींत जास्ती 'बोनस' देणाऱ्या कंपन्या धुंडाळण्याकडे गुंतलेले, स्वतःची फाउंटन पेन दुसऱ्याला थोडावेळ लिहावयास दिली असतां किती शाई खर्च होते हें डोळ्यांत तेल घालून पाहाणारे बहुसंख्य पोटार्थी लोक समाजांत सापडतात, तर दुसऱ्या टोकाला, स्वतःच्या ध्येयस्थंडिलावर सर्वस्वाचा होम झाला तरी तें लक्षांतहि न येणारे कांही थोडे लोक दिसतात. पोटार्थी, चिंतेच्या भेसूर चितेवर जळतांना दिसतो, तर ध्येयार्थीहि कष्टांच्या अग्निवलयांत होरपळत असतो. फरक एवढाच की, एकाच्या जळण्याला तादृश किंमत नसते; तर दुसऱ्याचें जळणें, यज्ञाच्या पावन अग्नींत जळणाऱ्या उंबराच्या इंधनाप्रमाणे, जगाच्या कुतूहलमिश्र आदरास पात्र होऊन बसतें!!

अप्पासाहेब हे ध्येयार्थी आहेत. ध्येयमय जीवनांतील सर्व आपत्तींचा त्यांनी जाणून स्वीकार केलेला आहे! ध्येयाचा कठोर परमेश्वर संपूर्ण आत्मबलिदान केल्याशिवाय कधीच कृपा करीत नाही!

**मन स्वरूपी लाविजे। तेणे तेथेची रमिजे**
**मग आनंदे फुंजो लागिजे। ते पै संश्लिष्टता (२-८६)**
**ब्रम्हीं चित्त निःशेष नुरे। केवळ ज्ञप्तिची उरे**
**सुखाचा फुंजही उतरे। ते सुलीनता ॥२-८७॥**

— विवेकसिंधु —

अशा तऱ्हेच्या 'विक्षिप्ता' 'गतायाता' 'सश्लिष्टता' इत्यादि मनाच्या स्थितींतून, सुलीननेंत विलीन होणाऱ्या ब्रम्हानुसंधानाच्या अभ्यासूप्रमाणे त्यांची काही अंशी वृत्ति झालेली आहे! ते संशोधन–ब्रम्हाच्या ठायीं एवढे समरस झालेले आहेत की, त्यांना आता निराळें अस्तित्वच उरलेलें नाही! आपल्या कार्याशीं ते इतके तन्मय होतात की त्यांच्या डोळ्यासमोरून व्यावहारिक घटना लुप्तप्राय होतात! यवतमाळगावच्या बाहेर त्यांच्या 'प्लॉट'ला लागूनच, एका गृहस्थाचा 'प्लॉट' होता. अप्पासाहेब यांनी आपल्या स्वतःच्या 'प्लॉट'-मध्ये विहीर खोदण्याचे काम, एका 'कान्ट्रक्टर'ला दिलें होतें. त्याने ती विहीर अप्पासाहेबांच्या प्लॉटमध्ये न खोदता चुकून उपरोक्त गृहस्थाच्या शेजारच्या प्लॉटमध्ये खोदली! कार्यमग्नतेमुळे अप्पासाहेबांना बरेच दिवस त्या बाजूस जावयास फावलें नाही 'Alladin and his wonderful lamp' या अद्भुत कथेंत वर्णन केल्याप्रमाणे, आपल्या 'प्लॉट'मध्ये एकाएकी विहीर अवतीर्ण झाल्याचें पाहून, त्या गृहस्थाच्या डोक्यातून प्रश्नचिन्ह उमटल व अप्पासाहेबांच्या मित्रमंडळींत तो एक गमतीचा विषय होऊन बसला. पण माझ्या मतें त्यांनी आपलें ध्येयशिखर गाठून, विदर्भसंशोधनाबद्दल परराष्ट्रांतसुद्धा थोडेसें औत्सुक्य निर्माण केलें, या त्यांच्या यशाची गुरुकिल्ली, त्यांच्या याच गुणांत आहे. आर्किमिडीज वगैरे शास्त्रज्ञांच्या आपण अशाच गोष्टी वाचत नाही का? स्वप्नीं, शयनीं, अशनीं जागृतींत अप्पासाहेबांच्या मनांत एकच विषया घोळतो, तो म्हणजे संशोधन! कोठेंहि जुन्य ।कागदपत्रांत्रें बाड आहे, हें समजलें की बाकीचीं सर्व महत्वाचीं कामें बाजूस सारून तें

शारदाश्रमांत आणल्याशिवाय किंवा निदान तें चाळल्याशिवाय त्यांना चैन पडत नाही. खोकला, प्रेम, व स्फूर्ति दाबून ठेवतां येत नाहीत" त्याचप्रमाणे ह्याडाच्या संशोधकाला जुन्या कागदपत्राविषयीची किंवा जुन्या अवशेषाविषयाची जिज्ञासा थोपवून ठेवतां येणें अशक्य होते. त्रास व धोका पत्करूनहि तो तें हस्तगत करण्याचा किंवा पाहण्याचा तरी प्रयत्न केल्याशिवाय राहात नाही.

सन १९२८ सालीं मी व श्री. आप्पासाहेब देशपांडे मिळून माहूरला गेलों होतों. माहूरच्या किल्ल्यांत एक जुना राजवाडा आहे. किल्ल्याभोवतीं दाट जंगल असून, तेथे रानटी जनावरें नेहमीं फिरकत असतात. त्या राजवाड्यांत दिवसाहि थोडाबहुत अंधारच असतो. आप्पासाहेबास तो राजवाडा पाहाण्याची इच्छा झाली. लोकांनी सांगितलें, 'तेथे जाणें धोक्याचें आहे.' पण त्यांची जिज्ञासा त्यांना स्वस्थ बसूं देईना! राजवाड्याजवळच्या रस्त्याने आम्ही जात असतां, तेथे रक्ताचे कांही डाग दिसत असून, एकाद्या हिंस्र पशूने एकादें सावज मारून नेल्याची ग्वाही देत होते. पण आप्पासाहेबांचा राजवाडा पाहाण्याचा आग्रह चालूच होता. शेवटी आम्ही तो राजवाडा पाहून आलों !!

ध्येयशील जीवनाचा मार्ग पत्करल्यामुळे, आप्पासाहेबांच्या जीवनांत व प्रपंचांत व्यवस्थितपणा आला नाही. त्यांच्या येथे असलेल्या पुस्तकांच्या व कागदपत्रांच्या गळाठ्यांतून संदर्भाकरता एकादें पुस्तक वा कागद लागत असल्यास, तो मिळणें बहुतेक दुरापास्तच होतें. तशीच पत्रांची स्थिति. आलेल्या पत्रांना उत्तरें लवकर जावयाचीं नाहीत. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचें-बद्दल या बाबतींत असें सांगतात की, पत्र पोहोचल्याच्या दिवशींच बहुतेक उत्तर जावयाचें, हा त्यांचा शिरस्ता असे. याबद्दल कित्येक आप्पासाहेबांना दोष देतील व म्हणतील की, वाङ्मयीन कार्याबरोबरच, व्यावहारिक बाबतींतहि माणसाने दक्ष असावयास नको काय? ज्याप्रमाणे कुक्कुटाचा एक डोळा आकाशांतील घारीकडे असतो, व दुसरा डोळा जमीनीकडे असून दाणे

*श्री. वा. ना. देशपांडे यांची आठवण

टिपण्याची दक्षता घेतो, त्याचप्रमाणे कोणत्याहि व्यक्तीने दोन्ही बाजू सारख्याच सांभाळावयास नकोत काय? पण अशा तऱ्हेचीं उदाहरणें केवळ अपवादादाखलच दृष्टीस पडतात! जगांतील बहुतेक थोर व अलौकिक व्यक्तींच्या जीवनांत व्यावहारिक व प्रापंचिक बाबतींत प्राय: दुर्लक्षच झालेलें दिसून येतें. कित्येक तत्वज्ञांचे लक्ष आकाशांतील तारकांकडे असल्यामुळे त्यांना जमिनीवरील खड्यांत पडण्याचाच बहुधा प्रसंग आलेला आहे! दक्षतेचें व शिस्तीचें बिरुद बांधलेल्यांच्या व घड्याळाच्या टोक्याबरहुकूम काम करणाराच्या हातून जेवढें कार्य कदाचित् झालें नसेल, त्याच्यापेक्षा कितीतरी महत्वाचें कार्य आप्पासाहेबांच्या गैरशिस्तींतून झालेलें आहे!

'प्राचीन वस्तूवरील आत्यंतिक प्रेम' हा आप्पासाहेबाचा खास विशेष असून, तो संशोधकास भूषणास्पदच आहे असें म्हटलें पाहिजे. जुनें पाय मोडलेलें टेबल, जुन्या खुर्च्या, जुनीं बांकें, पॉलिश गेलेल्या आलमाऱ्या, जुन्या कातडी बॅग हें त्याचें वैभव पाहून आपल्यास अपटुडेट म्हणविणारा, व आप्पासाहेबांच्या स्वभावाचा परिचय नसलेला एकादा गृहस्थ नाक मुरडील! आजूबाजूला जुने कागदपत्र पडलेले आहेत, कित्येक कसरीने खाल्लेले व कित्येकास उबट वास येत असलेला! त्यांच्या आलमारींतील ग्रंथसंग्रहहि अशाच प्रकारचा. पण या उबट वासाखाली दडलेल्या ग्रंथांतील ज्ञान-सुगंध कुणाच्या लक्षांत आल्यास त्याची नाराजी कमी झाल्याशिवाय राहात नाही. शारदाश्रमांतील दप्तरांची कळकट फडकीं पाहून, प्रथम नाखूष झालेले भारतसरकारचे प्राचीन लेखनविशारद डॉ. छाबडा, त्या दप्तरांतील 'चिजा' पाहून जरासे खूष झालेले दिसले!

दांत पडून भोबडा झालेल्या माणसाप्रमाणे, ३०-४० वर्षें वयाचा आप्पासाहेबांचा टंकलेखक (Typewriter) अजून इमानें इतबारें त्यांची 'युगायुगाची सोबत' करीतच आहे! त्याचे खिळे ठिकठिकाणीं उडून गेल्यामुळे, त्याने त्यांच्या लेखनात अक्षम्य गोंधळ व प्रमाद करून ठेवले तरी, आप्पासाहेबांचें त्याच्यावरील प्रेम कमी झालेलें दिसत नाही! आपल्या अधु झालेल्या जिवलग मित्राला आमरण अंतर न देणाऱ्या आप्पासाहेबांची धन्य म्हणावी, की इतकी 'अंगं गलितं पलितं मुंडम्' स्थिति होऊन सुद्धा,

कार्याचा नूतन उत्साह दाखविणाऱ्या टंकलेखकाचा धन्य म्हणावा हें कळणें कठीण होतें.

या त्यांच्या पुराणप्रियतेबद्दल कधी एखादे वेळीं चेष्टाहि होते; पण त्यांत त्यांच्याबद्दलच्या गुप्त आदराची सरस्वतीच वास करीत असलेली दिसून येते. 'बाररूम' मधील कुणी वकील गमतीने म्हणायचा: "यवतमाळचे सध्याचे डी. सी. कोण आहे, याची माहिती आप्पासाहेबांना नसेल, पण अमक्या मोगल राजाच्या वेळच्या तमक्या परगण्याचा सुभेदार कोण होता, त्याची त्यांना खडान् खडा माहिती असलीच पाहिजे!" वर्तमानकाळावर त्यांचें एवढें दुर्लक्ष म्हणून तर ते भूतकाळांत इतके गढून जातात! प्राचीन वस्तू पाहिल्या की त्यांचें प्रेमसर्वस्व उचंबळून येतें. नवीन कोरी करकरीत वस्तू व प्राचीन जीर्ण वस्तू या दोहोंतून एक निवडण्यास सांगितलें तर, मला वाटते ते जुनीच वस्तू नक्की निवडतील! त्यांना एखादें जुनाट चिटोरेंहि गमावलेलें खपत नाही. डॉ. पटवर्धनाच्या मृत्यूच्या दुखवट्याबद्दल पाठविलेल्या ठरावाची पोच, एका गृहस्थाने खिडकींतून बाहेर टाकून दिली होती, ती सुद्धा त्यांनी लगेच उचलून आणली!

आप्पासाहेबांना औपचारिकपणाचा कंटाळा आहे! वास्तविक पाहता यूरोपांतून जाऊन आलेला, व डी. लिट्. सारखी उपाधी धारण करणारा गृहस्थ ऐटबाज राहावयाचा! त्याच्या भेटण्या वगैरेच्या वेळा ठरलेल्या असावयाच्या व वागणुकींत एक विशिष्ट अद्यावत पद्धत असावयाची; पण आप्पासाहेबांचें सरस्वती मंदिर कोणासहि सर्वकाळ सताड उघडें असतें! याबद्दलची श्री. गु. ह. देशपांडे यांची आणखी एक चांगल्यापैकी आठवण आहे!

"श्री. आप्पासाहेब व मी हैद्राबाद येथील साहित्य संमेलनाकरता यवतमाळवरून वणी, वरोडा या मार्गाने मोटारने निघालों. मोटारींत आमच्या सोबत दोन तरुण वकील, साहित्य-संमेलनाची मौज व हैद्राबाद शहर पाहण्याचे निमित्ताने आले होते. आम्ही वरोड्याला ग्रँडट्रंक पकडली. या गाडींत नेहमीच अतीशय गर्दी असते. या गर्दींत आम्ही कसेबसे डब्यांत सामान ठेऊन उभे राहूं शकलों. दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळे व डब्यांतील

चिकार गर्दीमुळे उकाडा कमालीचा होत होता! घामाने आमचे कपडे ओले चिंब झाले होते. गाडी एकदोन स्टेशनें पुढे गेल्यानंतर आम्हाला थोडीशी बसावयास जागा मिळाली! खाली बसल्याबरोबर आप्पासाहेबांनी कोट व सद्रा वगैरे काढून व थोडेसे खिडकीकडे सरकून उकाड्याचा त्रास किंचित् कमी करण्याचा प्रयत्न केला. परंतु आधुनिक शिष्टाचाराला वावडें वाटणारे हें कृत्य पाहून, आमच्या तरुण वकीलद्वयांना, आप्पासाहेब हे मानवी समाजाच्या प्राथमिक अवस्थेंतील एक मानव प्राणी आहेत की काय, असें वाटून हंसू आलें. परंतु कांही स्टेशनें आणखी पुढे जातां जातां उकाडा इतका असह्य वाटूं लागला की, सदर वकीलद्वयानी आप्पासाहेबांचेंच अनुकरण करून, आपणहि त्याच मानवसमाजाचे वंशज आहोंत, अशी सप्रमाण कबुली दिली! रात्र बरीच झाल्यामुळे सर्वांनाच झोप येत होती. पण त्या गर्दीत धड बसायला जागा नव्हती तर झोपायला जागा कोठून मिळणार? परंतु अनुकूल परिस्थिती येईपर्यंत वाट पाहाण्याचा आप्पासाहेबांचा शिरस्ता नसल्यामुळे, त्यांनी दोन बाकांच्यामधील रस्त्यांत, आपली पथारी पसरून, व जमतील तितके हात पाय लांब करून, झोप घ्यावयास सुरवात केली. थोड्याच वेळाने त्यांना गाढ झोप लागून, ते घोरावयास देखील लागले!! स्वतःच्या आवडीच्या व्यासंगांत एकतान होणारी, व स्वतःच्या विचारतंद्रींत बाह्य परिस्थितीला पूर्णपणे विसरणारी आप्पासाहेबांची वृत्ति, भयंकर चिकार गर्दी व उकाडा असतांहि डब्यांतील बाह्य परिस्थितीविषयी विन्मुख होऊन, निद्रेंत इतकी एकाग्र झालेली पाहून मला विशेष आश्चर्य वाटले नाही!"

त्यांच्या धार्मिक वृत्तिबद्दल मागे लिहलेंच आहे. ते सनातनी असले तरी कर्मठ नाहीत. व किंचित् धर्मभोळे असले तरी अंधश्रद्ध नाहीत! ऐहिक संपत्तीबद्दल त्यांची जशी उदासीनता दिसून येते, त्याचप्रमाणे दैवी संपत्तीबद्दलहि त्यागी वृत्ति दिसून येते. युरोपहून आल्यानंतर कोठेश्वर येथे जो रुद्रस्वाहाकार यज्ञ झाला होता, त्याच्या अवभृत स्नानाच्या वेळी संपादन केलेलें सर्व पुण्य त्यांनी जनतेला अर्पण केलें. हें सांगत असतां कित्येकांच्या चेहऱ्यावर मिष्किल हसूं खेळूं लागेल! पण पार्थिव संपत्तीपेक्षा दैवी संपत्तीला जे

श्रेष्ठ समजतात, त्याच्यासारख्याने ही गोष्ट करणें सोप नाही. जेथे स्वतःचें पाप देण्याची प्रवृत्ति नसते, तेथे पुण्यावर सुखासुखी उदक कोण सोडणार ?

आप्पासाहेबानी खूप प्रवास केला आहे. ध्येयार्थी आप्पासाहेब याच बरोबर त्यांना प्रवासी आप्पासाहेब म्हणून संबोधतां येईल ! आणि या अशाहि उतारवयांत त्यांच्या या वृत्तीला फार भर चढलेला आहे. प्रवासांत त्यांना 'होल्ड ऑल' 'वाटर बॅग' गाद्या रजया इत्यादि उपाधींची मुळीच जरूरी नसते ! त्यांची कोठेहि जावयाची तयारी पांच मिनिटांत होते ! एका नेसत्या धोतरानिशी ते घराबाहेर पडूं शकतात. ते वाहनामध्ये कोठेहि बसतात, व मध्ये वेळ असल्यास कोठेहि लवंडतात. एके वेळी त्यांची मोटार 'फेल' झाली. ती लवकर सुरू होईना. त्यांनी जवळच्या एका शेतांत जाऊन, एका उंचवट्यावर विश्रांतीकरता अंग टाकलें. थोड्या वेळाने तेथे एक मनुष्य आला व म्हणतो, "अहो ! ही तर मुसलमानांच्या थडग्याची जागा !!"

त्यांच्या वरवर दिसणाऱ्या भावनारहीत चेहऱ्यावरून, त्यांच्या अंतःकरणांत विनोद बुद्धीला कांही स्थान असेल असें वाटत नाही. पण प्रसंगी ते विनोद करूं शकतात ! एकदा, त्यांच्या घरावर 'शारदाश्रम' ही पाटी लागलेली पाहून, एक श्रीमंत गृहस्थ टांग्यांतून उतरला, व त्यांच्या पडवींत सामान टाकीत म्हणाला, "येथे जेवणाची चांगली सोय आहेना ?" आप्पासाहेबांनी स्मित करीत म्हटलें "हो, आहे !"......पण थोड्या वेळाने ते म्हणाले, "फक्त घरच्या माणसाकरता !!" हीच विनोदी वृत्ति प्रा. पां. कृ. सावळापूरकर यांनी दिलेल्या (ग्रंथाच्या शेवटीं) एका आठवणींत दिसून येईल.

आप्पासाहेबांनी शिलालेख, ताम्रपट इत्यादिकांचें वाचन करून विपुल माहिती उजेडांत आणली; व सुगम लेखांतून ती लोकांसमोर मांडली. महाराष्ट्र-संशोधकांच्या श्रेणींत त्यांचें विशिष्ठ स्थान आहे. त्यांच्या लेखांतील कांही उत्कृष्ट भागाचा त्रोटक उल्लेख पुढे करतां येईल.

त्यांच्या जीवनांत जसे काही दोष आहेत, तसेच त्यांच्या संशोधनांतहि आहेत. त्यांचें संशोधन कित्येक वेळीं ढोबळ मानाचें असतें. अमक्या शिलालेखाने वा ताम्रपटाने अमुक कालखंडावर बराच प्रकाश पडला असें

ते लिहितील; पण कोणता प्रकाश पडला हे मुद्दे लिहिणार नाहीत. मला बरेच विद्वान लोक भेटले व त्यांच्याशीं बरीच चर्चा झाली असे सांगतील; पण चर्चेचे मुद्दे तेवढे नेमके वगळतील. जशी माहिती मिळाली तशी ते उधृत करीत जातात, पण साधक बाधक कारणें देऊन ते एकादा सिद्धांत मांडण्याच्या फारसे भानगडींत पडत नाहीत.

संशोधनाचे स्थूलतः तीन भाग पाडतां येतील. (१) प्राथमिक, (२) माध्यमिक, (३) अंतीम. प्राथमिक संशोधनांत साधनसामग्री गोळा करणें, माध्यमिक संशोधनांत, त्या माहितीचें वर्गीकरण करून, सिद्धांताची पूर्व तयारी करून ठेवणें, व अंतीम संशोधनांत पंचीकरण बुद्धीने * कांही मौलिक सिद्धांत मांडणें हें येतें. पहिल्या प्रकारचें संशोधन मंदिराच्या पायासारखें, दुसऱ्या प्रकारचें मध्यभागासारखें तर तिसऱ्या प्रकारचें कळसासारखें आहे. पाया श्रेष्ठ की कळस श्रेष्ठ ? उत्तर देणें कठीण आहे. कळसाशिवाय पायाला शोभा नाही व पायाशिवाय कळसाला स्थैर्य नाही. आप्पासाहेबांचें बरेचसें संशोधन पहिल्या दोन प्रकारचें आहे. त्यांनी जन्मभर कष्टाळू वृत्तीने खपून, संशोधन कार्याकरता अमूप 'कच्चा माल' संकलित करून ठेवलेला आहे. राजवाडे, केतकर, दप्तरी, सरदेसाई व मिराशी यांच्या संशोधनाइतकें आप्पासाहेबांचें संशोधन, अचुंबित प्रतिभेने नटलेलें नसतें, असें म्हटल्यास आप्पासाहेबांना, त्यांत कमीपणा येण्यासारखें काहीच नाही. गौरीशंकर, कांचनगंगा, धवलागिरी, नंदादेवी इत्यादि हिमालयाच्या शिखरांची उंची त्याच्या इतर शिखरांना नाही असें म्हटलें तर, त्यांत त्या शिखरांचा अधिक्षेप होऊं शकत नाही कारण इतरांचेंहि कांही एक महत्व आहेच ! जें अद्वितीय नसेल तें सर्वच अधम, असें मानण्याची पध्दत चुकीची आहे.

आप्पासाहेबांच्या लिखाणांत, लेखनपद्धति ( Style ) चें तितकेसें आकर्षकत्व नाही. सर्व कलाप्रमाणे साहित्यांतहि Style चें महत्व आहे.

* पंचमहाभूतांतून, प्रत्येकाचा कमीजास्त भाग घेतला जाऊन, त्या सर्वांच्या मिश्रणाने नवीन पदार्थ तयार होतो, त्याप्रमाणे.

म्हणूनच 'Style is the man' असें म्हटलें आहे. गायनकलेंत मास्टर कृष्णराव, भीमसेन जोशी यांच्या फिरती, मिंड, खटक्याच्या ताना जशा वैशिष्टययुक्त असतात, त्याचप्रमाणे नाणावलेल्या चित्रकारांच्या व साहित्यिकांच्या विशिष्ट लकवी, त्या त्या साहित्यिकांच्या लेखनांत पाहावयास मिळतात. मनुष्य हा सौंदर्यप्रिय व कलाप्रिय प्राणी असल्यामुळे, साधा मातीचा गोळा असला तरी त्यावर राजहंसपक्षी, फुले वगैरेच्या आकृत्या देऊन तो आपली सौंदर्या विषयींची आवड भागवून घेतो. संशोधनासारख्या शास्त्रीय विषयांत लेखन पद्धतीचें तितकेसें सौंदर्य आणणें कठीण असलें, व तें दुय्यम दर्जाचें असलें तरी, निदान त्यांतील आकर्षक पद्धतीचें महत्व कमी मानतां येत नाही. या दृष्टीने प्रा. म. म. मिराशी व डॉ. दप्तरी इत्यादिकांचे लेख पाहण्यासारखे आहेत.

"गुणांचा अत्युत्कट उत्कर्ष व तज्जन्य स्खलन मिळून अद्भुतरम्य मनुजता उत्पन्न झालेली आहे. व त्याचें प्रतिक मृगलाच्छन चंद्र, परमेश आपल्या मस्तकावर मिरवीत असतो" असें बी कवींनी म्हटलें आहे. दोष नसले तर मानवाचें मानवत्वच नष्ट होऊन, तो अतिमानव म्हणजे कांही तरी निराळा प्राणी होईल. प्रकाशरूपी गुणांचा प्रकर्ष दाखविणारी दोष ही छाया आहे; त्याशिवाय गुणांना उठाव नाही. आप्पासाहेबांच्या लहान सहान दोषांचा मी जो उल्लेख केला—व तो जाणून बुजून, 'Paint me as I am' या तत्वांचें परिपालन करण्याकरता—त्यामुळे, त्यांनी जें मोलाचें कार्य केलें आहे त्याला मुळीच बाध येत नाही!

आप्पासाहेबांचें सर्व जीवन, स्वतःच्या पर्णकुटींत तपश्चर्येमध्ये काळ कंठणाऱ्या प्राचीन मुनीसारखे आदरास्पद झालेलें आहे. यवतमाळसारख्या आडगावी त्यांनी संशोधनाचें वेगळें क्षेत्र निर्माण करून, प्रतिकूल परिस्थितीच्या खडकावर, संशोधनाचीं फुलें उमलविलीं आहेत. या त्यांच्या कार्याबद्दल त्यांना 'संशोधन-तपस्वि' या नामाभिधानानेच गौरविणें उचीत ठरेल!

—०—

# संशोधनाचें समर्थन ६

*Mazada at moi vahista
Sravas--ca syaodana--ca vacod
Ta tu vohu mananha
Asa ca isudem stuto
Xsmaka xsaera A hura
Fdrasem vasana haieyem da ahum

—Ahunavaiti 7-15.-yas 34-15

संजीवनी अस्त्र

मानवाचा काल व निसर्ग यांच्याशीं पूर्वापार झगडा चालत आलेला आहे; आणि तो आचंद्रार्क तसाच चालूं राहणार ! कज्जलगिरीचा पाठ, व रक्त-नदाचें उदर असलेल्या भयानक रुद्राप्रमाणे भासणाऱ्या कालपुरुषानें, मानवा बरोबरच त्याच्या कलाकृतींचें कायमचें संहारसत्र मांडलेलें असलें, तरी मानवहि आपल्या सर्वश्रेष्ठ संशोधन-संजीवनी अस्त्रानें नवीन कलाकृती निर्माण करण्याबरोबरच, जुन्या नामशेष झालेल्या कलाकृतींचें पुनरुज्जीवन करीत आहे !

मानवाचें जीवित क्षणभंगुर असलें तरी त्यानें कमावलेली कीर्ति शाश्वत आहे. अडीच हजार वर्षांपूर्वींच्या कधी कोणाच्या स्वप्नीहि नसतील अशा उत्खनन केल्या गेलेल्या स्मारकांनी, रम्योद्भुत असीरीयन संस्कृतीबरोबरच

*Teach me Mazada...make my life express ...through search for truth the yarning...of my heart...make my life as thou wishest true.

शाल्मानेर किंवा अशुराबिनिपॉल या राजांचीं व त्यांच्या वंशांचीं नांवें इतिहासांत अजरामर करून ठेवलेलीं आहेत. व अशाच प्रकारें शेकडो इतर राजांचीं व त्यांच्या राजघराण्यांचींहि ! कागदावर लिहिलेला इतिहास कदाचित् पुसटला जाईल; पण मेकॉलेने म्हटल्याप्रमाणे "या उपलब्ध झालेल्या विटांवर लिहिल्या गेलेली इतिहासाची साधनसामुग्री असिरियन संस्कृतीची भव्य स्मृति उजळीत अनंत वर्षे काळाशीं मुकाबला करत असलेली दिसेल." मानव जातीचे घटक, जगाच्या बुद्धिबळांत, काळरूपी मोहऱ्याने रोखलेलीं क्षुद्र पगें भासत असलीं, तरी तीं आपल्या असामान्य प्रज्ञेने कालावरहि कशी मात करीत असतात हेंच याने सिद्ध होतें !

शोधिकेची उल्का

पण संशोधन म्हणजे इतिहास नव्हे ! संशोधन अस्त्रास प्रखर धार चढविण्याकरता त्याचें इतिहासाच्या सिद्धांतांत रूपांतर करणें जरूर असतें. नुसती साखर हें पक्वान्न होऊं शकत नाही,—पक्वान्नांत तिचें रूपांतर करण्यापूर्वी तीवर अनेक संस्कार व्हावे लागतात, त्याचप्रमाणे संशोधनाचें इतिहासांत रूपांतर करण्याकरता त्यावर अनेक संस्कार करावे लागतात. नदीच्या गाळांतून किंवा खाणींतून रत्नें तयार करण्याला लागत असलेलें द्रव्य काढून, त्याला शुद्ध स्वरूप देऊन, पैलू पाडल्यानंतरच तें रत्नाच्या मालिकेंत बसावयाच्या योग्यतेचें होतें. इतिहासाच्या शोधिकेची उल्का, वाङ्मयाच्या पृथ्वीवर येऊन पोहोचण्यापूर्वीच, ती पासून असंख्य निघालेले अस्पष्ट संशोधनाचे धूलीकणच पदरांत पडत असतात !

आता, झालेलें सर्वच संशोधन इतिहास-रचनेच्या उपयोगी पडेल असें नाही. समुद्रांत उडी घेतली असता 'बसराई' मोत्याबरोबरच हजारो शंख शिंपलेंच हातीं येतात. किंवा अस्सल हिऱ्याच्या पाठिमागे लागून एखादा भिकार 'राजावर्त'च पदरांत पडण्याचा संभव असतो. म्हणून झालेलें संशोधन वाया जात नाही. भावी काळांत होणाऱ्या संशोधनाचे, त्याच्याशीं धागेदोरे विणले जाऊन, त्यांतून इतिहासाचे मोलाचे सणंग केव्हाना केव्हा तरी लाभण्याची शक्यता असतेच असते.

उत्कृष्ट इमारती तयार करण्यास ज्याप्रमाणे माती, विटा इत्यादि साहित्य अवश्य असतें, त्याचप्रमाणे इतिहासाचें शिल्प बनविण्याकरता निरनिराळ्या प्रकारच्या संशोधनांचा फार मोठा साठा आगोदरच तयार झालेला असला पाहिजे, हें उघड आहे. कोणी कारागीर चिरेबंदी दगड तयार करतील, कोणी खांब तासून-कातून ठेवतील, कोणी नक्षी काढतील, तर कोणी उन्मेश-शाली कलावंत, त्या सर्वांचा उपयोग करून त्याचें ताजमहालांत रूपांतर करील.

संशोधनामध्ये अनेक ऐतिहासिक घटना विस्कळीत असलेल्या दिसून येतात. त्याचे पूर्वापार संबंध व कार्यकारणभाव दाखवून इतिहासकारास एक सुसंबद्ध साकळी बनवावी लागते. ही साकळी संपूर्ण बनल्याखेरीज एकाद्या कालखंडाचा इतिहास पूर्ण झाला असें म्हणता येत नाही. या साकळींतील एखादे कित्येक दुवे सापडतां सापडत नाहीत. एकाद्या दुव्याकरता संशोध-काला वेळेला वर्षानुवर्ष अडखळून बसावे लागतें व या अवधींत कांही जुळलेले दुवेहि निखळून जाण्याचा संभव असतो !

प्रखर प्रतिभेचा दधिक्रा *

वाङ्मयांत आपल्याला तत्कालीन परिस्थितीचा इतिहास सापडतोच, परंतु प्राचीन संस्कृतीचे अवशेष असलेल्या उध्वस्त शहरांचें उत्खनन, नाणीं, ताम्रपट, पुतळे, इमारती, सनदा, शिलालेख हीहि सर्व अवलोकावी लागतात. आर्यांच्या मठ-मंदिरापासून तो इस्लामियांच्या मशिदी दर्ग्या-पर्यंत फेरफटका करावा लागतो. स्तंभलेख, स्तूप, लोणी, प्राचीन काळीं पृथ्वीवर वावरत असलेल्या प्राण्याच्या व वनस्पतींच्या अवशेषांचें आस्थेने जतन करून ठेवणारे निखात (Fossils) हीहि डोळ्यांखाली घालावीं लागतात. राजविलासी महालापासून, तो तहत भुयाराच्या धनांधकारांतील काव्याकुव्यांत प्रवेश करण्याची तयारी ठेवावी लागते. इतकेच काय पण राजकारण, धर्म, समाज, भाषा, ज्योतिष, वैद्य इत्यादि शास्त्रांच्या अनंत अवकाशांत संशोधक-इतिहासकारांना आपल्या प्रखर प्रतिभेचा दधिक्रा मुक्त सोडावा लागतो !

* ऋग्वेदांत उल्लेखिलेला अश्व. याचा वेग मनाप्रमाणे आहे.

## फाटक्या चिंध्याचें गाठोडें !

स्वतःच्याच देशांतील नव्हे तर परकीयांच्या देशांतीलहि, असंख्य अशा प्राचीन प्रस्तर–ताम्र मूर्ति, संगमरवरी दगडांपासून तों वाळूपर्यंतचे बनविलेले पुतळे, दगडमण्यांपासून तो रत्नमण्यांपर्यंत कलाकुसरीचे नमुने इतकेच काय, पण जगांतील यच्चयावत् प्राचीन कागदपत्रांचें व वस्तूंचें संकलन ज्यांत झालेलें आहे, अशीं शेकड्यांनी मोजतां येणारीं पुराणवस्तु संग्रहालयें, सुधारणेच्या शिखरावर आरूढ झालेल्या, इंग्लंड वगैरे सारख्या पाश्चात्य देशांत दृष्टोपत्तीस येऊन, त्या लोकांना संशोधनाचें किती महत्व पटलेलें आहे हें दर्शवितात.

नेबूर याने रोमन इतिहासाचें व मॅक्समुल्लर याने वैदिक संस्कृतीचें आमूलाग्र संशोधन केलेलें पाहून, यूरोपीय महापंडित फक्त स्वदेशाच्याच संशोधनांत समाधान मानून स्वस्थ बसले नाहीत, हें स्पष्ट होतें! आचार्य विनोबा भावे यांच्यासारख्या श्रेष्ठांनाहि वेदांचा अभ्यास मॅक्समुल्लर या पाश्चात्य पंडिताच्या ग्रंथावरून करावा लागला हें केवढें नवल ? वेदाच्या अनेक महान पाश्चात्य पंडितांपैकी ब्लूमफील्ड हा एक होय. भारतीय मूर्तिशास्त्राचा अभ्यास सर्वप्रथम यूरोपीयन 'स्कालर्स'नी सुरू केला! जॉर्ज फॉस्टर, मूर, रे. डब्ल्यू. ओ. सिम्सन, जॉन डावसन्, डब्ल्यू. जे. विलकिन्स या पाश्चात्य संशोधकांनी भारतीय मूर्तिशास्त्रावर मौलिक व विस्तृत प्रबंध लिहिलेले आहेत. डॅनिश मिशनरी झिगेरबाली (Ziegerbaly) याने सव्वादोनशे वर्षांपूर्वी "The Geneology of the South Indian Gonds" हें पुस्तक लिहिलें. त्याचप्रमाणे मराठी भाषेचा पहिला इतिहास फ्रान्समधील पंडित जुले ब्लॉक याने लिहिला, हा उल्लेख मागे आलाच आहे. व्हेरिअर एलविन् (Verrier Elwin) या सुप्रसिद्ध मानवजाति संशोधक (Ethnologist) उत्कृष्ट कवि व भाषांतरकार, यांनी 'Tribal art of middle India', 'Tribal life of Orrisa', 'The Maria Gonds of Bastar, Chanda and Drug' इत्यादिवर विस्तृत व नावीन्यपूर्ण ग्रंथ लिहिलेले आहेत. त्याचप्रमाणे त्यांचा जवळ जवळ साडे पांचशे पानांचा "The myths of middle India" हा ग्रंथ त्यांच्या अदम्य संशोधकी जिज्ञासेचा परिपाक

आहे! या ग्रंथांत सूर्य, चंद्र, वायू, पाऊस, खडक, वृक्ष, फुलें इत्यादि संबंधीच्या myths (प्राचीन नवलिका) अत्यंत विलोभनीय आहेत.

" This is one of the most exciting pieces of the work in the field of folklore ( American Anthropologist ) " This book will remain of constant value as a revelation of the tribal mind, in all its fertile fancy. ( The Listener ) अशा तऱ्हेचे प्रशंसापर उद्गार अनेक वृत्तपत्रांनी त्याबद्दल काढलेले आहेत. या ग्रंथांकरता त्यांना आपलें बरेंच आयुष्य या जमातींत घालावें लागलें. संशोधनाचें क्षेत्र हें जातीयता, देश, धर्मातीत आहे हेंच या उदाहरणावरून दिसून येण्यासारखें आहे!

पाश्चात्य धनिक, संशोधनसंस्थांस लाखो पौंडाच्या देणग्या स्वयंप्रेरणेने देतात व नव्या उमेदीचे संशोधक एकादी पुराणवस्तु हस्तगत करण्याकरता आपलें जीवितहि धोक्यांत घालावयास कचरत नाहीत. सर हेन्रि रॉलिन्सनसारख्या संशोधनप्रेमी गृहस्थाने, इराणच्या पश्चिम भागीं असलेल्या, बेहस्तून नामक ठिकाणानजीकच्या, तुटलेल्या कड्याच्या गगनचुंबित सुळक्यावरील 'रोझेटास्टोन' शिलालेख प्राण पणास लावून हस्तगत केला व जगांतील साहसी लोकांना 'आश्चर्यवत् पश्यति' करावयास लावून, संशोधकांना आनंदसागरांत पोहावयास लावले!

आणि आमच्या देशाकडे पाहावे तों--

'मेलेले मुडदे पुन्हा उकरण्या पेक्षा हयाताकडे
देणें लक्ष बरेंऽऽऽ...!'

असे कांही वर्षापूर्वी उद्गार काढणारे, व अजूनहि 'हे तथाकथित संशोधक, संशोधनाच्या फाटक्या चिंध्यांचें गाठोडें उराशीं बाळगण्यांत एवढी कसली धन्यता मानतात,' म्हणून त्यांच्याकडे तिरस्कारमिश्रित दृष्टिक्षेप करणारे लोक आढळतात. राजवाडे इत्यादि संशोधकांनी संशोधनमंदिराचा शिलान्यास करून, त्याविषयी लोकांच्या मनांत भक्ति निर्माण करण्याचे भगिरथ प्रयत्न केले, व पुढील संशोधकांनीहि ती वाढविण्याचें कार्य केलें तरी, संशोधक व संशोधन हें अजूनहि कांही ठिकाणीं

चेष्टेचा विषय होऊन बसलें आहे ! याचें कारण प्राचीन नामशेष झालेल्या, किंवा होऊं पाहणाऱ्या अवशेषांकरता एवढा अट्टाहास करण्यासारखे खरोखरीच काय आहे, असाच प्रांजल प्रश्न बहुतेक लोकांना पडलेला असतो. या फाटक्या चिंध्या घेऊन बसण्यापेक्षा हे पढतमूर्ख, बंगले, मोटारगाड्या, अधिकारपदें स्वीकारून, अमुक अधिकारी आज गावांत आला आहे, अमक्या अधिकाऱ्याची बदली झाली, अमुक अधिकारी रजेवर गेला, अमका म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष झाला, अमक्याला ऑफिसांत साहेबाने दरडावले याबद्दलची विद्वत्तापूर्ण चर्चा करण्याचें सुखासुखीचें जीवन व्यतीत करून, आपलें आयुष्य सार्थकी कां लावीत नाहीत, याचाच त्यांना विस्मय वाटतो व संशोधन इतिहासापासून तादृश कांहीच फायदा नाही असे ते आपल्या वर्तनाने सुचवीत असतात !

### इतिहासाचा आदर्श

संशोधनाचें समर्थन तें काय करायचें ? संशोधनशास्त्राचें महत्व स्वयं-भूच आहे ! पण वरील व इतर दुसरे प्रकार पाहून मात्र त्याच्या समर्थनाची जरूरी उद्भवत आहे.

संशोधनापासून इतिहास निर्माण होतो. इतिहासाचा पहिला उद्देश म्हणजे हा की आपणास सत्य काय तें समजावें. आपण कोठे होतों व सध्या कोठे आहोंत, याचें ज्ञान आपल्या पुढील प्रगतीकरता अत्यावश्यक आहे. आपली अधोगति झाली असल्यास तिची लाज वाटून, आपली प्रगति करण्याची प्रेरणा आपल्याला इतिहासांतून घ्यावयाची आहे ! इतिहास हा एक आदर्श आहे. इसापनीतींतील सिंहाच्या छाव्याला आपलें पूर्ववृत्त माहीत नसल्यामुळे, तो आपलें जीवित अजागळासारखे मेंढ्याच्या कळपांत घालीत होता. पूर्व इतिहासाची त्याला जाणीव दिल्या गेल्याबरोबर तो आपल्या वंशास साजेल अशा पराक्रमाच्या मार्गास लागला. 'पूर्व दिव्य ज्याचें त्याला भावि रम्य काल' हे विनायकाचे सर्वपरिचित आशादायक बोल इतिहासाचें महत्व केवढें आहे, हें दाखवितात. 'पुराणमित्येव न साधु सर्वम्' या न्यायाने पूर्वीच्या काळीं सर्वच चांगलें होतें नव्हे. इतिहासांत उज्वल कोहीनूरांबरोबरच कितीहि उगाळलें तरी काळेच, असे कोळसेहि दिसून येतात.

आपल्या झुंजारवृत्तीने शत्रूस चळचळा कापावयास लावून, जगांतील अलौकिक सेनापतींना ललामभूत झालेल्या पहिल्या बाजीरावासारख्या महान राष्ट्रपुरुषांबरोबरच, रुप्याच्या चौकीवर प्रशस्त सोन्याचें ताट, सोन्याच्या अठ्ठावीस वाट्या, अठ्ठावीस चमचे, दहा भाज्या, दहा चटण्या, वाजंत्री, शेरभर केशर इत्यादि सरंजामासह भोजन करून, रामटेकच्या कळीदार पानांचा विडा खाऊन ढेकर देणाऱ्या, यवल्याच्या रेशमाचा भरजरी धोतरजोडा वापरून 'आपण गोकुळांतील भगवान कृष्ण' इत्यादि सर्वांत जास्त स्तुति करणाऱ्याला सर्वांत जास्त बक्षीस देणाऱ्या दुसऱ्या बाजीरावाचें चित्रहि इतिहास आपल्या पुढे धरून 'येनेष्टं तेन गतव्यम्' हा इषाराच देत नाही काय ?

इतिहासांत अशा प्रकारच्या शेकडो बऱ्याबरोबर वाईट गोष्टीहि आपल्याला कळून येतात. बऱ्याच्या जाणीवेने प्रगति करता येऊन, वाईटाच्या जाणिवेने धोके टाळतां येतात. ग्रीक, रोमन साम्राज्यासारखीं साम्राज्यें का नष्ट झालीं, भारताला पारतंत्र्यांत पडण्यास खरी खुरी कोणतीं कारणें झालीं, भारत आजपर्यंत आपली पूर्ण उन्नति करून कां घेऊ शकला नाही याबद्दलच्या सर्व ऐतिहासिक घटनांचें, सम्यग्ज्ञान व मार्गदर्शन भारताच्या भावी भाग्योदयाकरता अपरिहार्य आहे! इतिहासाने नीतिशिक्षण मिळतें. 'History is philosophy taught by examples' अशी एक म्हण आहे. नेपोलीयन बोनापार्ट, गॅरिबाल्डी या व्यक्तींचीं जीवनचरित्रें केवळ इतिहासाच्या ज्ञानाने प्रभावित झालेलीं आहेत. महात्मा गांधींसारख्या महान् युगपुरुषालाहि, दलित वर्गाकरता तळमळणाऱ्या टॉलस्टॉयसारख्या श्रेष्ठ विभूतीच्या जीवनेतिहासानेच स्फूर्ति मिळालेली आहे. जगांतील कोणतीहि थोर व्यक्ति मागील थोर विभूतींचाच संदेश घेऊन, आपलें पुढील स्वतंत्र अवतारकार्य करीत आलेली आहे. 'आधुनिक भारताला जर आपली नवीन कला (प्रगति) निर्माण करावयाची असेल, तर त्या कलेने (प्रगतीने) आपली मुळें गतकालीन वैभवांत रुजविलीं पाहिजेत' असें व्हिन्सेंट स्मिथ याने म्हटलेलें आहे.

वाकम–दिगम !!

**प्रकाश, हवा, पाणी इत्यादि गोष्टी मानवाच्या जीवनास अत्यंत आवश्यक असूनहि त्यांच्या महत्वाची त्याला सहसा जाणीव होत नाही. आपण दर**

सेकंदाला श्वास घेतों, दिवसांतून अनेक वेळ पाणी पितों व अखंड प्रकाशांत वावरतो, त्याबद्दल विचार दिवसातूनच काय पण महिनोगणतीहि कोणाच्या मनांत येत असेल का? संशोधन, भाषा, साहित्य, संस्कृति याहि अशाच प्रकारच्या गोष्टी आहेत की, ज्यांविषयी विचार फार करून बहुजनसमाजाच्या मनात येत नाहीत! शोभेच्या दारूच्या गुलमोहोराच्या फुलझाडास नुसत्या लोखंडी तारा व त्यावर कांही पांढुरका पदार्थ चिटकाविलेला एवढेंच पाहून, त्याच्यांतील सुप्त तेजाविषयी कोणाला सहसा कल्पना येत नाही. त्याला एकच अग्निकण लागूं द्या म्हणजे काय प्रकाशकल्लोळ उडतो तें पाहा! संस्कृती, साहित्य भाषा व त्यांना जिवंत ठेवणारें संशोधन याच्याहि सुप्त शक्तीबद्दल वरीलप्रमाणेच सर्वसाधारण लोकांना मुळींच कल्पना नसते! आजकाल जगांत ज्ञानाचा जो एवढा लोट उसळलेला आहे, त्याच्या मुळाशीं संशोधनाशिवाय दुसरें काय आहे?

एक क्षण अशी कल्पना करा की, संशोधन बंद पडलें, भाषा व संस्कृति नाहीशी झाली तर मानवांची काय अवस्था होईल?

एका श्रीमंताच्या चाकरास आपल्या मालकाच्या नांवाला काय शब्द आहे, हें माहीत नव्हतें. त्यानें त्याचे घोडे दुसऱ्या ठिकाणीं नेण्याकरता चालविले होते. घोड्याला भाषेंत कोणता शब्द असतो हें त्याला माहिती नव्हते. समोरून उंट आल्यामुळे घोडे बुजाडलें आणि त्या नोकराच्या हातास झटका देऊन पसार झालें. उंटाला शब्द काय तोहि त्याला माहीत नव्हता. झाले! आता ही गोष्ट मालकाला कळवावयाची कशी? समोरून एक माणूस आला. त्याला त्यानें "ऐला सांग पैला वाकम आलें; दिगम गेलें आणि ठीकटवळें हातीं आलें" या त्यालाच अर्थज्ञान नसलेल्या शब्दांत, अडखळत अडखळत आपल्या धन्याला निरोप कळविण्याकरता विनंति केली. अर्थात त्याचा धनी आपलें घोडें गमावून बसला हें सांगणें नकोच. 'वाकम–दिगम'च्या सुप्रसिद्ध कथेने भाषाज्ञान नसलें म्हणजे काय अडचण उपस्थित होते, हें सूचित केलें आहे.

मानवाला भाषेची नैसर्गिक देणगी मिळाल्यामुळेच त्याच्या मनांत आलेल्या कल्पना व अंतरंगांत उचंबळलेल्या भावना एकमेकांना कळवून, त्याने आपली एवढी प्रगति करून घेतली आहे. नाहीं तर डोक्यांत उत्तमोत्तम

कल्पना येऊनहि त्याची स्थिती पशूपेक्षा बरी झाली असती काय? जवळ जवळ मानवी जीवनाच्या सुरवातीपासून, विशेषतः भाषा उत्पन्न झाली तेव्हा-पासून मनांत उत्पन्न झालेला प्रत्येक महत्वाचा विचार बोलण्यांत अगर लेखन वाङ्मयांत, केवळ भाषेच्या द्वारेंच चिरंतन होऊन राहिलेला असून, संस्कृतीला प्रगत करीत आहे· छायाचित्र लेखकाप्रमाणे भाषाहि सद्विचाराला अभंग करून ठेवीत आहे.

## वायुभारमापक यंत्रें

भाषा व संस्कृति हीं प्रगतीचीं वायुभारमापक यंत्रें आहेत. उदाहरणार्थ, ज्या ज्या वेळीं मराठी भाषेला गतिमानता (momentum) मिळाली त्या त्या वेळेला महाराष्ट्र देशाच्या प्रगतीचें पाऊलहि गतिमान् झालेलें दिसून येईल. व ज्या ज्या वेळेला भाषेची परागती झाली त्या त्या वेळीं त्या देशाच्या प्रगती· नेहि आपलें पाऊल मागें मुरडलें.

मराठी भाषासरितेचा उगम ९ व्या शतकांत श्रवण बेलगोळ येथील गोमतेश्वराच्या मूर्तीवरील एका वाक्याच्या कुंडांतून झालेला दृष्टीस पडतो. त्यानंतर बारा–तेराव्या शतकांतील मराठी भाषेचें स्वरूप यादवाच्या ऐश्वर्य-भूमींत कसें कमनीय झालें होतें, त्याचें चित्र आपण मागील प्रकरणांत पाहिलेंच. देवगिरीचें राज्य लयास गेल्यानंतर एक शतक, बहामनी राज्याच्या अमदानींत सर्वच बाजूने गळचेपीचे शेवाळ दाटल्यामुळे, मराठी भाषेचा प्रवाह कुंठित झाला. बहामनी राज्याचे पांच भाग झाल्यानंतर मात्र दासोपंत, मुक्तेश्वर, एकनाथ यांच्यासारख्या वागीशांनी तिचा मार्ग त्या शेवाळांतून मुक्त केला! औरंगजेबाची कारकिर्द सुरू झाल्यानंतर पुन्हा या सरितेचें पात्र क्षीण झालें. परंतु पुन्हाहि महाराष्ट्रांतील तुकारामासारख्या संतकवींनी व रामदासां-सारख्या राष्ट्रकवींनी तिला भक्तिमार्गाच्या रम्य राईतून व स्वातंत्र्यतेजाच्या आनंदभुवनामधून लीलाविलास करावयाला लागले! शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीत धार्मिकविषयांबरोबरच राजनीतीवरील ग्रंथ निर्माण झाले. गोंधळी व वाघें यांचें डफ झडूं लागले व सर्व प्रकारचा राज्यव्यवहार मराठींत होऊं लागल्यामुळे भाषासरिता समृद्ध बनली.

पेशव्यांच्या हातीं राज्याचीं सूत्रें गेल्यानंतर भीमथडीचे अश्व सिंधु नदीचें जलपान करावयास लागले. मराठी पराक्रमाबरोबरच मराठी भाषेचें क्षेत्र वाढलें. रणसंग्रामांतील शस्त्रांच्या खणखणाटाचे पडसाद भाषेंतील शाहीरी वाङमयांत निघूं लागले. लढाईवर गेलेल्या शिपाई-सैनिकांच्या नवपरिणित वधूंच्या विरहगीतांचे सूर तत्कालीन कवी टीपेंत खेचूं लागले. पुण्याहून मराठींत लिहिलेले हुकूम पंजाब, बंगाल, मद्रास, कर्नाटकांत अदबीने वाचल्या जाऊन अमलांत येऊं लागले.

१८८४ सालापासून इंग्रजी राजवटीखाली व्याकरणें, भाषांतरें, शास्त्र-विषयक ग्रंथ, वर्तमानपत्रें, कादंबरी, नाटकें, लघुकथा, लघुनिबंध व इतर कलात्मक वाङ्मयाच्या अनेक निर्झरनिर्झरिणी मराठीभाषासरितेला मिळून तिचा विस्तीर्ण जलौघ, 'सत्यं शिवं सुंदरम्'च्या ध्येयसागराभिमुख झालेला दिसत आहे. तिच्या प्रवाहावर सत्कल्पना-भावनांचे नेत्रोत्सव दीपदान तिचे भक्त पाईक करीत असलेले पाहून कोणाचें मन उचंबळून येणार नाही ?

सर्व जनतेस कार्यप्रवण करण्यास भाषा ही फार मोठी शक्ति आहे. भाषेच्या वृद्धीवर राष्ट्राचें महत्व अवलंबून असल्यामुळे प्रत्येक भाषाभिमान्याने भाषा-समृद्धि करावयास झटलें पाहिजें. समाज बाल्यावस्थेंत असता त्याचें कार्य नुसत्या पांच पंचेवीस शब्दांनीहि भागतें; पण समाज जसजसा पूर्णावस्थेकडे जातो, तसतशीं नवीन शास्त्रें व कला अस्तित्वांत येतात; नवीन घटना घडतात; व त्या व्यक्त करण्याकरता नवीन शब्दहि जन्मास येतात. विसाव्या शतकांतील वाढत्या विचार वैभवाच्या सूक्ष्म छटा व्यक्त करण्याकरता तितक्याच शद्बांनी व वाग्प्रचारांनी भाषा संपन्न झाल्याशिवाय गत्यंतर नाही. इंग्रजीसारख्या समृद्ध भाषांतून आपण अनेक वाग्प्रचार उचलले आहेत व यापुढेहि अशा अनेक भाषांतूनहि आपल्याला शद्बांचें व वाक्प्रचारांचें ॠण घेणें अयोग्य ठरणार नाही.

आजकाल लोकशाहीचा काळ असल्यामुळे वाङमय जास्तींत जास्त लोकाभिमुख व्हावयास पाहिजें व तें तसें होत आहे. भाषेचें लेण बहुजन समाजाच्या थरांत पोहोचविण्याच्या चक्रधराच्या महत्वाच्या कामगिरीचा उल्लेख मागे आला आहे. राजकारण, शहरवासीयांचे व्यापार, ग्रामवासीयांचे व्यवहार,

व कृषीवृक्षपाषाण, स्त्रीपुरुष संबंध इत्यादि विविध विषयावरील दृष्टांतांचा अंतर्भाव त्याच्या लेखनांत झालेला आहे. मासळी, कासव, सोमकांत, इंद्रवण, दूरस्थमाता, पोळलेली, सून विरहिणी, लेकुरवाळी इत्यादिकांचे रोजच्या व्यवहारांतील त्याने दिलेले दाखले लक्षांत घेण्यासारखे आहेत. सध्या लोककथा व लोकगीतें यांचा संग्रहहि मोठ्या प्रमाणावर होत आहे. भाषा, इतिहास व संस्कृति या दृष्टीने लोकवाङ्मयाचें फार मोठे महत्व आहे त्याचा विचार पुढे करतां येईल.

पण भाषा समृद्ध करणें, जास्तींत जास्ती सत्य इतिहास उजेडांत आणणें, किंवा संस्कृतीची वाढ करणें हें संशोधनाशिवाय मात्र केव्हाहि शक्य होणार नाही. भाषा, इतिहास, संस्कृति व संशोधन यांचा जिव्हाळयाचा संबंध आहे. तो खालीलप्रमाणे आकृतीने दाखवितां येईल.




"आपल्याला शास्त्रीयरीतीने संस्कृतीचा इतिहास लिहावयाचा असेल तर निदान इ. स. एक हजार वर्षांपूर्वी लिहिलेल्या, सांस्कृतिक महत्व असलेल्या ग्रंथांतील शब्दांच्या निरनिराळ्या विषयावर संपूर्ण निरपवाद सूची तयार होणें आवश्यक आहे" असें प्राध्यापक प. कृ. गोडे* यांनी सूचविलें तें चिंतनीय आहे.

भाषेच्या शब्दांशब्दांत इतिहास !

भाषेच्या शब्दांशब्दांत इतिहास दडलेला आपल्याला दिसून येतो. त्या त्या देशाच्या भाषेंत, त्या त्या लोकांच्या आशा आकांक्षा, अनुभव, समजूती, चालीरीती यांचें प्रतिबिंब आढळल्याशिवाय राहात नाही. आजकाल केवळ

* President " Technical science and fine arts section " Oriental Congress 14th session– Darbhanga.

संशोधनामुळे त्या त्या देशाचा इतिहास उपलब्ध होऊन, जगाच्या क्षेत्रांत त्यांना वैशिष्ट्याचें सन्मान्यस्थान मिळत आहे. उदाहरणार्थ, महानुभावी-यांच्या दिसणाऱ्या मलीन पंथाच्या ढगाखाली लुप्तप्राय झालेल्या सत्‌-त्वाच्या चंदेरी किनारीचें नूतन दर्शन केवळ त्यांच्या भाषेच्या संशोधनामुळेच शक्य झालेलें आहे. * त्याच्या भाषेंतून आलेला इतिहास पाहणें मनोरंजकच नव्हे तर उद्‌बोधकहि आहे.

यादवांचा न्यायीपणाचा कीर्तीसौरभ त्यावेळीं दशदिशांना इतका दरवळला होता की, यादवांनी आपल्या राज्यावर आक्रमण करूं नये म्हणून कांही राजांनी आपल्या राज्याचीं सूत्रें स्त्रियांच्या हातीं दिलेलीं होतीं. स्त्री व बालकांवर यादव राजे हत्यार उगारीत नसत याबद्दलची त्यांची पूर्ण खात्री यावरून दिसून येते. महानुभावीय मंडळींचा प्रवेश यादव घराण्यांत सहज सुलभ होऊन राहिलेला होता असे त्यांच्या ग्रंथावरून दिसतें. आनेराज व्यासांचे आजे अनंतभटकूचीं हे कन्हरदेवराय यादव यांचे कोषा-धिकारी होते. आनेराज व्यास हेहि नंतर वरखेड सोडून देवगिरीस जाऊन राहिले होते. तेथे असताना ते रामदेव यादवाची धाकटी राणी कामाइसा इचे खाजगी खजीनदार होते.

नगरामधील प्रमुख नगरवासी महाजनांना पंचांचे अधिकार असून, सर्व तऱ्हेच्या मुकद्दम्यांचे निकाल तेच देत असत. त्यांचा सार्वजनिक देवळांवर अधिकार चालत असे. आणि योग्य कारणाकरता ते त्यांची विक्रीहि करूं शकत. त्याचप्रमाणे त्याकाळीं खरेदीखतें हीं ताम्रपटावर लिहिल्या जात असत.

ऋद्धिपूरवर्णनामधील समाजस्थिति निदर्शक वचनांत त्याच शतकां-मधील इतर कांही ग्रंथांतील वचनें भरीस घातलीं असतांना, तेराव्या शतकांतील विदर्भाची बरीच स्पष्ट कल्पना येऊं शकते. नारायणव्यासांनी ऋद्धिपूरच्या

* 'मानभावाची उ' (मानभाव उ सापडली असतां तीस सोडीतहि नाहीत व मारीतहि नाहींत यास अनुलक्षून) केसाने गळा कापणारे, इत्यादि त्यांना अपमानकारक दूषणें देण्याची प्रवृत्ति नष्ट होऊन, त्यांना इतर समाजा-कडून मानाची वागणूक मिळत आहे, हें केवळ त्या वाङ्मयाच्या संशोधनाचें फळ आहे.

चक्षुर्वैसत्यं केलेल्या वर्णनावरून खालील समाजस्थिति दिग्दर्शित होते. त्यावेळीं महानुभाव पंथाचे अनुयायी कृष्णवस्त्र परिधान करीत नसून हुरमुजी रंगाचीं वस्त्रें वापरीत असत. (ओवी ११४–१५) नारायण व्यासांचे वेळीं नाटकें करण्याचा प्रघात असावा. (ओवी ४२९) याच शतकांत निर्माण झालेल्या ज्ञानेश्वरींत तर नटांचा (अध्याय १६, ३७४) व पडद्यांचा (५५१) स्पष्टच निर्देश आढळतो. ऋद्धिपूर वर्णनांत पेखणीचा म्हणजे नाचणारीचा उल्लेख आलेला आहे. (ओवी ४३०) त्यावेळीं दूध दुभतें तर गाईचें होतेंच, पण जेवतांना सुद्धा गाईचें तूप वापरीत. (५२१–२७) ज्ञानेश्वरींतहि गाईच्याच दूध दुभत्याचें वर्णन आलें असून म्हशीचा तर नाममात्रहि निर्देश नाही. सोन्याचा भाव साडे पंधरा होता. (५८७) ज्ञानेश्वरींतहि साडेपंधरा व सोळा असे सोन्याचे भाव आलेले आहेत.

इतर ग्रंथावरून 'आसु' नामक तत्कालीन सोन्याच्या नाण्याचें व पांड या जमीन मोजण्याच्या मापाचें ज्ञान होतें. मोठे लोक पालखींत बसून ये जा करीत. राजकीय दृष्टीने महत्वाच्या उल्लेखापैकी एक म्हणजे गोविंदप्रभुच्यावेळीं वऱ्हाडांत राजूर रोहीणखेड येथे जगळदरणा नांवाचा राजा स्वतंत्रपणे राज्य करीत होता. तो प्रथम गोविंदप्रभुचा निस्सीम भक्त होता. पण त्याच्या भक्तिभावनेंत कालांतराने अंतर पडल्यामुळे त्याच्या राज्यावर परचक्राची टोळधाड आली व त्यांत तो कामास आला. 'वराड' (वऱ्हाड) हा देशवाचक शब्द एका ग्रंथांत आलेला आहे. तो वऱ्हाड शब्दाची व्युत्पत्ति व परंपरा लावूं पाहणाऱ्याला उपयुक्त वाटेल.

ऋद्धिपूरवर्णनांत गोविंदप्रभुचें जें चित्र रेखटालेलें आहे तें फार सूक्ष्म व हृद्य आहे. गोविंदप्रभुच्या दाढीचे केस नाभीपर्यंत लोंबत असून त्याच्या मिशाहि मोठ्या होत्या. (ओव्या ५८८–८९) त्याच्या डोक्यावरहि पण जटांचा भार होता. (६०६–७) ग्रीस तत्ववेत्ता ॲरिस्टॉटल व लॅटिन कवि टॅसो यांच्यासारखाच गोविंदप्रभुहि थोडा फार तोतरा होता. (५०१) त्याच्या तोंडांत 'मेला' ही शिवी फार होती. (ओ. ५९५ टीप) ही शिवी बायकाच देऊं शकतात पण हा पंक्तिप्रपंच तेराव्या शतकांतील पुरुष चालूं देत नव्हते!

सकळ लीपींत उकारयुक्त अक्षर, त्या अक्षराखाली टिंब देऊन काढण्यात येतें. उ. ट्=टु व अक्षरावर आडवी रेघ नसते; 'उ' काराबद्दल 'ह' हें अक्षर येतें. याच लिपींत 'न' बद्दल 'ण' व 'ण' बद्दल 'न' येतो. कित्येकवेळीं त्याचा अतिरेकहि होतो. जसेः ते म्हने रे दुर्जणा खळूः मज सर्पिनी णको खवळू" महानूभावीयांच्या इतर ग्रंथांत (लीळाचरित्र वगैरे) जातीभेद, विटाळ, गुन्हे व शिक्षा, शेती व शेतकरी, उद्योगधंदे, नाणीं, बाजारहाट मापें, वजनें, सण वगैरे इत्यादी विषयींहि अनेक उल्लेख आलेले आहेत. माळीहाट, सोवनहाट (सराफ आळी) व सामान्य स्त्रीहाटांचें वर्णन सापडतें. वेश्याव्यवसायासंबंधी एक उल्लेखनीय गोष्ट आढळते; ती म्हणजे ही की जन्मभर वेश्येचा धंदा करून एकादी स्त्री शेवटीं कोणातरी एका पुरुषाची होई व त्याच्या मृत्यूबरोबर आपणहि अग्निप्रवेश करी !!

नुकतेच डॉ. मो. वा. चिपळूणकर यांनी 'हवामानासंबधींचे वाग्प्रचार' संकलीत करून चित्रमयजगत्मध्ये एक लेख लिहिला आहे. त्यावरून शेती व बागायतीसंबंधीचा कितीतरी महत्वाचा इतिहास उपलब्ध होतो. सृष्टिनियम, भविष्यकथन, स्वभावदर्शन, कालमान, नक्षत्रं, तारे, चंद्र, सूर्य, ग्रह, वातावरण, वनस्पती इत्यादिकांचा हवामानाशीं असलेला संबंध त्यावरून कळून येतो. वरील एकाच विषयावरील त्यांनी २२५ वाक्प्रचार जमा केलेले आहेत. अशा शेकडो बाबींसंबंधी, प्रत्येकींच्या वाक्प्रचारांचा संग्रह करीत गेल्यास, त्यावरून गत इतिहास व चालू जीवन याविषयी कितीतरी विपुल माहिती मिळण्याची शक्यता आहे व या साधनसामग्रीच्या साह्याने भूत, वर्तमान, भविष्य या कालांतील अनेक घटनासंबंधी महत्वाचे सिद्धांतहि मांडतां येण्यासारखे आहेत. संशोधनामुळे भाषाभिवृद्धि, इतिहास व संस्कृति यास कसा व कितीं उपयोग होतो व त्यामुळे देशाच्या सर्वांगीण प्रगतीस कशी चालना मिळते हें यावरून दिसून येतें.

### वाङ्मय-मातेचें स्तन्यपान !

प्रत्येक देशाचें वैशिष्टय वा 'स्वत्व' म्हणजे त्या त्या भाषांतील साहित्य-महर्षींच्या लेखनतपश्चर्येचाच परिपाक होय. मागे उल्लेखिलेल्या कांही बाबी प्रमाणेच एक बाबीचें महत्व बहुजनसमाजाला वाटत नाही. आणि ती

म्हणजे साहित्यिक व त्यांनी निर्माण केलेलें साहित्य. कित्येक ठिकाणीं कांही साहित्यिकांचा गौरव होत असला तरी, समाजावर त्यांच्या साहित्याचा घडणारा परिणाम व त्याबद्दलची समाज घटकांत असणारी जाणीव यांत जमीन अस्मानाचें अंतर दिसून येतें, असा परिणाम अप्रत्यक्ष घडत असतो, हेहि याचें कारण असेल. प्रत्येक देशाच्या साहित्यिकांनी, तत्वज्ञान्यांनी, कवींनी व कलावंतांनी त्या त्या देशांतील समाजाला संस्कृति दिलेली आहे. त्यांनीच समाजातील घटकांना वाङ्मयमातेचें स्तन्यपान करवून बाळसें आणलेलें आहे. 'साहित्यिकाचा सिद्ध हस्त कुरबकाच्या क्षुद्र झुडुपाला लागला तरी त्याचें कल्पवृक्षांत रूपांतर झालेलें दिसून येतें.' शेक्सपीयरच्या या संबधीच्या Mid Summer Night's Dream (act V Scene I)मधील...... "And imagination bodies forth the forms of the things unknown, Gives to airy nothing a local habitation and a name" या ओळी प्रसिद्धच आहेत! मग आगोदरचाच वर्ण्यविषय भव्य असल्यास त्याच्या भव्यत्वांत, साहित्यिकाच्या दिव्य प्रभेने शतपट भर पडल्यास आश्चर्य कोणते? रामासारखे पराक्रमी व गुणी राजे कितीतरी झाले असतील. त्यांच्यावर आपत्तींची परंपराहि कोसळली असेल; ते स्मृतिशेष झाले आहेत. पण वाल्मिकेने आपल्या प्रतिभेच्या अद्भुत किमयेने रामाच्या कथेला रोमहर्षक अमरता आणलेली आहे! त्याचप्रमाणे व्यासांच्या दिव्य प्रतिभेने युधिष्ठिर कृष्ण इत्यादिकांचें जीवनचरित्र शाश्वत करून ठेवलें आहे. आजच्या युगांत प्रत्यक्ष दृष्टीसमोर असलेल्या महात्मा गांधीच्या महान् विभूतिमत्वाशीं जुळणारें स्वभावचित्र, शेकडो वर्षापूर्वी रंगवून ठेवणाऱ्या श्रीव्यासांच्या प्रतिभेची उज्वलता कोठवर वर्णावी? जगाच्या काव्यांत रामायण महाभारत यास तोड नाही; हीच आमची खरीखुरी संपत्ति आहे.

अगदी अलीकडील कांही उदाहरणें उधृत करावयाचीं म्हणजे, इंग्लंडमध्ये शॉ आणि वेल्स याप्रमाणे मानवतावादी रसेलच्या लेखनाचा त्या राष्ट्रावर मोठ्या प्रमाणांत परिणाम झालेला आहे. आपल्या इकडेहि, अर्थशास्त्राचा द्रष्टा कार्लमार्क्स आणि फ्राईड याप्रमाणे रसेलच्या ग्रंथांचा प्रामुख्याने नवमतवादाच्या बाबतींत बराच परिणाम झालेला दिसून येईल. तसेच इटालीचे विचार वैभव उन्नत करण्यास क्रोचे हा फार मोठ्या प्रमाणावर

कारणीभूत झालेला आहे. साहित्यिकांच्या साहित्यानेच बहुधा समाजांत उत्क्रान्ति वा क्रांति होते, ही जाणीव थोड्याशा सूज्ञ विद्वानांना असली, तरी, बहुजनसमाजास ती जवळ जवळ मुळीच नसून, साहित्यिक व त्यांचे कार्य याबद्दल त्यांना विशेष सोयरसुतुक नसतें! पण संशोधनामुळेच या सर्व साहित्यिकांचें अमोल साहित्य आजपर्यंत जीव धरून राहिलेलें आहे!

## संस्कृति-मानबिंदु!

त्या त्या देशाची संस्कृति म्हणजे त्या त्या देशाचें सारसर्वस्व होय. संस्कृतीच्या नाशाबरोबर राष्ट्राचाहि नाश होतो. प्रत्येक राष्ट्र आपल्या सर्वस्वाची आहुति देईल पण आपली संस्कृति नष्ट होऊं न देण्याचा जिवापाड प्रयत्न करील. 'आमची संस्कृति अती प्राचीन व सर्वांत श्रेष्ठ' असें सिद्ध करण्याचा प्रत्येक राष्ट्र आटोकाट प्रयत्न करते. ज्या देशाला संस्कृति नव्हती त्याला दुसऱ्या देशांचें दासत्व पत्करावें लागलें. ! इंग्रजानी संस्कृतीच्या जोरावर भारताला जिंकलें (भारतीयांची आपल्या थोर संस्कृती विषयीची जाणीव कमी झाल्यामुळे) व आपलें राज्य येथे दीडशे वर्षें स्थिरपद केलें, हें ताजें उदाहरण आहे.

संस्कृती गेली म्हणजे राष्ट्राजवळ जगण्यासारखे कांहीच उरत नाही. नानाविध शास्त्रे, कला यांनी युक्त असलेली संस्कृति हा एक राष्ट्रमोराच्या शरीरावरील सुंदर पिसारा होय. तो झडून गेला तर मोराचें 'मोरपण' टिकणेंच अशक्य आहे. म्हणून संशोधनाच्या पाणकळेने त्याला नेहमीच प्रफुल्ल राखणें आवश्यक असते. "जर पौर्वात्य लोक 'स्वत्व' निष्ठ राहतील, व आपण काय होतो आणि आहोत या बद्दलची त्यांची श्रद्धा स्थिर राहिली तर, त्यांना पाश्चात्यांचें भय वाटण्याचें कारण नाही"–असे विचार "Sunday News of India" च्या एका अंकांत लुई फिशर यांनी काढलेले आहेत, ते मनःफलकावर कोरून ठेवण्यासारखे आहेत!

आर्यसंस्कृतीवर सुरवातीपासून अनेक आघात झालेले आहेत. बुद्ध धर्मियांच्या संस्कृतीने तिला कांही काळ ग्रहण लावलें. इस्लामी संस्कृतीनेहि तसेंच केलें व पाश्चात्य (इंग्रजी) संस्कृतीशींहि तिचा संघर्ष झाला. पण

आर्यसंस्कृतीची चंद्रकला पुन्हा या ढगाळ वातावरणांतून तेजोयुत झाली. शिकदराने स्वाऱ्या करून आमचें इतर वैभव घेतलें पण आमची संस्कृति तो नष्ट करूं शकला नाही! मुसलमानी लोकांचें राज्य आलें त्यावेळेस आमच्या शेंडीस दाढीची जोड मिळाली, धोतराबरोबर पैजाम्याचा थाट दिसावयास लागला; मराठीबरोबर त्यांची उर्दू भाषाहि आमच्या साध्यासुध्या व्यवहारांत नाचावयास लागली. इतकेंच नव्हे तर त्यांच्या रिवाजाची पिलें आमच्या घरादारांत शिरलीं. * इंग्रजाचेहि सूटबूट हॅट, फ्रेंचकट, सफाचट सर्व प्रकार आले, त्यामुळे संस्कृतीचें बाह्य स्वरूप जरी बदललें, तरी अंतरंग शाबूतच राहिलें. आमच्या संस्कृतीच्या शुद्ध हिरकणीवर यापैकी कोणाच संस्कृतीची कानस चालूं शकली नाही, उलटपक्षी खरी हिरकणी जशी विद्युत्जागृत होते, त्याप्रमाणे परकीय संस्कृतीच्या विरोधक संघर्षणाने आमची संस्कृतीहि अधिकाधिक संस्कारक्षम बनत आहे!

पूर्वीच्या काळीं आर्यसंस्कृतीचें स्वरूप विश्वव्यापी सर्वसंग्राहक वृत्तीचेंच होतें. पण व्यावहारिक दृष्टीने मात्र तिचा उपयोग जरासा संकुचितपणे केल्या जात होता एवढेच. सुरवातीला कोणत्याहि लोक समुदायाचा विचार व कृत्यें जमात, टोळी, संघ, समाज इत्यादि दृष्टिकोनांतून होतो. त्यानंतर राष्ट्राची कल्पना येते. राष्ट्रवाद किंवा राष्ट्रभक्ति हीच एकमेव ध्येयसर्वस्व मानल्या जाऊं लागते. त्याकरता झुंजारवृत्तीने प्राणार्पण करणें, व दुसरीं राष्ट्रें पादाक्रांत करणें, यांतच जीविताचें साफल्य आहे, अशी अढळ निष्ठा असते. तरीहि आर्यसंस्कृतीने बहुधा, परकीयांवर आक्रमण करावें म्हणून नव्हे तर परकीयांचें आपल्यावर आक्रमण होऊं नये म्हणून, तेजोबलाची उपासना चालविलेली होती. अंधेला हा निर्विष व गरीब साप असल्यामुळे त्याला कोणीहि तुडविनो म्हणून त्याने नुसता फुस्कारा टाकून लोकास धाक दाखवावा, अशा तऱ्हेची आर्यांची वृत्ति होती. जैन धर्मांत दगडालाहि आत्मा आहे असें मानतात

* मुसलमानांचा मोठा सण मोहरम. त्यांत हिंदु संख्येनें निदान दुप्पट तरी असत. अल्लाचा प्रासादिक नाडा ते आपल्या-विशेषतः मुलांच्या गळ्यांत बांधण्यांत अभिमान मानीत!

इतपत एकांतिक कल्पना आर्यांची नव्हती ! कुंडलींतील बलवान ग्रह इतरांना फिरवितो, हें तत्व त्यांनी जाणलें होतें व सामर्थ्यवृद्धीने कोणालाहि आपल्यावर आमक्रण करण्यास वाव न मिळून, हिंसेला पायबंद बसतो, अशी त्यांची धारणा होती. कुक्कुटाप्रमाणे सापांचीं अंडीं उबवून, त्यांतून साप निर्माण करून, आपलाच स्वतःचा फडशा पाडून घ्यावा हें तत्व मात्र त्यांना मंजूर नव्हतें. आता तर समाजाच्या व राष्ट्राच्या प्रगतीचा टप्पा बदलला आहे. 'राष्ट्रवाद' ही आजच्या काळांत बुरसलेली भावना भासत आहे. 'विष देणारांनाहि अमृत द्या' ही कालानुकूल योग्य भावना प्रस्थापित होत आहे. व असें झालें तरच मानवतेच्या दुःखाच्या सर्व प्रश्नाचें कायमचें निर्मूलन झालेलें दिसेल !

## प्रभावित रसायन !

संस्कृतीला इंग्रजींत Civilization व Culture असे शब्द वापरण्याची पद्धत आहे. संस्कृति हा शब्द अत्यंत व्यापक आहे. संस्कृति म्हणजे त्या त्या देशाची भाषा, धर्म, तत्वज्ञान, शास्त्रें, ललितकला (मूर्तिकला चित्रकला, शिल्पकला इ.) आचार, इतिहास, राजकारण, नीति, व्यवहार, विज्ञान, स्त्रीजीवन, पुराण कथा, कायदे, चालीरीती, रूढी, कल्पना, विचार इत्यादिकांचें प्रभावित रसायन होय ! या सर्वांमुळे राष्ट्राची जी एक अंतिम प्रवृत्ति बनते (सात्विक, राजस वा तामस) तिला संस्कृति म्हणतां येईल.

समाजाचा सर्वांगीण विकास म्हणजे संस्कृति. ती आध्यात्मिक, भौतिक, शारीरिक उन्नतीचा समुच्चय होय. संस्कृति म्हणजे मानवी ज्ञान, प्रज्ञा, कतृत्व याचा आविष्कार ! उच्च पातळीवरील मानव्य म्हणजे संस्कृति असें समीकरण मांडतां येईल.

धर्म म्हणजे अर्थातच संस्कृति नव्हे. संस्कृतीचा तो एक भाग आहे. संस्कृति विकासशील असते. प्रत्येक काळचे युगधर्म बदलत असतात. आजकाल निधार्मिकतेचें तत्व पुढे आलेलें आहे. मानवी प्रगतीच्या मार्गातील हा शेवटचा शेवटचा टप्पा म्हणून तें तत्व स्वागतार्हच आहे. समाज पुरुषाच्या बाल्यावस्थेंत त्यावर घातलेलें आंगडें, त्याची पूर्ण वाढ झाल्यानंतर देखील तसेंच त्याच्या आंगावर राहूं द्यावें, हें म्हणणें खचित शहाणपणाचें नाही ! धर्माची

जी popular कल्पना आहे, (म्हणजे सकुंचित आचार, संप्रदाय वगैरे) तो धर्म जर मानवी उन्नतीस पोषक नसेल तर बदललाच पाहिजे. धर्म बदलेल; नीतीचीं त्रिकालाबाधीत मूलतत्वें जगाच्या अंतापर्यंत कायम राहणारीं आहेत—सत्य, अहिंसा हीं तत्वें सोडा असें कोणीहि म्हणणार नाही. व तीं साडूं म्हटलें तरी सुटणारहि नाहीत. अनंत काळापासून जी संस्कृति-जे परिश्रमपूर्वक मिळविलेलें आतापर्यंतचें ज्ञान—तें सोडूं म्हटल्याने सुटत नाही. संस्कृति आमच्या रक्ताच्या प्रत्येक बिंदूंत मिसळून मुरुन जाऊन, ती आमच्या शरीर—आत्म्याशीं एकरूप झालेली आहे. संस्कृतीचा ऱ्हास म्हणजे राष्ट्र होकायंत्रांतील लोहचुंबकाचेंच स्खलन (Declination) होय. किंवा संस्कृति नष्ट करणें, म्हणजे राष्ट्राने स्वतःतीच आत्महत्या करून घेणें होय!

धर्माच्या पायीं आतापर्यंत मारामाऱ्या, खून, रक्तपात झालेले आहेत, ते राजकारणाशी कोत्या व वेडगळ धर्मसमजूतीची सांगड घातल्यामुळे, व परधर्म असहिष्णुतेमुळे झालेले आहेत. वैष्णवांनी उभे गंध लावावें व शैवांनी आडवें गंध लावावें, वैष्णवांनी जमीन सारवावयाची झाली तरी उभी सारवावी व शैवांनी आडवी सारवावी येथपर्यंतच्या चिल्लर मूर्ख मतांपासून, तो धर्मा करता दोन राष्ट्रांनी एकमेकासमोर दंड थोपटून आव्हानास उभें राहून, भूमी रक्तरंजित करावी, येथपर्यंतच्या घटणांचें मूळ धर्मवेडेपणांत (Fanaticism) मध्येच पाहावयाला सापडेल. मध्ययुगांत तरवार हातांत घेऊन धर्मतत्वांचा प्रसार करण्यांत आला. बाप्तिस्मा न घेणाऱ्या लोकांची शार्लमेन बादशहाने अमानुष कत्तल केली. तिसरें 'क्रुसेड' (धर्मयुद्ध) सनातन लोकाविरुद्ध केवळ धर्माकरतां पुकारलें गेले! भारतांतहि धर्माकरता अशीं कित्येक समरांगणें होऊन हजारो लोक मृत्युमुखीं पडले. ज्या देवाकरता मानवांनी हे सर्व अहमहमिकेने केले, त्याचा मात्र कोणत्याच धर्मातील लोकांना अजून पत्ता लागला नाही; व त्याने त्यांना कोठे शाबासकीहि दिल्याचें आढळत नाही!

धर्मतत्वें हीं केव्हाहि निर्दोषच असतात! धर्मसंस्थापकांच्या मनांत गढूळ किल्मिष कधीच नसतें! पण त्या दिव्य तत्वांचे वर, धर्मसंस्था-

पकांच्या अनुयायांच्या हातांत शाप ठरत असतात. व्यावहारिक जगांत, आपलें स्थान उच्च ठेवण्याकरता, धर्मतत्वांच्या तेजस्वी व उपकारक अग्नीचा, पिशाच्यांच्या हातांतील कोलिताप्रमाणे ते दुरुपयोग करून, त्यांला हवे तसे राबवीत असतात! धर्मसंस्थापकांचें निर्वाण झाल्यानंतर कांही काळाने यूरोपांतील व बुद्ध धर्मामधील वगैरे मठांतील भिक्षु-भिक्षुकिणींचा गोंधळ सुप्रसिद्धच आहे!

## विशाल सहानुभूति

वैदिक, बुद्ध, ख्रिश्चन वगैरे धर्मात जीं व्यापक व उदार तत्वें आहेत, तीं जवळ जवळ सारखींच आहेत. वैदिक आर्यधर्माची मानव्याच्या सहानुभूतिविषयी केवढी व्यापक दृष्टि होती, हें ठिकठिकाणच्या धर्मसूत्रावरून दिसून येतें. उदाहरणार्थ सर्व पृथ्वीला (त्या काळी जी ज्ञात होती ती) उद्देशून लिहिलेले कांही वैदिक मंत्र पाहाः-

**(१) त्वज्जातास्त्वयि चरंति मर्त्यास्त्वं बिभर्षि द्विपादस्त्वं चतुष्पादः। तेमेवे पृथिवि पंचमानवा येभ्यो ज्योतिरंमृतं मर्त्येभ्य उद्यन् सूर्योरश्मिभिरातनोति अथर्व १२।१।१५ (२) उपाहूता पृथिवमाता उपमां पृथ्वीमाता वह्यताम् यजु २-१० (३) नमो मात्रे पृथिव्यै माहं मातरं पृथिविं हिंसिषं मा मां माता पृथिवी हिंसीत्॥ तै ● १-८-१५**

जैन, बुद्ध व ख्रिस्त धर्माने अहिंसा तत्वाचाच मुख्यतः प्रसार केला. इस्लामी धर्म मात्र आक्रमक होता. तें त्यावेळच्या काळांत कदाचित् अपरिहार्यहि असेल; पण खुद्द इस्लामी धर्माचा संस्थापक महंमद पैगंबर हा क्षमाशीलच होता, याबद्दल इतिहास ग्वाही देतो. कुरेश जमातीचा प्रमुख व महंमदाचा हाडवैरी अबुसुफियान याने त्याचा अमनुष छळ करून, त्याला मक्केहून मदीनेस पळवून लावलें; याबद्दलचा सूड घेण्याच्या ईर्षेने महंमदाने त्यावर स्वारी केली असतां, शेवटी त्याला उदार मनाने क्षमा केली. महंमदाने हा

धर्म विश्वबंधुत्व * प्रस्थापित करण्याच्या उद्देशाने काढला होता, हें बहुतेक कोणाच्या ध्यानांत येत नाही. त्याच्या अनुयायाने पुढे त्याला विचित्र कलाटणी दिली ही गोष्ट निराळी. इस्लामी धर्माची आक्रमक वृत्ति क्वचित त्याच्याच दृष्टीने त्यावेळीं काळास अनुसरून दिसत असली तरी, आजच्या नवयुगांत हा दृष्टीकोण बदलण्याला व त्यांत व्यापकता आणण्याला त्या धर्माला वाव आहे! जातपात न मानतां त्या धर्मापुरते तरी सर्वांना समान मानणें, हें इस्लामी धर्माचें पूर्वापार अमर कार्य होय.

खिस्ती मिशनऱ्यांनी दुसऱ्या देशांतील लोकांचें धर्मांतर करवून घेण्या-करता जीं कृष्णकृत्यें केलीं, तीं त्यांच्यांतील अधिकारारूढ मंदांधांकडून झालीं आहेत, असें म्हटलें पाहिजे. पण कवि ना. वा. टिळकांसारखे, त्या धर्माच्या खऱ्या उच्च तत्वास भाळून, आपण होऊन तो धर्म स्वीकारलेलेहि कित्येक लोक आहेत.

मनोज्ञ घटना

एकीकडून अशा तऱ्हेच्या घातपाताच्या घटना घडत असतां, दुसऱ्या बाजूनें तितक्याच मनोज्ञ घटना आपल्याला इतिहासांत पाहावयास सापडतात. एका देशाच्या व धर्माच्या लोकांनी दुसऱ्या देशाच्या व धर्माच्या लोकांशीं अनेक बाबतींत मनमोकळेपणाने देवाण-घेवाण करून स्नेहसंबध वाढविलेले आहेत. एका देशाच्या भाषेने दुसरीला शब्द दिले व तीपासून घेतले. दुसऱ्या देशाच्या चित्रकलेंतील व मूर्तीकलेंतील चांगल्या तत्वांचा आपल्या चित्र व मूर्तीकलांशीं समन्वय केला. इस्लामीयांचीं कांही कृत्यें अक्षम्य असलीं तरी, त्यांनी आमच्या भारतवर्षांत जे ताजमहालादि शिल्पकलांचें, जगाला थक्क करण्याच्या योग्यतेचें वैभव मागे ठेवलें आहे, तें आम्हाला विसरतां

*The idea of brotherhood and the simple life and the belief in one God which Mohammed preached inspired the Arab.

Mulka Raj Anand.

येत नाही. * आर्यांनी अनार्यांच्या अनेक बाबी घेतल्या व आपल्या त्यांना दिल्या. यज्ञसंस्था, चातुर्वण्य, संस्कृतभाषा इ. अनेक गोष्टी अनार्यांनी आर्यांपासून घेतल्या व आर्यांना स्वतःच्या देव देवता दिल्या. आर्यांच्या रुद्र या वैदिक देवतेचें शिवांत रूपांतर झालेलें आहे. त्याचप्रमाणे देवी ही अनार्यांची देवता आम्ही घेतली व तिला गौरी, उमा इत्यादी स्वरूपांत पूजीत आहोंत! आर्यांच्या इंद्र, कुबेर, यक्ष, किन्नर इत्यादि मूर्ती बुद्ध धर्मियांनी व जैनधर्मीयांनी उचलल्या. बुद्धाच्या मूर्तींच्या प्रभावळींत त्या जशा दिसून येतात तशा जैनांच्या तीर्थंकराच्या मूर्तींच्या प्रभावळींतहि देखील दिसून येतात. पाश्चात्यांनी आम्हाला पुष्कळ गोष्टी दिल्या. आधुनिक मूर्तिकलेंतील 'हेलेनिक इंप्रेशन' हें पाश्चात्य शिल्पकलेंतून आलेलें आहे.

एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति !

वैदिक वाङ्मय हा आर्यसंस्कृतीचा पाया आहे. वैदिक वाङ्मयाबद्दल आचार्य विनोबा भावे म्हणतात:– "वेदांत मानवजातीच्या हिताचा विचार केलेला

* तसेंच पाहिलें तर हिंदुमुसलमानांतील सलोख्याचे प्रसंगहि थोडे थोडके नाहीत. वऱ्हाडच्या बाहेर कित्येक मुसलमान जसे हिंदु साधु बनले त्याप्रमाणे वऱ्हाडांतहि झाले. शेखमहंमद, शेखबहामनी यांचीं नांवें त्या त्या भागांत बहुतेकास माहीत आहेत. आकोट येथील मियासाहेब हे हिंदु सत्पुरुष नरसिंगबुवा यांचे गुरु होते! कारंजा येथील मुसलमान साधुने भगवद्गीतेवर टीका लिहिलेली आहे. धार्मिक ऐक्याच्या अनेक उदाहरणांपैकी एक म्हणजे एलिचपूरजवळ बहिरम येथे बहिरमबुवा या देवाचें स्थान आहे. तो देव म्हणजे, एक खडक आहे. त्यास हिंदु व मुसलमान दोघेहि पवित्र मानून त्याची दोहोकडून पूजा करतात. शहा नांवाचा मुसलमान फकीर व दावल नांवाचा महार साधु हे एकमेकाचे जिवलग मित्र असून, एकेच ठिकाणीं मेले व त्या दोघांच्यांहि मरणापूर्वीच्या इच्छांवरून त्यांना एकेच ठिकाणीं पुरले. शह-दावल च्या एकाच नांवाखाली या साधूच्या स्मरणार्थ एकाच ठिकाणीं जत्रा भरते. कांही मुसलमान लोक सध्याहि हिंदुच्या हरिश्चंद्र वगैरे नाटकाचे प्रयोग करतांना आढळतात!

आहे. सर्व संस्कृतींचा समन्वय करण्याला अत्यंत उपयुक्त असे वेदग्रंथ आहेत. वेद सांप्रदायी लोकांप्रमाणे विचार करीत नाहीत. 'एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति' हें आहे वेदाचें सर्वोत्तम समन्वय सूत्र. मी तर असें मानतों की इतःपर सर्व दुनियेंतील लोकांचा समन्वय होईल व त्याचें सूत्र वेदमंत्रांत जाहीर होतें." भारतीय संस्कृति केवळ मूठभर सवर्ण किंवा अमुक गटाच्या लोकाची, पंथाची वा धर्माची वतनदारी नव्हे. आर्य संस्कृतींत सद्विचारांचें सामर्थ्य व सद्भावनांचें सौंदर्य आहे. तिच्या आधिभौतिकतेच्या वैराग्यांत आध्यात्माचें वैभव आहे. उपळत्या कणखर चैतन्याबरोबर, व्यापक मानवी-सहानुभूतीचें मार्दव आहे. सर्व भारतीय धर्म, मतें, कला आणि शास्त्रें यांचा विकास वैदिक वाङ्मयांतूनच झाला. ती स्थितप्राय (Static) नसून विकासशील (Dynamic) आहे. आर्यसंस्कृतीने बुद्ध, गांधी, अरविंद घोष, टिळक यांच्यासारख्या, पाश्चात्य संस्कृतींतहि निर्माण न झालेल्या विभूतींना जन्म दिलेला आहे. आपणांत बरे वाईट सामावून घेऊनहि ती जान्हवीसारखी पवित्र राहते. साने गुरुजी म्हणतातः- भारतीय संस्कृति म्हणजे संसारांतून (सांतांतून) अनंताकडे, भेदांतून अभेदाकडे, व विरोधांतून विकासाकडे जाणें होय !

आज जगाची वाटणी दोन मोठ्या राष्ट्रगटांत झालेली आहे. दुसऱ्या दृष्टीने आधिभौतिक व आध्यात्मिक किंवा पाश्चात्य व पौर्वात्य यांत 'लढा' पडलेला आहे. आणि जगावर कोणती संस्कृति कायम राखावयाची हा प्रश्न जगांतील श्रेष्ठींसमोर आहे. विनोबा भावे म्हणतात, "वरील दोन गटापैकी भारताला कोणत्याहि गटाचे अनुयायी बनावयाचे नाही. जागतिक शांततेकरता हिंसा की अहिंसा यापैकी कोणत्या तत्वाची कास धरणें योग्य आहे, हाच प्रश्न यापुढे शिल्लक आहे. भूदान यज्ञ हें अहिंसेचें साधन असून या साधनाने, युद्धाला त्रस्त झालेल्या जगाला शांतता मिळेल. या यज्ञाच्या प्रयोगाकडे सर्व राष्ट्रें उत्कंठेने पाहात आहेत. हा भूदान यज्ञ यशस्वी झाला तर त्याचे परिणाम बाहेरील राष्ट्रावर होणें अपरिहार्य आहे."

जगांत शांतता प्रस्थापित करण्याकरता अनेक श्रेष्ठ तत्वचिंतकांनी महत्वाचे विचार सुचाविलेले आहेत. "बुद्धिवादी लोकांनी, विशेषतः शास्त्रज्ञांनी एकत्र येऊन, हें स्पष्ट केलें पाहिजें की, यापुढे युद्ध झालेंच तर तें जित पक्षाप्रमाणेच जेत्यालाहि अनर्थकारक होईल. दोन भिन्न प्रणालीचीं राष्ट्रें (रशिया व अमेरिका) शांतपणे वागूंच नयेत याला कांही कारण नाही. जगाचे विभाग पाडून त्यावर एकेका विचारप्रणालीच्या राज्याचें स्वामित्व चालून, त्याने अन्य भागांत ढवळा ढवळ न करणें अगदी शक्य आहे. जगांत सरकार नांदावयाचें असलें, तर जागतिक सरकारची स्थापना, हें आपलें उद्दिष्ट असलें पाहिजे. तोपर्यंत भिन्न तात्विक मतप्रणालींच्या बाबतींत सहिष्णुता अंगी बाणविली पाहिजे" असें रसेल म्हणतो. H. G. Wells यांच्या 'आधुनिक नंदनवन' (Modern Utopia) या कादंबरींत ज्ञानाच्या अयोग्य उपयोगाने होणारे दुष्परिणाम मांडलेले आहेत. जगांतील बुद्धिमान व ध्येयवादी नेते, यांचें एक 'पार्लमेंट' असावें व वैषम्य नैधृण्यात्मक समाजरचनेंतील असमता काढून टाकावी. लढाई, भांडण, दारिद्य्र, रोग, बेकारी असलीं मानवीं दुःखें जगांतील कार्यकर्त्यांनी एकत्र येऊन नाहीशी करावी व स्वर्ग भूमीवर आणावा' हें तत्व ग्रंथीत केलेलें आहे.

आपल्या इकडे, साने गुरुजींनी 'आस्तिक'च्या तोंडून वरच्या सारख्या प्रश्नाचा विचार केला आहे. फरक इतकाच की एच. जी. वेल्स हा प्रश्न वरील प्रकाराने सोडावयास सांगतात, तर साने गुरुजींचें तत्वज्ञान व्यापक व प्रेमभावनेवर अधिष्ठित झालेलें आहे. तेहि संस्कृती-समन्वयाचाच मार्ग सुचवितात.

संस्कृती-समन्वयाबद्दल आजकाल बरेच प्रयत्न होऊन राहिले आहेत व जागतिक शांतीच्या दृष्टीने तें अत्यंत आवश्यक आहेत. याकरता सर्व भाषांचा, व निरनिराळ्या धर्मग्रंथांचा अभ्यास व्हावयास पाहिजे. यादृष्टीने डॉ. रघुवीर यांच्या "International Academy of Indian Culture" अशा सारख्या संस्थांनी चांगलें कार्य चालविलें आहे. भारतीय संस्कृति आशियाच्या सर्व दिशांच्या टोकापर्यंत पसरलेली होती. त्या भागांत मिळालेले ग्रंथ या संस्थेंत संग्रहीत केलेले आहेत. या संस्थेचे विद्यार्थी जपान,

जर्मन इत्यादि भाषेचें अध्ययन करीत आहेत. त्याचप्रमाणे दुसरें उदाहरण म्हणजे एक मोठे चवदा हजार रुपयाचें नोबल प्राइझच्या धर्तीवर कलिंग पारितोषकर ओरिसामधे पटनाईक या नांवाच्या धनाढ्य गृहस्थाने सुरू केलेलें आहे. सुबोध शास्त्रीय ग्रंथाकरता तें द्यावयाचें असतें. या परितोषका-साठी राष्ट्र, जात, धर्म, भाषा ही कसलीच अट नाही! १९५१ चें पहिल्या वर्षीचेंच पारितोषक, प्रसिद्ध फ्रेंच शास्त्रज्ञ प्रिन्स लुई डी ब्रागली यांना देण्यांत आलेलें आहे, हें अखिल भारतास अति भूषणावह असून संस्कृतिकार्य हें देशधर्मातीत आहे, ही जाणीव उत्तरोत्तर वृद्धिंगत होत असल्याचें तें एक द्योतक आहे यांत शंका नाही. अमेरिकेंतहि अशा संस्था बऱ्याच आहेत. मानवी जीवनाच्या अभ्यासाची व्यवस्था असलेली एका आंतरराष्ट्रीय संस्थेने आपले कांही सदस्य नुकतेच भारतांत, भारतीय कुटुंब पध्दति, चालीरीती व परंपरा याची ओळख करून घेण्याकरता पाठवि-लेले आहेत. त्यापैकी गुलेन गुमसेन उला रीझेन, ली नीमन, इ तरुण मुली आहेत. दोन्ही देशाचे स्नेहसंबध वृध्दिंगत व्हावयास अशा गोष्टींची फार आवश्यकता आहे. गुलेन गुमसेन इने हिंदुस्तान समाचारला सांगितलें की मला भारतीय कुटुंब पध्दति–विशेषतः भोजन पध्दति फार आवडली!

## भारतीय संस्कृतीचें मार्गदर्शन

गांधीजींचा जीवन संदेश आज पाश्चात्यांत घरोघरीं खोल जाऊन रुजलेला आहे! गांधीजींचे पुतळे घरोघर ठेवण्यांत येत असून प्रत्येक ठिकाणीं त्यांची आठवण निघत आहे. व त्यांच्या जीवनसंदेशांतून हजारो लोकांना श्रद्धामय आश्वासनाचें अमृत मिळत आहे. व समन्वयाचीं सुचिन्हें दिसत आहेत. " गांधीवाद हें आध्यात्मिक जीवनदर्शन असल्यामुळे, त्याचा स्वाभाविक कल आदर्श निष्ठेकडे झुकलेला आहे. मार्क्सवाद हे भौक्तिक सामाजिक तत्वज्ञान असल्यामुळे, त्याचा कल भौक्तिक वास्तववादाकडे झुकलेला आहे. गांधीवाद व मार्क्सवाद या दोघामध्येहि अंतिम ध्येय दंडहीन समाज हें, अथवा अराज्यवाद हेंच आहे. व त्या दृष्टीने गांधीवाद व मार्क्सवाद यांचा समन्वय होणें शक्य आहे" असें जें आचार्य शं. द. जावडेकर यांनी विधान केलेलें आहे, तें या बाबतींत लक्षांत घेण्यासारखे आहे!

महात्मा गांधी व विनोबाजी भावे यांच्या तत्वप्रणालीचा प्रभाव जगावर पडत असलेला दिसत आहे.

भारतीय व त्यांतून परिणत होणारी आशियाटिक म्हणजे पौर्वात्य संस्कृति यापुढे अखिल जगाचें मार्गदर्शन करण्याची प्रसादचिन्हें आज चाहूल देत आहेत.

पाश्चात्य व पौर्वात्य या दोन्ही महानद्यांचे प्रवाह आज जगांत विरुद्धान्वयाने वाहात असले व प्रयाग येथील गंगायमुनांच्या संगमावर ज्याप्रमाणे सूक्ष्म विभाज्य रेषा दिसून येते, त्याप्रमाणे या दोन्ही संस्कृतींच्या महानद्या एकमुखी होण्यापूर्वी, त्यांत वेगळेपणाची विभिन्न सूक्ष्मरेषा दिसून येणार असली तरी, पुढील सुवर्णयुगांत मानव्याच्या पावन तीर्थावर, त्या पूर्णाद्वैताने संगमित होण्याचें, जगांतील सर्वश्रेष्ठ विचारवंताचें शुभ स्वप्न, एक दिवस साकार झाल्याशिवाय राहणार नाही !!

संस्कृति—समन्वयाचें हें सुवर्णांकित नवें पान, मानवी इतिहासांत लवकर लिहिलें जावो ! आणि म्हणूनच संस्कृतीचा अजान वृक्ष * संशोधनाच्या पयःसिंचनाने, फुलोफुलीं व फळोफळीं बहरत ठेवणें, हें आजच्या भारतवासीयांचें आद्य कर्तव्य ठरतें !

भाषा—इतिहास—साहित्य—संस्कृतीची दिव्य मंगल ज्योत, केवळ अनंत संचय असलेल्या संशोधनविजेरीच्या (dinamo) अखंड प्रकाश पुरवठ्यानेच, आतापर्यंत काळ—झंजावाताचें आव्हान स्विकारून, त्याला हसत अमरत्वाने तळपत आहे, यापेक्षा संशोधनाच्या श्रेष्ठतेचा आणखी अन्य पुरावा कोणता ?

### संशोधनाचा व्यावहारिक उपयोग

संशोधनाचा इतिहास, भाषा, संस्कृती इत्यादिकांबद्दलचा वरिष्ठ दर्जाचा उपयोग, थोडासा दृष्टीआड केला तरी त्याचा व्यावहारिक उपयोगहि कांही कमी नाही ! लोणार येथे सरोवराला लागून असलेल्या धारेबद्दल वाशीमला

* आळंदीस ज्ञानेश्वराच्या देवळांत, त्यांनीच लावलेल्या फांदीपासून वाढलेला वृक्ष. पृथ्वीवर हा अद्वितीय समजतात.

हिंदुमुसलमानांचा मोठा झगडा सुरु झाला होता. तेथे पाणी भरण्याचा मुसलमान लोक हक्क सांगूं लागले. म्हणून हिंदूंनी स्वतःच्या हक्काबद्दलचा 'डिक्लरेशन' चा दावा न्यायालयांत आणला. ही जागा हिंदूचीच आहे असें दाखविण्याकरता, रामायण, पद्मपुराण, विरजक्षेत्रमहात्म्य, महानुभावीय ग्रंथ, व तेथील दैत्यसूदनाच्या, आठव्या शतकांत बांधल्या गेलेल्या देवळाच्या गाभाऱ्यांतील, छतावरील कोरलेल्या चित्रांतील, लवणासुराच्या कथेतून (विष्णुने लवणासुराला ठार मारुन तेथे तीर्थ आणलें अशी कथा आहे.) व खुद्द ऐने अकबरी मधूनहि आधार दाखवून, डॉ. देशपांडे यांनी ती हिंदुचीच जागा आहे असें सिद्ध करण्यास साह्य केलें. व तो दावा शेवटीं जिंकला गेला. महानुभावीयाच्या स्थानपोथीमध्ये जीं गावें आलेलीं आहेत, त्यावरुन प्राचीन महाराष्ट्राच्या भूगोलासंबंधी बरीच माहिती उपलब्ध झाली. त्या पंथापुरताच तिचा उपयोग नसून, व्यवहारांत देखील संशोधनाचा कसा उपयोग करुन घेतां येतो, याची वरील कांही उदाहरणावरुन कल्पना करतां येण्यासारखी आहे.

गरुड–पराक्रम !

'संशोधन–इतिहासाचें महत्व न कळण्याइतके आम्ही आम्ही अप्रबुद्ध आहोंत काय' असें वरील लिहण्यावरुन कित्येकाच्या मनांत येईल! तें कळलेलें असलें तरी वळलेलें मात्र नाही हें खास! अशिक्षित तर असोच; पण चांगले सुशिक्षित व पदव्यांची उपाधी धारण करणारे कितीसे विद्वान यासंबंधी अभ्यास व कार्य करण्याकरता पुढे सरसावत आहेत? व कितीसे धनिक या कार्याकडे ओल्या सहानुभूतीने पाहात आहेत? महाराष्ट्रांतील संशोधनसंस्थांचीहि आर्थिक परिस्थिति काय आहे.?

आपण असे पाहातों की, साधारणपणे राजकीय पुढाऱ्यांना गौरवांचीं बिरुदें जनतेकडून अमूप मिळालेलीं दिसतात. त्यांच्या कार्याकरता हजारो नव्हे लक्षापर्यंत थैल्या सहज गोळा होतात, पण राष्ट्राच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचें कार्य करणाऱ्या संशोधन–संस्थांना बव्हंशी पांच पंचवीस रुपयांचीहि मदत करणें जनतेला जड जाते! जातीवंत जिव्हाळयाच्या देशभक्तावर छत्र चामरें ढाळलीं जातात यांत गैर असें कांहीच नाही. राष्ट्राकरता त्यांचा स्वार्थ-

त्यागहि त्याच योग्यतेचा असतो. पण कित्येक हंगामी देशभक्तावरदेखील वतमानपत्रांचे रकाने भरभरून स्तुतिस्तोत्रें उधळण्यांत येत असत किंवा येतात, त्याच्या दशांशहि, प्रसिद्धिपराङ्मुख, सांदीकोपऱ्यांत दडलेल्या, अव्वल दर्जाच्या संशोधकावर उधळण्यांत येत नाही! शारदाश्रमसारख्या संस्थेतर्फे झालेलें महत्वाचें व्याख्यान एक अध्यक्ष, एक वक्ता व एक श्रोता (टेबल खुर्च्यांतील ढेकूण वगैरे सोडल्यास!) या थाटाने क्वचित् प्रसंगीं पार पडतें, तर एकाद्या अलबत्यागलबत्याच्या राजकीय भाषणास, तमाशाला जमाव्यात तशा झुंडी लोटतात!

बरें, राजकीज पुढाऱ्यांच्या मानाने संशोधक-इतिहासकारांची मातब्बरी अगदी कमी आहे असें म्हणतां येईल काय? एके प्रसंगीं लो० टिळक डॉ. केतकरांना म्हणाले, * "माझें आयुष्य यशस्वी झालें की फुकट गेलें या विषयी तुम्हास काय वाटतें? मला तर वाटतें की माझें आयुष्य फुकट गेलें आहे. मी राजकारणांत मुळीच पडलों नसतों, व बाजूला नेणाऱ्या भावनांचें संयमन करूं शकलों असतों, तर बरें झालें असतें असेंहि वाटूं लागतें. मला वाटतें की माझें खरें चिरकाल राहील, असें म्हटलें म्हणजे 'ओरायन' 'आर्क्टिकहोम' व 'गीतारहस्य' हेंच आहे." कदाचित् नेहमीच्या मनःस्थितींत, नसता अर्धवट विनोदाने हे वरील विधान टिळकांनी केलेलें असलें तरी, संशोधनविषयक कार्याचें महत्व ते किती मानीत, हेच याच्यावरून दिसून येते. प्रसिद्ध इंग्लिश सेनापती वुल्फ हा लढाईच्या वेळेस 'Gray's elegy in country churchyard' म्हणे; आणि समरयशाचें जयचिन्ह शिरावर मिरवित असतां, "क्विबेक जिंकणारा या पेक्षा 'एलेजी' सारखे जगन्मान्य काव्य लिहिणारा, अशी माझी कीर्ती झाली असती तर मी स्वतःस जास्त धन्य समजलों असतों" असे उद्‌गार काढी, त्याचें तरी रहस्य हेंच! एकाद्या ध्येयाचा परमोच्च बिंदु गाठणारे सर्वच अलौकिक लोक सारख्याच दर्जाचे नाहीत काय? राष्ट्राची सर्वांगीण उन्नति होण्याकरता त्याला सर्वच प्रकारच्या श्रेष्ठ लोकांची जरूरी आहे. सर्वच नुसते राजकार्यधुरंधर, सेनापती निपजून चालणार नाहीत. कै०

* विद्यासेवक वर्ष ६. अंक ७. एप्रील, मे, जून १९३६

रविंद्रनाथासारखे विश्वकवि, कै. रमणसारखे विश्वशास्त्रज्ञ किंवा राजवाडे-केतकरांसारखे त्रिखंड कार्ती संशोधक-समाजशास्त्रज्ञ आमच्या भारतांत झाले, म्हणूनच आइन्स्टिनसारखे व इतरहि पाश्चात्य विद्वान आमच्याशीं हस्तांदोलन करण्याची महत्वाकांक्षा बाळगितात ना?

पण बहुजनसमाजाला, सामान्य देशभक्ताचा अल्पकाळाचा कारावासहि रोमहर्षणाचा प्रसंग वाटतो, त्यालाच अज्ञानराक्षसाच्या, डोळ्यांत धूळ फेकून, ज्ञानाचा अमृतकुंभ खेचून आणणाऱ्या संशोधकाचा गरुडपराक्रम लक्षांत घेण्याइतकाहि महत्वाचा वाटत नाही! किंवा पल्लेदार तरवारीने शरीराची खांडोळी करण्याचें सामर्थ्य ज्यांना विस्मयचकीत करतें, त्यांनाच समाजाचें किंवा राष्ट्राचें विराट मन संस्कृत व बलशाली करणाऱ्या, टिंचभर लेखणीची विशेष महती वाटत नाही, हेंच खरें!

संशोधक—विद्वानांची ही स्थिति तर बिचाऱ्या कवी लोकांना कोण विचारतो? पाश्चात्य देशांत राजकवीच्या सन्मानाच्या जागा निर्माण करण्यांत येतात व तिकडील कवींना वर्षासनें व सन्मान प्रतिमा मिळतात. आमच्या इकडेहि प्राचीन काळीं कवींना सत्ते महत्व असे. इंग्रज सरकारच्या राजवटींत 'बी' सारख्या अग्रगण्य कवीला राजकवीचें मानाचें बिरूद मिळावयास नको होतें काय? राजवाड्यांनी महाराष्ट्रांतील कार्यकर्त्या पुरुषांची जी यादी दिली आहे तींत मुत्सद्दी, गणिती, काव्येतिहाससंशोधक यांच्याबरोबरच कादंबरीकारांत हरि नारायण आपटे व नाटककारांत कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर यांचा उल्लेख केलेला आहे. मात्र कवि म्हणून त्यांत एकाचाहि उल्लेख नाही. प्रतिभेचे कुबेर कविवर्य केशवसुत, राजवाडेसारख्या संशोधन चक्रवर्तीच्या दृष्टीतूनहि सुटावेत हा आपाततः झालेला दैवदुर्विलास आहे!

## विद्वानांची उदासीनता!

दिल्ली येथील १९४८ च्या इतिहास परिषदेच्या अखिल भारतीय अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून प्रो. निळकंठशास्त्री यांनी कलाविषयक विषय (Art subjects) आणि विशेषतः संशोधन-इतिहास या क्षेत्रांतील अभ्यासूंचा उतरता अंक पाहून खेद व्यक्त केला. इतिहास परिषदेंत नवीन उमेदीचे

तरुण विद्वान पुढे येत नाहीत, असा दावा आहे. जेवढे जुने विद्वान आहेत तेच तग धरून राहिले आहेत व त्यांतूनहि कमी होत आहेत! जयपूरच्या अधिवेशनांत, विद्यापीठांतील प्राध्यापक अभावानेच चमकत होते अशी तक्रार आहे! 'मध्यप्रांत संशोधन मंडळांत, नाणावलेल्या चार दोन संशोधका-व्यतिरिक्त इतर कोणी फारसे पुढे येत नाही. यापुढे कांही नवीन मंडळी आली तर कार्य होईल. नाहीतर तेथेच विराम पावावे लागेल.' असे मंडळाचे कार्यवाह म्हणतात. नागपूर यु. हिस्टॉरिकल सोसायटीच्या १९४९ च्या 'Annual Bulletin' मध्ये संपादक म्हणतात, "We again note with regret that historical research is not attracting as much talent in this University and in this State as it should. There is the general apathy of the intelligent public." नवभारत ग्रंथमाले-संबंधी प्राध्यापक श्री० ना० बनहट्टी यांनी असें म्हटलें आहे की, कॉलेजांतून निरनिराळे विषय शिकविणारे शेकडो महाराष्ट्रीय विद्वान आहेत; परंतु नव-भारत ग्रंथमालेकरता त्याजकडून ग्रंथ लिहून मिळावे, या करता जिवाचें रान केलें तरी त्यांतून फलप्राप्ती हाताच्या बोटावर मोजण्यापेक्षा अधिक ग्रंथांची होऊं शकली नाही. महाराष्ट्रांतील विद्वानांना आपली विद्वत्ता, व्यासंग, आणखी जें कांही असलें नसलें तें, वरिष्ठ अधिकाऱ्यांना दाखविण्याची जितकी उत्सुकता असते, तिच्या दशांशानेंहि अशा कार्याविषयी नाही."

मराठवाड्यामध्ये अशा तऱ्हेचे विद्वान पुढे येत नाहीत, म्हणून तो विभाग संशोधनसामग्रीच्या दृष्टीने अतिशय फलदायी असूनहि, तेथे संशोधनाची बैलगाडी, रें रें करीत चाललेली आहे!

आमच्या शारदाश्रमामध्ये जे पूर्वीचे तीनचार गृहस्थ वाङ्मयप्रकाश-नाच्या दृष्टीने लक्ष घालीत आहेत, त्यांत गेल्या कित्येक वर्षांत एकाचीहि भर पडली नाही!

## कीव करावी की राग मानावा?

विद्वानांची उदासीनता इतकी तर ज्यांना संशोधनाचें महत्व पटलें नाही, त्या जनतेचें दुर्लक्ष या कार्याकडे जास्तीच असावें यांत नवल नाही!

अशा कार्यास पैसा खर्च करणें, म्हणजे केवळ उधळपट्टी आहे, असे त्यांना वाटते! याचा अनिवार्य परिणाम म्हणजे संशोधनसंस्थांस आर्थिक साह्य मिळण्याची मारामार पडते. पारवेकर देशमुख यांनी या प्रांतांत विदर्भ साहित्यसंघासारख्या संस्थेला सात हजार रुपयाचा देणगी दिली, किंवा श्री. लक्ष्मण श्रीधर उर्फ बाबूराव देशमुख यांनी चार हजार रुपयाची देणगी दिली, अथवा डॉ. सरदेसाई याच्या भाषणाने प्रभावित होऊन, श्री. सेठ सोहनलाल दगडू यांनी इतिहास परिषदेच्या जयपूरच्या अधिवेशनांत, इतिहास परिषदे-करता पांच हजार रुपयांची देणगी जाहीर केली व पांचशे रुपये देऊन नाणक परिषदेचेहि ते आश्रयदाते झाले तरी, इ० थोड्याशा मोठ्या म्हणण्याजोग्या देणग्या सोडल्या तर आपल्याला इतरत्र काय दिसते?

उदाहरणार्थ गोंडवन संस्थेसारखी उपयुक्त संस्था चांद्याकडे स्थापन झाली, तिला ज्या देणग्या दिल्या गेल्या त्यापैकी चार दोन पाहिल्या म्हणजे जनतेला या कार्याची किंमत किती आहे, हें दिसून येतें. श्रीमंत राजे यादवशाह बापू चंद्रपूर रु. १०; श्रीमती राधाकुंवर राणीसाहेब पानावरस रु. ११; श्रीमान् लोकाग्रणी बाबासाहेब देशमुख, चंद्रपूर रु. १०; यामध्ये २०-२१ रु च्या सर्वांत मोठ्यांत मोठ्या देणग्या आहेत! बाकीच्या चाळीस एक लोकांच्या १५ रु. च्या आतच आहेत! हें एक उदाहरण म्हणून घेतलें. इतरत्र सार्वत्रिक हीच स्थिति दृष्टीस येते. शारदाश्रमला इतक्यांत बहुतेक एकहि देणगी १०० रु. च्या वर मिळालेली दिसत नाही. आर्थिक सहाय्याच्या अभावीं संशोधनकार्य जेवढ्या प्रमाणांत पाहिजे, तेवढ्या प्रमाणांत चाललेलें नाही, व कित्येक ठिकाणीं बेताबातानेच चाललेलें दिसतें. शारदाश्रम संस्थेजवळ प्रकाशनास कितीतरी पुस्तकें आहेत, पण त्यांची अजून व्यवस्था लागत नाही. नागपूर यु. हिस्टॉरिकल सोसायटी म्हणते, "our sources are very megre." सत्कार्योत्तेजक सभा धुळेच्या चालकांनी महाराष्ट्रांतील निरनिराळ्या शेकडो गावांत फिरून हस्त-लिखितांचा संग्रह संस्थेंत केलेला आहे. त्यापैकी फार थोडा रामदास आणि रामदासी ग्रंथमालेच्या रूपाने व मासिक पुस्तकांच्या द्वारा आतापर्यंत प्रकाशित होऊं शकला. या कार्यांत सभेला प्रतिवर्षी सुमारे चारशे रुपयांची नुकसानी येत गेली असे त्यांनी उद्गार काढलेले आहेत. राजवाडेसंशोधनमंडळ

धुळेने, बदलत्या आर्थिक परिस्थितीने अपेक्षित देणग्या मिळाल्या नाहीत, असें लिहिलें आहे. भांडारकर ओरिएंटल इन्स्टिटयूटने १९५०–५१ च्या रिपोर्टात, "The finincial condition of the institute is for from being satisfactory" असें दिग्दर्शित केले आहे ! भांडारकर इन्स्टिटयूट, सत्कार्योत्तेजक सभा, किंवा राजवाडेसंशोधनमंडळ महाराष्ट्रांत व विदर्भात आता आपल्या पायावर पूर्णपणे स्थीर झालेल्या आहेत. व त्यांनी प्रचंड कार्य केलेलें आहे. इतर संस्थांप्रमाणे त्यांची दोलाचल स्थिति राहिली नाही. तरी त्यांनाहि प्रतिकूल आर्थिक परिस्थिती जाणवल्याशिवाय राहात नाही. मग गोंडवन संस्थेसारखी 'मराठी-भाषा-संशोधन-साहित्य यांच्या अभिवृध्यर्थ सर्वांगिण प्रयत्न करण्याच्या' उद्देशाने नुकतीच निघालेली संस्था, केवळ दोन वर्षांच्या आतच इतिश्री होण्याच्या बेतांत यावी, याचे नवल तें काय ? या संस्थेच्या घटनेवरून तिला बरेच मोठे कार्य करायचें होतें, असें दिसतें व दोन वर्षांच्या अवधींत तिने मधुवन मासिक काढून व इतरहि दृष्टीने विदर्भात बऱ्याच अपेक्षा उत्पन्न केल्या होत्या. गोंडवनामधील चंद्रपूर, वर्धा, छिंदवाडा, बालाघाट माणिकगड विभाग इत्यादि तिने कार्यक्षेत्र ठरविलें होतें. अशी संस्था जनतेने लयास जाऊं द्यावी, हें तसि खरोखरी लांछनास्पद आहे. मध्यप्रांतसंशोधनमंडळ या संस्थेचा इतिहास आर्थिक दृष्टीने शारदाश्रम या संस्थेपेक्षा अधिक आशादायक दिसत नाही. संस्थेची जीं गाऱ्हाणीं तींच बहुधा मध्यप्रदेसंशोधनसंस्थेची आहेत !

म. सं. मं ने नागपूरकर भोसल्याची बखर या पुस्तकाच्या १९४८ सालीं १०० प्रती बांधवून घेतल्या होत्या. त्यापैकी गेल्या प्रत्येक वर्षांत क्रमाने ७-२-१२ प्रती खपल्या ! येथे बाबुराव अर्नाळकरांच्या डिटेक्टिव्ह कादंबऱ्यांचा किती खप होतो हा प्रश्न विचारणीय आहे ! लोकाभिरुची (!) चा वारा कोणत्या दिशेला वहातो याचें हें प्रत्यंतर आहे ! ४९ सालीं संस्थेच्या विद्वान् सभासदांनी वाचलेल्या निवडक निबंधाचा एक संग्रह संस्थेतर्फे प्रकाशित करण्यांत आला. त्यावर्षी त्याचे १५ रु. व पुढील वर्षी ३२ रु. आले ! हा संग्रह सभासदांना आतां विनामूल्य देण्यांत येतो !! औदार्य या दृष्टीने हें स्पृहणीय दिसत असलें तरीं, संस्थेच्या आर्थिक दृष्टीने तें बरोबर नाही ! नागपूर प्रांताचा इतिहास या ग्रंथाच्या ११ रु. च्या तीन प्रतींचा किंमत

गैरसभासदांना ६ रु. च आकारण्यांत येते. अशा बऱ्याच्या व्यवहारामुळे कोणत्याहि संस्थेचें पाऊल पुढें कसें पडावें? शारदाश्रमाला तर एवढेंहि भाग्य लाभलेलें नाही. अशाने व्यक्तीने वा संस्थेने ग्रंथ कशाच्या आधाराने प्रकाशित करावेत, व आपलें विचारवैभव कसें व कोठे प्रकाशित करून, समाज वा राष्ट्रकार्य करण्याची उमेद बाळगावी? १९४८ सालीं ३०० रु. पुस्तक छपाईचें सोडल्यास संस्थेला फक्त ४३॥≈ खर्च आला. शारदाश्रमाच्याहि जमेचे व खर्चाचे बहुशः हेच आकडे आहेत! विदर्भामध्ये वैयक्तिक ग्रंथ-संग्रहालयें फारच थोडीं आहेत. किंबहुना ग्रंथ विकत घ्यावे लागतात (विद्या-लयांना वगैरे नेमले गेलेल्या व्यतिरिक्त) ही कल्पनाच बहुशः अजून जन्मास यावयाची आहे! ग्रंथावर चार पैसे खर्च करण्यापेक्षा एकाद्या साहेबाला ४०० रु. चा खाना देणें लोकांना जास्त सन्मान्यतेचें लक्षण वाटतें! त्याचप्रमाणे वरच्या दर्जाचे ग्रंथ प्रकाशनाच्या मालाहि येथे कमीच आहे. यादृष्टीने 'ओरि-एंटल इंस्टिटयूट' बडोदा ही संस्था फार उल्लेखनीय आहे. प्राच्यविद्या व इतिहास यासंबंधीचे आंतरराष्ट्रीय आदरास पात्र झालेले ग्रंथ या गायकवाड 'ओरिएंटल सेरीज' मध्ये प्रकाशित झालेले आहेत.

म. सं. मं. त जागेच्या अभावीं ग्रंथसंग्रहांतहि विशेष भर पडली नाही. अजूनहि प्रकाशित व हस्तलिखित ग्रंथ संस्थेंत येण्याची वाट पाहात आहेत, पण जागेच्या अभावीं त्यास मज्जाव करावा लागतो. पोत्यांचीं कोठारें भरण्याकरता व गोदामाचा उपयोग करण्याकरता, सीमेंट कॉंक्रीटच्या प्रासादतुल्य गगनचुंबी इमारती सहजासहजीं उठूं शकतात, पण संशोधनासारख्या राष्ट्रकार्याला अद्याप इमारत तर राहोच, पण साधे पर्णकुटीवजा खोपटेंहि मिळूं शकत नाही, हें पाहून जनतेच्या अप्रबुद्धतेची कीव करावी की राग मानावा हें कळेनासे होते!

वरील संस्थेला विदर्भ साहित्यसंघाने जागा देऊं केलेली आहे. विदर्भ साहित्यसंघ व महाराष्ट्र साहित्य परिषद् यांच्या सहकार्याने महाराष्ट्र वाङ्मये-तिहासाची प्रातिनिधिक विशाल संस्था लवकरच अस्तित्वांत येण्याचा संभव आहे. अशा संस्थेकडून, इतर वाङ्मय संशोधन संस्थांच्या अडचणींचा कांहीसा निरास होईल, अशी आशा करावयास जागा आहे.

अशीच दुसरीहि संशोधन विषयक किती तरी कार्ये बहुतेक द्रव्याभावीच मागे पडत आहेतशीं दिसतात. दर्यापूर संमेलनाने मंजूर केलेल्या सहाव्या ठरावाप्रमाणे सुलभ वाङ्मय निर्मितीच्या कार्यासाठी जी समिति नेमली होती तिच्याकडून अजूनहि विशेष कार्य झालेलें दिसत नाही!

आपल्या व इतर महाराष्ट्र भागांत ग्रंथरचनेकरता जीं पारितोषकें ठेवलीं आहेत, त्याला 'भिकार' हा शब्द लावण्याचा मोह आवरत नाही. तीनशे रुपयाचे कमला नारायण बेहेरे प्राइझ व तेवढेच सरस्वतीबाई देशमुख प्राइझ इ. थोडीशीं वगळलीं तर वरील म्हणणे बहुतांशीं सत्यच आहे असें वाटतें. डेक्कन एज्युकेशनसारख्या महाराष्ट्रांत गाजलेल्या ग्रंथपरीक्षणाच्या सोसायटीचीं पारितोषकें क्षुद्र असतात. श्री. पां. श्रा. गोरे यांच्या लोकगीतासारख्या महत्वाच्या ग्रंथाला २१ रु. बक्षीस म्हणजे कांहीच नव्हे! या सोसायटींची बक्षिसांची सरासरी रु. ६० च्या वर जात नाही. या बाबतींत कलिंग पारितोषक लक्षांत घेण्यासारखे आहे.

तसेंच म्हटलें तर यवतमाळसारख्या जिल्ह्यांतच गजांत लक्ष्मी पायाची दासी असलेले शेकडो इसम आहेत. त्यांनी मनांत आणलें तर शेकड्यानेच काय पण हजारांनी देणग्या देणें त्यांच्या हातचा मळ आहे. पण मग 'तिन्हीबाज्या' नाच रंग तमाशे सिनेमे, लग्नकार्यांतील व धार्मिक उत्सवांतील पोकळ डामडौल यांची कशी सोय व्हावी? अध्यक्ष उपाध्यक्ष म्हणून मानाच्या जागा कशा अडवावयास मिळाव्यात? व हारतुरे घालून कसे मिरवावयास साधावें?

राजाश्रय!

भारत सरकारच्या पुराणवस्तुशास्त्राच्या खात्याने पुष्कळशी खणती करून असंख्य पुराणवस्तु अवशेष उजेडांत आणलेले आहेत. 'Bombay State Board of Historical Records and Ancient Monuments' या संस्थेच्या ना. खेर यांचे अध्यक्षतेखाली सभा भरून, प्राचीन घराण्यांतून हस्तलिखितें मिळविण्याकरता एक समिती स्थापन करण्यांत आली आहे. इतर समितीलाहि भारत सरकारचा आश्रय आहे. राजवाडे संशोधन

मंडळास मुंबई सरकार सालीना १५०० रुपयाची ग्रँट देते. इंडियन हिस्टॉरिकल रेकार्डस् कमिशनने आजकाल प्रादेशिक शोधमंडळें अस्तित्वांत आणलेलीं आहेत. निरनिराळ्या भागांतील वजनदार अशा ३७ सभासदांचें हें शोधमंडळ आहे. ही योजना मध्यवर्ती सरकारची असून दरवर्षी ७०० रु. खर्च म्हणून द्यावयाचें ठरलें आहे. मध्यप्रांत-वऱ्हाड यांत मराठी मध्यप्रांत, हिंदी मध्यप्रांत व वऱ्हाड असे तीन विभाग करून, त्या विभागांत कार्य करण्याकरता पोटमंडळें निर्माण केलेलीं आहेत.

मध्यप्रदेश सरकारने विदर्भ साहित्य संघाला प्रशस्त जागा दिली; येवढेच नव्हे तर, वार्षिक पांच हजाराची देणगीहि दिली. नागपूर युनिव्हर्सिटी हिस्टॉरिकल सोसायटीला मध्यप्रदेश सरकार ग्रँट देते. १९४९-५० सालाकरता मध्यप्रांत सरकारने तीनशे रुपयाची ग्रँट दिली. वरील आश्रयाबद्दल अर्थातच भारत व राज्य सरकारें अभिनंदनास पात्र आहेत. वरीलप्रमाणे सरकारी साह्य मिळत असलें तरी तें फार तोकडें आहे, असें मोठ्या खेदाने म्हणावेसें वाटतें.

मध्यवर्ती व प्रांतिक सरकारें आजकाल जनहिताकरता कोटींनी मोजता येण्यासारख्या प्रचंड विकास योजना हातीं घेत आहेत. तें जरूरीचे आहे यांत शंका नाही. पण साहित्य-संशोधनाच्या बाबतींतहि त्याचप्रमाणे जास्त प्रमाणावर खर्च करणें जरूरीचें आहे. राष्ट्राच्या पोटापाण्याच्या समस्या महत्वाच्या तर खऱ्याच; पण राष्ट्राच्या मानसिक विकासाचा प्रश्न एका दृष्टीने त्यापेक्षाहि महत्वाचा आहे, हें कोणासहि सांगणें नकोच. संशोधन, इतिहास, भाषा, संस्कृति, साहित्य इत्यादि राष्ट्राचे केवळ पंचप्राण आहेत व म्हणूनच संशोधनासंबंधी वगैरे या प्रकरणांत एवढा प्रपंच केलेला आहे.

आतापर्यंत परकीयांच्या शृंखलांत देश असल्यामुळे, त्यांनी या व शैक्षणिक बाबींकडे जाणूनबुजून दुर्लक्ष्य केलें. गुलामांची बौद्धिक वाढ होऊं देण्यांत परकीय सत्तेचा नाश असतो, हें ती सत्ता जाणून असते. पण आता स्वतःचें राज्य झाल्यानंतर अशा बाबतींत लगाम घालणें इष्ट होणार नाही.

ठिकठिकाणच्या साहित्य-संशोधन संस्थांचीं प्रतिवृत्तें पाहतां त्या त्या संस्थांना आश्रयाचा हात मिळण्याची अत्यंत जरुरी आहे असें दिसतें.

अखिल भारतीय इतिहास परिषद्, नाणक परिषद्, वस्तुसंग्रहालय परिषद् यांना भारत सरकारचा आश्रय मुळीच नाही. आपल्या कार्याकरिता त्यांना सभासदांच्या वर्गणीवरच अवलंबून राहावें लागतें. त्यामुळे या संस्थांना कार्य करणें फार जड जाऊन राहिलेलें आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेसारख्या संस्थेला मुंबई सरकारकडून अजून जागा मिळालेली नाही. 'सरकारजवळ जागा व चालू खर्चाच्या देणग्याची तीन वेळ खटपट केली, पण निष्फळ झाली' असें मध्यप्रांत संशोधन मंडळाचे कार्यवाह म्हणतात. नागपूर यु. हिस्टॉरिकल सोसायटीचे या बाबतींत खालीलप्रमाणे म्हणणें आहे. या संस्थेला पहिल्याप्रथम ८०० रु. सरकारी ग्रँट होती. त्यानंतर ती ५०० करण्यांत आली व १९४८ ते ४९ सालीं ३०० रुपये देण्यांत आली. * " The financial position of the society cannot be called encouraging. It is much due ( to the ganeral apathy of the intelligent public as ) to the indifference of the Government. " असे डॉ. सिन्हा यांनी उद्गार काढलेले आहेत.

इतरत्र दुसरीकडील कांही साहित्यविषयक संस्था घेतल्या तरी, त्यांनी सरकारी आश्रयाची मागणी केलेली दिसते. उदाहरणार्थ कलकत्याची राममोहन रॉय लायब्ररी ही एक सांस्कृतिक व उत्कृष्टपैकी संस्था आहे. तींत पुस्तकांचा अमोल साठा आहे. ×"The Govt. has not been doing its duty by it. Its gift of books worth Rs. 1300 is not enough; neither the corporation's Rs. 500 are enough The grant should be considerable and continuous. !! " अशी या संस्थेची मागणी आहे. सुलभ साहित्यनिर्मितीकरता वि. सा. संघाने सरकारकडे ग्रँटकरता अर्ज केला होता. त्याचें काय झालें हें कळलें नाही. तसेंच मध्यप्रदेश सरकारचें लक्ष संशोधन सामग्रीच्या दृष्टीने समृद्ध असलेल्या कांही विभागाकडे फारसें वळलेलें दिसत नाही. उदाहरणार्थ गोंडवन हा बहुतेक सर्वच विभाग असल्या सामग्रींनी संपन्न आहे. त्याकडे लक्ष पोहोचवावयास पाहिजे.

* Annual Bulletin of the Nagpur University Historical Society Octo. 1950.

× Modern Review July, 1952

संस्थांप्रमाणेच वैयक्तिक संशोधकांनाहि म्हणावें तसें साह्य करण्याचा परिपाठ दिसत नाहीं. ज्यांनी अंतःस्फूर्तीने आपल्या सर्वस्वाचा त्याग करून, आयुष्याचा प्रत्येक क्षण या पवित्र कार्याकरता वेचला, त्यांचा योगक्षेम कसा चालला आहे, याची सरकार, स्थानिक सरकार व जनता कितीशी दखल घेत आहत? विश्वविद्यालयाचें शिक्षण न घेतलेले कांही हाताच्या बोटावर मोजण्याइतके असामान्य विद्वान या प्रांतांतहि व इतरत्र आहेत. वरील वर्णन केलेले महाभागच आपापलीं जीवितें राष्ट्राला वाहून, त्या त्या प्रांताचा कीर्तीसुगंध दिगंत दरवळीत असतात ना? समाजाला व राष्ट्राला नवें सामर्थ्य देण्याचें तेच कार्य करीत असतात. साहित्यसाधनेच्या तपश्चर्येत त्यांना श्रीचें आराधन करण्यास वेळ कसा मिळावा? दोन्ही गोष्टी साधण्याच्या भरांत एकहि साधणें सहसा शक्य होत नाही. अशांना सरकारने, व जनतेने, त्यांचें कार्य करण्याकरता मनःस्वास्थ्य लाभावें म्हणून, सन्मान्य पदव्या व वर्षासनें देऊन गौरवावयास नको काय? विद्वत्तेचा गौरव राज्यकर्ते करणार नाहीत तर कोण करतील?

उ० या बाबतींत भारत इतिहास संशोधक मंडळामधील श्री. खरे यांच्यासारख्या सव्यसाची संशोधकाला मानाची पदवी देऊन गौरविणें, किंवा त्यांच्या कार्याकरता भरपूर वर्षासन देणें अगदी औचित्यपूर्णच नव्हे, तर अत्यंत जरूरीचेंहि आहे. आपल्या इकडेहि डॉ. दप्तरीसारख्यांना एकादें चांगलेसें वर्षासन देण्याकरता नव्हे तर त्यांचे समग्र ग्रंथाचे प्रकाशनार्थ साह्य करण्याकरता सरकारला एवढे जड कां जावें? मध्यंतरी येथील वकील श्री. ना. झु. नंदुरकर यांनी भाऊजींचे समग्र ग्रंथ जनतेकडून साह्य मिळवून प्रकाशित करण्याचा उपक्रम केला आहे. पण हें कार्य एका व्यक्तीस झेपण्यासारखे नाही.

ज्याप्रमाणे संस्थांचीं पुस्तकप्रकाशनें, अदाह्य इमारती, वस्तुसंग्रह अभ्यागताश्रम, सभागृहें, ग्रंथशाला, पुराणवस्तु संग्रहाधिकारी, (curator) ग्रंथसूची, प्रवास खर्च, पगारी नौकरचाकर इत्यादि गरजा असतात, त्याचप्रमाणे वैयक्तिक संशोधकाच्याहि संदर्भ ग्रंथ, प्रवास इत्यादि गरजा असतात. त्या बरोबर न भागल्यास त्याला आपलें कार्य पुढे चालविणेंच अशक्य होतें व त्याची बुद्धिमत्ता व्यर्थ जाते. व्यक्तिशः संदर्भ ग्रंथ विकत घेणें, किंवा स्वतःच्या ग्रंथाचें प्रकाशन करणें किती संशोधकांस शक्य आहे?

डेक्कन एज्युकेशन सोसायटीने इंग्रजीमध्ये, होम लायब्ररीचे जसे ग्रंथ प्रकाशित होतात, असे ग्रंथ कोणी लिहिल्यास, त्याला चारशे रु. पर्यंत मदत देण्याचें ठरविलें होतें. वसतीगृहाची सोय पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळात आहे. अभ्यासगृह व वसतीगृहाची वेगळी सोय, कलकत्त्याच्या नॅशनल लायब्ररींत, धुळ्याच्या समर्थ वाग्देवता मंदिरांत, नागरी प्रचारिणी सभेंत व राजवाडे संशोधन मंडळात केली आहे. शारदाश्रमांत मात्र असली सोय कांहींच नाही. पान ४३ वरील बाहेरगावच्या स्कॉलर्सना संस्थेंत अभ्यास करण्याची सोय केली आहे, हें विधान मर्यादित अर्थानेच घ्यावयाचें आहे. फक्त कागदपत्र गोळा केलेले आहेत पण त्याची अजून म्हणण्यासारखी वर्गवारी वगैरे काही झालेली नाही. इमारतीची व कपाटांची वगैरे अडचण आहे.

सत्कार्योत्तेजक सभेने – वाग्देवतामंदिर धुळे – आपल्या संग्रहाच्या अत्यंत व्यापक व चिरंतन उपयोगाच्या अशा पद्धतशीर सूचींचे दोन ११०० पृष्ठांचे ग्रंथ प्रकाशित केलेले आहेत. रामदासांच्या वाङमयाबरोबरच महाराष्ट्रास अज्ञात असलेले ५०० कवी या संग्रहांत सापडतील. तसेच प्रत्येक हस्तलिखिताच्या महत्वाचें थोडक्यांत वर्णन व त्यांतील महत्वाचे उतारे दिलेले असल्यामुळे त्या सूच्या केवळ जंत्रीवजा न वाटतां मनोरंजक व उपयुक्त वाटतात.

## दमदार संशोधकांची आघाडी !

सरकारला आर्जवून नम्र विनंतिवजा सूचना करावीशी वाटते ती ही की, डॉ. दप्तरी, श्री. ग. ह. खरे यांच्यासारखे जे खरेखुरे (Genuine) संशोधक असतील, त्यांच्या परिस्थितीची योग्य चौकशी करून, त्यांना वर्षासनाच्यारूपाने व त्यांच्या कार्यांकरताहि भरपूर सहाय्य द्यावें. त्याचप्रमाणे महाराष्ट्रांत ज्या थोड्या संशोधन संस्था आहेत त्यांना जेवढें पाहिजे तेवढें साह्य द्यावें. जुने संशोधक वैयक्तिकरीत्या तर आपलें कार्य करूनच राहिले आहेत. परंतु प्रांतांत संशोधनाची अखंड परंपरा जीवंत ठेवण्याकरता, जिज्ञासु व उमेदीच्या दमदार तरुणांची एक आघाडी निर्माण करावयास पाहिजे. व तिचा योगक्षेम चालवून, तिला संशोधन कार्यार्थच केवळ वाहून घेण्यासारखी सरकारनें आर्थिक परिस्थिती निर्माण करावयास

हवी. त्याचप्रमाणे विदर्भ साहित्यसंघाने केलेल्या एका ठरावाप्रमाणे म्हणजे नवीन गॅझेटिअरें तयार करण्याकडे सरकार लक्ष पुरवील अशी आशा आहे. आता प्रत्येक जिल्ह्याचीं गॅझेटियरें फार जुनीं झालेलीं आहेत व नवीन नवीन माहिती उपलब्ध होत आहे.

### स्थानिक स्वराज्यसंस्था

'So local bodies like municipalities etc. aught to give their material support to such institutions. They would be failing in their duty if they do not give them strong support' या डॉ. केतकरांच्या उद्गारावरून केवळ जनतेनेच नव्हे तर स्थानिक संस्थानींहि संशोधनसंस्थास मदत करणें त्यांचें, कर्तव्य आहे हें दिसून येतें. मध्यप्रांत संशोधन मंडळाने जागा मिळविण्याकरता स्थानिक संस्थाकडे अर्ज केले होते; पण त्यातून कांही निष्पन्न झालें नाही असें दिसतें. स्थानिक संस्थांना हें आपलें कर्तव्य आहे असें वाटत नाही, हें दुर्दैव आहे.

### संशोधनाचा गोवर्धन !

ज्यांना संशोधनाचें महत्व पटलें आहे अशा सुबुद्ध, सुशिक्षित व वजनदार लोकांनी या बाबतींत लोकजागृति करण्याचें व्रत स्वीकारलें पाहिजें व गत इतिहासाचें महत्व उद्योन्मुख राष्ट्रास किती आहे, हें जनतेच्या विशेषतः धनिक वर्गाच्या गळीं उतरविलें पाहिजें ज्यांची संपत्ती वाममार्गाने जात आहे तिच्या थोड्याशा तरी भागाचा ओघ या सत्कार्याकडे वळविला पाहिजे. प्रत्येक शहरांत समिती स्थापन होऊन तिचेमार्फत सुविद्य लोकांकडून संशोधनाकरिता निधी जमविण्याचें प्रचारकार्य फार मोठ्या प्रमाणावर झालें पाहिजें. संशोधकाला लागणाऱ्या बौद्धिक व शारिरिक कष्टापेक्षा हें खचित् कमी श्रमाचे आहे. सरकारने संशोधनकार्याचा गोवर्धन, प्रादेशिक शोधमंडळाच्या अंगुलीने जरी उचलून धरलेला असला तरी तो एवढा जगड्व्याळ आहे की, जनतेनेहि 'घेऊं पाँशेरी' वृत्तीचा त्याग करून, आपापल्या मदतीच्या काठ्या त्याला टेकविल्या पाहिजेत !! असे वजनदार लोक शोधमंडळांना साह्य करतील अशी सरकारचीहि अपेक्षा आहे. आमच्या पूर्वजांनी कमावलेल्या प्राचीन वैचारिक धनाचे आम्हीच मिरासदार आहोंत ना ? मग त्याचें

संरक्षण व संवर्धन आमच्यावाचून कोण आणि काय म्हणून करतील? राजकारण, समाजकारण इ. ची जबाबदारी जशी प्रत्येक राष्ट्रावर आहे तशीच साहित्य, इतिहास, भाषा, काव्य, संस्कृति, संशोधन इत्यादिकांचीहि आहे. ज्याप्रमाणे ती सरकारवर आहे त्याचप्रमाणे ती जनतेवरहि आहे.

विश्वविद्यापीठेंहि या जबाबदारींतून सुटत नाहीत! मध्यप्रांत सं. मंडळाने १९४८ सालीं २०० रु. ची नागपूर विद्यापीठास मागणी केली होती पण १०० रु. च मिळाले. असें कां? नंतर ४०० रु. मागणी करण्याचा विचार झाला. जनता, सरकार, विद्यापीठें, विदर्भ साहित्य संघ इत्यादिकांनी कांही अटीवर, उच्चदर्जाच्या ग्रंथांना प्रकाशनास मदत केल्यास व आहेत यापेक्षा जास्त विलोभनीय पारितोषकें ठेवल्यास संशोधनकार्यास नवजात अंकुर फुटल्याशिवाय राहणार नाहीत! कित्येक ग्रंथकाराजवळ कित्येक चांगले ग्रंथ धूळखात पडलेले आहेत. या करता प्रत्येकी एक मोठा स्थायी निधि उभारल्यास, त्याच्या व्याजांतूनहि वरील कार्य करतां येणें शक्य आहे. विदर्भ साहित्य संघाने विदर्भ साहित्यमंदिर उभारण्याकरतां घराघरांतून फक्त एक रुपयाची मागणी केलेली आहे, तेवढीहि प्रत्येक मनुष्य देणार नाही, तर त्याची कमालच म्हटली पाहिजे!

गुप्त पोलिस बहाद्दर!!

हिमालयाच्या हिमविवरांत ठिकठिकाणीं लुप्तप्राय झालेल्या गंगेच्या प्रवाहाप्रमाणे कालाचलाच्या तमविवरांत (Dark periods) गुप्त होऊन, मधूनमधून खंडित झालेल्या इतिहास-तरंगिणीचा शोध घेतांना, संशोधक, भगिरथास कशी सत्वपरीक्षा द्यावी लागते, हें जावे त्याच्या वंशा तेव्हा कळे!

प्रत्येक संशोधक पहिल्याने सुरवात बहुशः देशमुख-देशपांडे, शास्त्री—काजी घराण्यांतील एकादी पोथी मिळविण्यापासून करतो. उन्हातान्हांतून पोथ्यांच्या पडशीचें ओझें, पाठीवर घेऊन फिरणारे, प्रवासांत चण्याकुरमुऱ्यावर भूक भागविणारे, एकादे वेळी अंधारांत चांचपडणारे, व ज्याचें घरीं पोथ्यांचें बाड मिळण्यासारखें आहे, त्यांच्या घरीं रात्रौ मुक्काम ठोकून पथारी पसरणारेहि कांही संशोधक दिसतात. ज्यांचें मुखावलोकनहि करूं नये अशा सद्‌गृहस्थांना (!), तेलातुपाने मळलेल्या एकाद्या फाटक्या तुटक्या कागदाबद्दल

अर्जीजीने मागणी करावी लागते ! तेलाचा उकिरड्यावर फेकून देण्याच्या लायकीचा तुकडा तो काय, आणि तेवढ्याकरता इतकी मिनता तरी कशाला, याचें त्या गृहस्थास कोडे पडून, 'डोक्याचा रक्त' ढिला असलेला व कीव करण्यास योग्य, असा एक इसम आपल्यासमोर उभा आहे अशी त्याची कल्पना होते. युगानुयुगें गदळींत पडून राहिलेल्या कागदाची एवढी विचारपूस चाललेली आहे, हें पाहून त्याचा भाव एकदम चढत जातो. मुलाच्या बापाचा वेताळ त्या गृहस्थाच्या डोक्यांत शिरून, आपण कोणीतरी महनीय व्यक्ति आहोंत असा त्यास भास होतो. तो फाटक्या सतरंजीवर बसला असल्यास, आपला पवित्रा बदलून, राजशाही थाटांत आपल्या मळक्याच्च का होईना, लोडाशीं रेलून बसतो. व सवदेबाजी करावयास सुरवात होते. बरोबरचा 'मध्यस्ति' जसजसा त्याची मनधरणी करतो तसतसा त्याच्या किंमतीचा पारा चढत जातो. कित्येक वेळेला उपस्थित इसम 'गुप्त पोलिसबहादूर' तर नसलेना, या *संशयित वृत्तीने तो त्याचेकडे पाहावयास लागून त्याची ब्याद तेथून लवकर कशी काढतां येईल या विवंचनेंत पडतो. कित्येक वेळीं या कागदाचा कांही तरी गैरफायदा संशोधक घेईल अशी त्यास शंका वाटते. कांही वेळीं त्याचे मिस्किल हासणें तर सहन करावेंच लागतें, पण मुकाट्याने शिव्याहि खाव्या लागतात. इतकें असूनहि कागद सुतराम् हस्तगत होतोच असें नाही ! कित्येक देवळांत व विषेशतः जत्रांत, इतर लोक सामान घेण्यांत वगैरे गुंतले असतां देवळावर कोरलेल्या अक्षरांकडे तासन् तास पाहात असलेल्या 'इसमाला' ते मूर्खांतहि काढल्याशिवाय राहात नाहीत !

* The first difficulty with which the committees will be confronted is the general ignorance about the value of the records and a certain amount of suspicion on the part of the owner.........where as one may yield to official persuation another may react very differently......... Every effort should be made to inspire public confidence. It will defeat its own purpose, if the committee is suspected to be an official organisation. General instructions fo rthe guidance of the Regional Survey Committees (Issued by the Government.)

संशोधन करण्याच्या बाबतींत कित्येक वेळीं कशा गमती घडून येतात, याविषयीची श्री. द. बा. महाजन यांनी सांगितलेली एक आठवण उधृत करण्यासारखी आहे. डॉ. देशपांडे व त्यांना स्वतः पातूरच्या एका देवळावरील शिलालेखाचा छाप घ्यावयाचा होता. शिलालेख देवळाच्या कळसाच्या भागीं असल्यामुळे, त्यांना एक शिडी घ्यावी लागली. ती उभी नेणें कठीण असल्यामुळे चार मंडळींनी आडवी धरली होती. छापाकरता लागणारे कागद व इतर साहित्य त्या शिडीला एका कापडाने बांधलेलें होतें. शिलालेख तारांच्या ब्रशाने धुण्याकरता म्हणून, एक माणूस मडक्यांत पाणी घेऊन त्या शिडीपुढे चालला होता. शिडीमागून गावांतील पांचसात मंडळी व त्यांच्या मागून श्री. महाजन व डोक्याला उपरणे बांधलेले डॉ. देशपांडे (ती उन्हाळ्याची दुपारची ११-११॥ वाजण्याची वेळ असल्यामुळे) चालले होते. तें दृष्य पाहून गावांतील लोक कुजबुजूं लागले. "आज कोण मेला रे आपल्या गावीं ?" कांहींनी प्रश्न केला, "अरे आगटे तर नाही दिसत ?" दुसरा म्हणतो, "नव्या जमान्यांत आगटे-फागटे काह्यले पाहिजे रे ? खिशांतच असलं कोणाच्यातरी आगडबी !" त्यावर एक म्हणतो "काल जी बाहेर गावाहून मंडळी आली, त्यापैकी झाला असल एकादा लंबाऽऽ !!"

इतर ठिकाणीं पुरुषांशीं गाठ असल्यामुळे कागदपत्र, लोकगीतें, कहाण्या वगैरे मिळविणें कांही तरी सोपें जातें; पण बायांकडून जुनीं गाणीं, लोककथा वगैरे मिळवावयाच्या म्हणजे एकादे वेळीं जिवाशींच गाठ ! माझा एक देशमुख मित्र लोकगीतें गोळा करण्याकरतां त्याच्या स्वत.च्या गावीं गेला होता. तेथे एक हरिजन थोडे दिवसांपूर्वी आला होता. व त्याची देशमुखाशीं ओळख नव्हती. त्यावेळी तो हरिजन कोठे बाहेर कामाला गेला होता. त्याच्या बायकोजवळ देशमुखांनी गाणीं मागितलीं. ती गाण्याच्या ओळी सांगूं लागली.

**"शेजीचा भ्रतार–लसणाची कळी**
**पराया नारीसाठी–नेते खिशामंदी चोळी**
**शेजीच्या भरताराले भ्रतार–म्हनूं नये**
**पेटारीं नाग आहे !!"**

तितक्यात तिचा नवरा आला व तिला म्हणाला, " तिऱ्हाइताजवळ माझी बद्दी करत ?" व तो आमच्या मित्राच्या रोखाने चालून गेला. पुढे गावकऱ्यांनी मोठ्या मुष्कीलीने त्या हरिजनाची समजूत घातली !

शारदाश्रमांतील कागदपत्र जमविण्यास अशीच कांही वेळी कटकट झाली. कांही पोथ्यांच्या बाबतींत महानुभावीय विद्वानांस त्या दाखविल्या असतां, त्यांनी माहिती देण्याचें साफ टाळलें. पुढे कांही महंतांनी कांही माहीती पुरविली, त्याबद्दल पंथांतील कित्येक लोक त्यांना दोष देत असत. महानुभावियांचें वाङ्मय गुप्त लीपींत असल्यामुळे, व कोणाला तें दाखविण्याची त्यांची तयारी नसल्यामुळे, संशोधकांना पोथ्या हस्तगत करावयाला किती जड गेले असेल, याची कल्पना होते. सरकारी अधिकारी वगैरे बरोबर असले, किंवा त्यांनी कळविल्यास, कांही ठिकाणीं कागदपत्रें मिळून शिवाय विशेष आदरातिथ्याचाहि अनुभव येतो. बाळापूरचे नक्षबंदी जहागीरदाराजवळ असलेला तीन चारशे वर्षांचा जुना अरबी फारशी हस्तलिखित ग्रंथसंग्रह असाच पाहाण्यास मिळाला.

प्रो. रद्दी !!

कागदपत्रांचीं साधारण जनतेला कांहीच किंमत नसल्यामुळे, त्यांचें येळकोटमल्हार कित्येक वेळेला अस्ताव्यस्त पसरलेलें असतें ! कित्येक पोथ्यांचीं पानें भेगा पडलेल्या मडक्यास लुकण म्हणून लावण्यांत आलेलीं दिसतात, तर कित्येकांचा घरगुती साफसफाईकडे उपयोग करण्यांत येतो. श्री. शंकर श्रीकृष्ण देव हे खेदपूर्वक म्हणतात, 'मी पन्नास वर्षें आगोदर जन्माला यावयास पाहिजे होतों. या पन्नास वर्षांच्या अवधींत पोथ्यापुस्तकांची व कागदपत्रांची फार नासधूस झाली. जो संग्रह मिळविला तो मठामठांत उरलेल्या पुस्तकांचा केर होता. आजहि हा नुसता केर लक्षावधी रुपयांचा आहे.'

मध्यप्रांत संशोधन मंडळाचे माजी चिटणीस श्री. शं. गो. चट्टे हे एक मोठे निष्ठावंत व नेटके संशोधक आहेत. त्यांनी जुन्या बाजारांतून महत्वाच्या ग्रंथाचा व जुन्या दुर्मिळ अशा आवृत्तींचा संग्रह केलेला आहे. संशोधन सामग्रीचा शोध करून एकत्र जुळविण्याचें त्यांचें कार्य अविरत चाललेलें

असतें. सरासरी पंचेवीस अरबी फारशी ग्रंथ वाण्याच्या दुकानांतून रद्दी म्हणून आलेले, त्यांनी मिळविले आहेत. गुजराथी मासिकाच्या एका संशोधन अंकांत, "एका संशोधकाला रस्त्यावर, चार दोन आण्याने नेहमी महाग अशी रद्दी विकत घेतांना पाहून, खुद्द रद्दीवाला विस्मयचकित होई आणि त्याच्या भोवती लोक व पोरें जमून त्याच्यामागे लागत. त्याचें नांव त्यांनी 'प्रो. रद्दी!' असेंच पाडलें होतें," अशा तऱ्हेचें विनोदी वर्णन आलं होतें. रद्दींतील रत्नांचें गूढ सहजासहजी कळणें त्यांच्या बुद्धीबाहेरचें होतें. श्री. समर्थांच्या स्वहस्तें लिहिलेला वाल्मिकीरामायण हा ग्रंथ वाटणींत निरनिराळ्या मठांत गेलेला होता व निम्मा ग्रंथ भिजलेल्या गबाळ्यांत पडलेला होता. तो मिळविण्यास श्री. शंकरराव देव यास किती सायास पडले असतील याची कल्पना येते. त्याचप्रमाणे श्री. दे. गो. लांडगे (सध्याचे चिटणीस म. सं. मं) यांनी नागपूरच्या इतिहासाकरता सुमारे दीडशे लोकांना भेटून माहिती काढण्याचा प्रयत्न केला. भोसले घराण्याकडून कांहीच मदत झाली नाही! व जुन्या घराण्याकडूनहि म्हणावी तशी माहिती मिळाली नांही!

नहि वंध्या विजानाति!

घरीं वापरण्याकरता कोणी पोथी न दिल्यास संशोधकाला ती हाताने उतरवून घ्यावी लागते किंवा तिच्या महत्वाच्या भागाचा, प्रकाशलेख (फोटो) किंवा शक्य व जरूर असल्यास मायक्रोफिल्म घ्यावी लागते. अक्षर वटिका कोणत्या शतकांतील आहे तें बघावें लागतें. त्या पोथीचें नांव, प्रकाशित की अप्रकाशित, मिळविण्याचें स्थान, ग्रंथकर्त्याचें नांव, त्याची जन्मतारीख, पाहून निरनिराळीं हस्तलिखितें असल्यास कोणतें ग्राह्य अग्राह्य हें ठरवावें लागतें व नंतर शुद्धपाठ तयार करावे लागतात. पाठ ठरविताना जो जास्त कठीण पाठ आहे तो इतर पुरावा जमेस धरून नक्की केला पाहिजे. याला शास्त्रीय भाषेंत कठिणतर पाठ (Lectis difficilor) म्हणतात. पोथींत मागाहून लिहिलेल्या प्रक्षिप्त भागांत सोपे पाठ वापरण्याकडे कल असतो. पोथीचा कर्ता कोण यावरच कित्येक वेळा रणें माजतात! पाठाशिवाय वरील सर्व माहिती रजिष्टरांत नमूद करावी लागते. त्यानंतर दुर्ज्ञेय शब्दांचें स्पष्टीकरण, दुर्बोध कल्पनांचें विशदीकरण करणें, पोथीमध्ये कांही स्थळांची

माहिती आल्यास तीं तीं गावें त्या त्या गावच्या लोकांकडून पडताळून घेणें, म्हणजे संशोधनाचें चक्र साधारणतः पुरें होतें. कित्येक वेळेला पोथी गुप्त लिपींत असल्यास, मग संशोधकाला तिचा उलगडा करण्याकरता उपयोगी पडणारी किल्ली शोधावी लागते. किल्ली मिळाल्यास, ती प्रत्येक ओळीला लावतांना डोळेफोड व डोकेफोड करणें भाग पडते ! व त्यानंतर संशोधनाचें फल सुसंबद्धतेने मांडतांना उरस्फोडहि करावी लागते !! त्यानंतर रात्रीचा दिवस करून 'प्रेसकॉपी' तयार करणें, जवळ पैसा नाही; तेव्हा 'फंड' उभारण्याची चिंता वाहणें. साधा अर्जनवीसहि १-२ पानें खरडलीं तर दोन रु० सहज घेतो. येथे पानेंच्या पानें वर्षानुवर्षे खरडलीं तरी दमडीचाहि नफा मिळणें दुरापास्त होते. वासुदेवशास्त्री खरे याच्या दुय्यम तिय्यम प्रतीच्याहि नाटकांना तीन तीन हजार रुपये नाटक कंपनीकडून मिळाले आहेत. पण त्यांच्या संशोधन विषयक लेखांपासून त्यांना एक कपर्दिकाहि मिळाली नाही ! सिनेमाकरता गोष्ट लिहली तर शेंपांचशे रुपये सहज टपकतात. कादंबरी वगैरे सारख्या ललित लेखनाला पैसे मिळतात. संशोधकास ग्रंथप्रकाशनाकरता स्वतःची पदरमोड करावी लागते. साधारण वाचक संशोधन ग्रंथाकडे ढुंकून पाहण्यासहि तयार नसतो. तेव्हा ग्रंथ छापून आल्यावर, त्याचे गठ्ठे जन्मभर धूळ खात घरीं पोसून ठेवावे लागतात. व त्यांतकी कांही सप्रेम भेट म्हणून, स्वतःचें पोस्टेज खर्चून मित्रमंडळीकडे, किंवा टीकाकार, मासिकें यांच्याकडे, घरपोच रवाना करावे लागतात. सारांश 'ग्रंथ लिहिणें=पश्चात्ताप करणें' ही मराठींतील म्हण सार्थ करावी लागते ! ललीत मासिकें भराभर खपतात. संशोधनविषयक मासिक बहुतेक लवकरच मृत्यूमुखीं पडतें. एकाद्या साधारण प्रतीच्या लेखकांचेहि नांव लोकासमोर राहतें. संशोधकाचें भाग्य तेवढेहि नसतें !! सारांश 'कर्मण्येवाधिकारस्ते' या सिद्धांताचा अनुभव संशोधनकार्याइतका अन्यत्र येणें अशक्य आहे !

महाराष्ट्राच्या एकच अत्यंत श्रेष्ठ अशा संशोधकाचें जीवन पाहिलें म्हणजे महाराष्ट्रास संशोधक व संशोधन या विषयी किती आस्था आहे हें दिसेल. ते म्हणजे पुण्याच्या भारत इतिहास संशोधन मंडळांतील श्री ग. ह. खरे हे होत. त्यांना कै. दत्तोपंत आपटे यांनी शिवचरित्र कार्यालयांत रुपये पंचेचाळीसवर

कामावर ठेऊन घेतलें होते. १९३० पासून भा. इ. सं. मंडळाने त्यांना रु. ५० देणें सुरू केलें. अठरा वर्षे सेवेंत घालविल्यानंतर त्यांना मंडळाकडून महागाई सकट ८५ रु. मिळूं लागले. त्यांनी अर्वाचीन इतिहास, कथा पुराण व संशोधन, नाणकशास्त्र, मध्ययुगीन इतिहास, मूर्तिविज्ञान, वाङ्मय व भाषाशास्त्र इ. वर १९४८ पावेतो एकंदर २८ ग्रंथ व १८९ लेख लिहिलेले आहेत. यावरून त्यांच्या प्रचंड कर्तृत्वाची कल्पना येईल. मंडळ त्यांच्यासारख्या संशोधन-रत्नाला ८५ रु. पेक्षा अधिक देऊं शकत नाही. इतर कांही लठ्ठ पगार घेणारे व कांहीच काम न करणारे लोक तर, इतकेहि पैसे खर्चाकरता खर्च करणें म्हणजे उधळपट्टी होय, अशी कुरकुर करतात !! सारांश संशोधकाचें जीवन एवढे खडतर आहे. इतकेंच नव्हे तर एकादा संशोधक, संशोधनाच्या अफाट सागरांतून वजनाच्या भारंभार सोन्याची किंमत असलेला एकादा दक्षिणावर्ती शंख सापडेल या आशेने स्वतःच्या घरादारावर तुळशीपत्र ठेवतो ! या जिकीरीच्या कार्याची कल्पना इतरेजनास कशी येणार ? 'नहि वंध्या विजानाति गुर्वी प्रसववेदनाम्' हेंच खरें !!

## दृष्ट्वा तु पांडवानीकम् !

इतिहासलेखकाला आधाराशिवाय व पुराव्याशिवाय पुढे पाऊल टाकतां येत नाही ! * 'दृष्ट्वा तु पांडवानीकम्' सारखे पुरावे दिल्यास तो हास्यास्पद होतो; शिवाय चावडीवर बसून पिकाची केवळ 'हनुमान पहाणी' केल्याने भागत नाही ! मूळांत जाऊन सत्य शोधावें लागतें. सत्य अशा घटना यथातथ्यतेने वर्णन केल्या तर कित्येक वेळेला जनतेंत व जातींत असंतोष माजतो; सत्य लपवून ठेवावें तर पक्षपातीपणाचें पाप पदरांत पडतें ! उ० रजपुतांचा भारतीय इतिहासांत आठव्या नवव्या शतकानंतर उल्लेख येतो. त्यामुळे ते शक, हूण लोकाप्रमाणे आर्यवंशी नसावे असे कांही संशोधकांचें मत

* एक निकम या आडनांवाचा मराठा होता. तो म्हणत असे की, 'पांडव आमच्या कुळांत होऊन गेले. याला प्रत्यक्ष गीतेंत पुरावा आहे' कोणता ? असा प्रश्न केला असतां, मशारनिल्हे राजश्रींने "दृष्ट्वा तु पांडवानीकम् !" हा आधार सांगितला !!

आहे. त्याचप्रमाणे 'The Marathas were always anxious to trace their decent from the Rajputs' A statement of Shivaji "We are Rajputs." (Oturkar) असें कांही संशोधक मानतात. या घटना पुढे आल्यास रजपुतांतच नव्हे तर मराठ्यांतहि असंतोष माजण्याचा संभव आहे. राजवाड्यांनी प्राचीन नैतिक जीवन (म्हणजे आजकालच्या दृष्टीने निखालस अनैतिक) आपल्या लेखांत दाखविल्यामुळे ते असंतोषास पात्र झाले होते. कांहीहि असले तरी संशोधकाचा 'सत्यान्वेषण' हा शिरोधार्य गुण होय यांत शंका नाही. * "To the alter of truth must be sacrificed our passions and preconceived notions as well as one's bias whether it is personal, provincial or racial, communal or national.............. Truth certainly demands an amount of boldness from the votaries in the field of historical research...... " हें विधान सर्वथैव खरें आहे.

सत्याकरता काय मोल द्यावें लागतें याचें डॉ. केतकरांचें अत्यंत स्मरणीय उदाहरण आहे. प्राचीन महाराष्ट्राचा पहिला भाग प्रकाशित करण्यापूर्वी त्यांनी आदिपर्व म्हणून पांचशे पानांचा ग्रंथ प्रकाशित केला होता. पण कांही कालाने नवीन माहिती उजेडांत आल्यामुळे, केलेल्या खर्चाची तमा न बाळगतां त्यांनी तो सर्व खंड जाळून टाकला! कोणाला दुखविणें संशोधन कार्यांत क्रमप्राप्त असलें तरी, तें कार्य समाजाच्या पोटांत सुरी खुपसण्यासारखे नसून अर्थातच शस्त्रवैद्याच्या क्रियेसारखे अंतिम हितकारक समजलें पाहिजें! गुळगुळीतपणा (मृदुता) हा गुण खरा; पण नाण्याच्या बाबतींत तो दोषच होतो; संशोधकाला खणखणीत स्पष्टवक्तेपणाची गरज आहे! एवढे कष्ट व कटुता संशोधनांत असली तरी त्यापासून मिळणारा आनंदहि अनुपम असतो. "प्राचीन तत्वज्ञांनी सृष्टींतील परम तत्वांचें वर्णन सत् चित् आनंद असें केलेलें आहे. संशोधनाने सत्याचें म्हणजे परमतत्वाच्या स्वरूपाचें ज्ञान होत असल्याने, त्या पासून होणारा आनंद 'ब्रम्हस्वादसहोदर' असल्यास नवल

* Presidential address delivered by Dinesh Chandra Sarkar M. A., Ph. D. Indian History Congress; 11th Session 1948 Delhi.

काय ?" असे म. म. मिराशींनी एके ठिकाणीं म्हटलें आहे. सत्य आणि संशोधन हें समानाधिकरण असल्यामुळे, माझाडाला केलेल्या प्रार्थनेमधील उद्गारांचें अवतरण सुरवातीला उधृत केलेलें आहे.

संशोधकाने पूर्वग्रहाचा रंगीत चष्मा लावून ज्ञानचक्षू निर्मळ न राखल्याने कित्येक प्रसंगीं विपरित परिणाम झालेले दिसतात. प्रो. यदुनाथ सरकार यानी एकदेशीय फारसी लिखाणाचा चष्मा लावल्यामुळे, त्यांच्या महाराष्ट्रांतील संशोधक व संशोधन या विषयी किती विकृत कल्पना झाल्या होत्या हें सर्वश्रुतच आहे ! त्याचप्रमाणे ग्रँडडफचा इतिहास कसा चुकीचा होता हें राजवाडे यानी दाखवून दिलेंच आहे. न्यायमूर्ती रानडे यांनी Rise of Maratha Power हें पुस्तक लिहून इतिहासग्रंथ कसा लिहावा, हें उत्कृष्टपणे दर्शविलेलें आहे. पूर्वग्रहाच्या फारशी चष्म्यातून १८५७ चा स्वातंत्र्यप्राप्तीचा प्रयत्न बंडाळी म्हणून कसा दिसूं लागला, हें सर्वज्ञात आहे.

गुरु–पुष्ययोग !

संशोधकाचा दुसरा मोठा गुण म्हणजे मूलतत्वशोधनपर बुद्धि (Analytical genius) हा होय. त्यास सगळयाच घटना 'श्वानं युवानमघवानमाह' या न्यायाने एकाच दावणींत बांधतां येत नाहीं ! पाणी शुद्ध करणारी, पण शेवाळासारखीच दिसणारी 'गोंडाळ' वनस्पती जशी पाणी गढूळ करणाऱ्या शेवाळ वनस्पतीपासून निराळी काढणें अगत्याचें असतें, त्याचप्रमाणे सत्यात्मक घटना सत्याभासात्मक घटणांपासून अलग करणें आवश्यक असते. प्राचीन मराठी ग्रंथांत कित्येक आधुनिक रूपें घातलेलीं असतात व प्रक्षिप्त भाग दडपून दिलेला असतो. कित्येक वेळेला प्राचीन ग्रंथ शुद्ध करण्याचा आव आणण्याच्या भरांत, प्राचीन ग्रंथांतील प्राचीनत्वच नव्हे तर त्याचें खरें स्वरूपहि लोप पावण्याची भीति असते. म्हणून ग्रंथांतील लेखन विशेष (Orthographical peculiarities) शोधून काढणें अगत्याचें आहे. अडगळीच्या खोलीतून (lumber room) अस्ताव्यस्त पसरलेल्या मालापैकी, संशोधनफलास उपयुक्त तेवढाच माल घेऊन त्याची सिद्धता करावयाची असते.

आणि याचे शेवटीं म्हणजे प्रतिभा. (Vision and imagination) हीं संशोधकास जरूरीची आहे. मात्र ही इतिहासात्मक कल्पना (Historical imagination) हवी. 'Poetry of history' किंवा 'Philosophy of history' याच अर्थाने म्हणता येईल. धूम्रवलयाप्रमाणे सत्याच्या पायाशिवाय तरंग सोडणें म्हणजे अर्थातच प्रतिभा नव्हे. राजवाड्यांनी प्रतिभावान् मनुष्य दोन चार लाखांत एकादा निपजतो म्हणून म्हटलें आहे. सृष्टीचीं गुह्यें त्याच्या प्रत्ययास येतात; वाग्डंबराच्या भरीस न पडतां तो असाध्य वाटणारें काम साक्षात् सिद्धच करून दाखवितो. त्याने काबीज केलेल्या वस्तूंचा उपयोग बुद्धिवानादि इतर घेतात. त्याचे डोळे अंतर्मुख झालें म्हणजें परमेश्वरी तेज त्याला दिसतें, कान सूक्ष्म रूपाने अंर्तभूत झालें म्हणजे त्यास 'अनाहत नाद' ऐकूं येतो इ. प्रतिभावानासंबंधी म्हटलें आहे. अलौकिक नावीन्याचा त्याच्या बुद्धीला स्पर्श होतो. मूलतत्वशोधनपर बुद्धि व प्रतिभा हा एक गुरुपुष्य योगच होय असें म्हटलें पाहिजें!

सर्व प्रथम भारतीय!

इतिहास संशोधनाला सुरवात प्रत्येक घराण्यापासून व्हावयास पाहिजे. इतर समाजांचा, पाश्चात्य देशांतील लोकांचाहि इतिहास कित्येक वेळी आपणास मुखोद्गत असतो पण 'आपले आजोबा पणजोबा काय करीत होते?' असा प्रश्न विचारल्यास आपल्याला लाजेने मान खाली घालावी लागते! श्राद्ध पक्षाच्यावेळीं त्यांचीं नावेंहि कित्येक वेळा आठवत नाहीत. घराण्यांत कोणतीहि माहिती लिहिण्याची पूर्वीची पद्धत नसल्यामुळे, आपल्या घराण्यांत कीर्ति कोणी व कोणत्या बाबतींत मिळविली, घराण्यांत कर्तबगार पुरुष कोण झाले, याचें कांहीच ज्ञान होत नाही. ही पद्धत आता तरी सुरू केली पाहिजे. घराण्यांतील इतिहासाबरोबरच प्रत्येक गावचा इतिहास तेथील इतिहासप्रेमी गृहस्थांनी व नगरपालिकांनी लिहवून घेण्यास मदत केली पाहिजे. पुणे या शहराचा एक उत्कृष्ट इतिहास लिहून झाला आहे. नागपूर शहराचा आतापर्यंत झालेला नव्हता. पण मध्यप्रांत संशोधन मंडळाचे चिटणीस श्री. दे. गो. लांडगे यांनी नागपूरची गेल्या दीडशे वर्षांतील अनुपलब्ध अशी माहिती प्रयासाने गोळा करून हल्ली ती, ते पुस्तक रूपाने एकत्रित करण्याचा प्रयत्न करीत आहेत.

त्याचप्रमाणे जातीजातीचा व पंथापंथाचा इतिहास वजनदार लोकांनी लिहून घ्यावयास पाहिजे. विदर्भ, महाराष्ट्र इत्यादिकांचा इतिहास उज्वल आहे. त्याने अनेक स्वतंत्र राज्यें स्थापन करून उपभोगिलेलीं आहेत. महाराष्ट्रीय समाज जवळजवळ चार हजार वर्षांचा जुना आहे. उत्तरोत्तर उपलब्ध होणारा महाराष्ट्राचा इतिहास, महाराष्ट्रीयांना अभिमानास्पद अशा गोष्टी उजेडांत आणीत आहे. त्याचप्रमाणे बंगाल, गुजराथ इत्यादिकांनीहि आपापले इतिहास पूर्ण करावयास पाहिजेत. फक्त त्यांत आपण सर्वप्रथम भारतीय व नंतर प्रांतिक हें तत्त्व मात्र विसरतां कामा नये. अशा तऱ्हेचे इतिहासाचे लहानमोठे सर्व ओघ भारत इतिहास-सागराला मिळाल्यास त्याचें विराट स्वरूप जगाला विस्मयचकित केल्याशिवाय राहणार नाही. सरकारने प्रादेशिक शोधमंडळें काढलीं असलीं तरी, वर उल्लेख केलेल्या प्रयत्नांची जरूरी कमी होत नाही. कारण भारतीय इतिहास हा चार हजार वर्षांचा प्राचीन आहे, हें लेण्यांतील शिलालेख, मनु व याज्ञवल्क्य स्मृति इत्यादिवरून स्पष्ट झालेलें आहे. व असा इतिहास अखंड व ससूत्र अजूनहि लिहिला गेला नाही. * " Indian history has so far been presented only in fragments" असे जे डॉ. ताराचंद (Secretary to the Ministry of Education, Govt. of India) यांनी विधान केलेलें आहे तें वरील म्हणण्याचा पाठपुरावा करील.

भारत सरकारने हिस्ट्रि काँग्रेसतर्फे भारतीय इतिहास लिहवून घेण्याचें कार्य थांबविलें आहे. कारण अशाच प्रकारचा इतिहास के. एम. मुनशी यांनी भारतीय विद्याभुवन ( मुंबई ) या स्वतःच्या स्थापन केलेल्या संस्थेतर्फे काढण्याचा उपक्रम केलेला आहे. दोन्ही संस्थांचें कार्य एकत्रित (Consoli date ) करावें या उद्देशाने डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या भुवनांत विचार विनिमय झाला होता. पण तें जुळून आलें नाही. व आता फक्त भारतीय विद्याभुवनातर्फेच ( भारतीय इतिहास परिषद ) हा इतिहास प्रकाशित होणार आहे व त्याचे दोन भाग निघालेले आहेत. मुनशीजींनी स्थापलेली भारतीय विद्याभुवन ही संस्थाहि आतंर्राष्ट्रीय स्वरूपाची आहे. व तिने

*Presidential address Annamalainagar.

ऐतिहासिक व सांस्कृतिक कार्य प्रचंड प्रमाणावर केलेलें आहे. अशा संस्थेकडून हें कार्य झाल्यास तेंहि स्वागतार्हच आहे.

दगडादगडाशीं परिसंवाद.

इतिहास रचनेच्या कार्याकरता लोकगीतें, कहाण्या, आख्यायिका इत्यादिकांबरोबरच वास्तुशास्त्र, शिल्पमंदिरें, मूर्ती इत्यादिकांचें संशोधन व अभ्यास आस्थापूर्वक व्हावयास पाहिजे. कान व डोळे उघडे ठेऊन वावरल्यास देशांतील प्रत्येक दगड आपल्याशीं परिसंवाद करून, उज्वल भूतकाळ कथन करण्यास उत्सुक आहे, हें दिसून येईल. विदर्भांत कोणतेंहि खनन चालू असतां अनेक मूर्ती अनाहूत सापडलेल्या दिसतात. जबलपूर धारजवळ बदनवार येथे एक शेतकरी शेत नांगरत असतां, फाळास दगड लागून सहजपणे १४ तीर्थंकरांच्या व एक शांतिनाथाची, अशा पंधरा उत्कृष्ट मूर्ती तीन वर्षांपूर्वी मिळाल्या.

या ठिकाणीं भारतीय स्थापत्य, शिल्प व मूर्ती याविषयी थोडेसें विवेचन करणें अस्थानीं होणार नाही.

मूर्तिकला वगैरेच्या पाठीमागे हजारो वर्षांचा इतिहास उभा आहे. अनेक राजवटी, धर्म, पंथ, सामाजिक-सांस्कृतिक *जीवन इत्यादींच्या उदयास्तांचीं भव्य रम्य चित्रें त्यांत प्रतिबिंबित झालेलीं आहेत, व आपल्या आजच्या जीवनास आकार आणीत आहेत.

भारताला पाश्चात्य लोक " The land of idols " असे यथार्थत्वाने संबोधितात. मूर्तिकलेचा उल्लेख वेदांत आहे किंवा नाही, याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. मॅक्समुल्लरच्या मतें वेदांत मूर्तिपूजेचा उल्लेख नाही. पण डॉ. बेलेनसन म्हणतात, "वेदांतील स्तोत्रें हीं ईश्वराच्या मूर्तींनाच

* गोंडवनांतील एक वैशिष्ट्ययुक्त मूर्ती म्हणजे चंद्रपूरला अचलेश्वराच्या मंदिरांत सूर्य मूर्तीजवळ ज्या गोंड राजांच्या मूर्ती बसविलेल्या आहेत त्यांपैकी एक होय. त्या मूर्तीवर खोदलेला पोषाक मोंगल धर्तीचा आहे. ही मूर्ती शारदाश्रमांत ठेवलेली आहे. गोंड-मोंगल संस्कृतीच्या मिश्रणाचा तो एक पुरावा आहे.

उद्देशून आहेत." वैदिक ऋषि हे मुख्यतः इंद्र, मरुत् इत्यादिकांची साधना करणारे असल्यामुळे मूर्तिपूजेची कल्पना त्यावेळेस मूर्त नसावी एवढेच.

रामायण व महाभारत यांत मूर्ती व देवळें याबद्दल स्पष्ट उल्लेख आहेत. त्याबद्दलचे कांही उल्लेख शांडिल्योपनिषद्, अग्निपुराण, पद्मपुराण वगैरेतहि आहेत. काश्यप संहितेंत ( Edited by Parth Sarathi with introduction in English, by Pro. Ramanath Swam i) या विषयाचा बराच विचार केला आहे. योगसूत्राचा कर्ता पतंजली ( ख्रिस्तपूर्व २ रें शतक ) यांनी आपल्या महाभाष्यांत मूर्तिकलेची कल्पना दिलेली आहे. पाणिनी ( ख्रिस्तपूर्व ६ वें शतक ) व निरुक्तकर्ते यास्क यांच्या ग्रंथांत या विषयी ऊहापोह केलेला आहे. त्यावरून ही कला व शास्त्र किती प्राचीन आहेत याचा अंदाज बांधतां येतो.

### मूर्तिपूजेच्या कल्पनेचा उगम

शिवाशीं जिवाचें ऐक्य होणें, हें मानवी आयुष्याचें अंतिम ध्येय आहे. वैदिक धर्माने ज्ञानयोग, कर्मयोग व भक्तियोग त्याकारिता सांगितलेले आहेत. त्यापैकी पहिले दोन सामान्य लोकांना आचरण्यास अत्यंत कठीण असून, भक्तिमार्ग मात्र वरच्या श्रेणीपासून खालच्या श्रेणीपर्यंत सर्वांनाच अवलंबविण्यास सोपा आहे. त्यामुळे ईश्वराच्या अमूर्त स्वरूपाचें आकलन मूर्त स्वरूपांत करणें आवश्यक होऊन बसलें व सगुण भक्ति अस्तित्वांत आली. वैदिक धर्मांत तेहतीस कोटी देवता मानतात; तेवढ्या प्रमाणांत मूर्तींचीं विविध रूपें अस्तित्वांत आल्यास त्यांत नवल कांहीच नाही.

मनांत जे विचार येतात त्याचें मानव वा कोणताहि प्राणी अनेक प्रकारांनी प्रदर्शन करतो. मानवाचें विचारप्रकटीकरण्याचें मुख्य माध्यम भाषा हें असलें तरी, दात, जिव्हा, नाक, नेत्र, कपाळाला आठ्या घालणें इत्यादि प्रकार त्याला योजावे लागतात ! पशू व इतर प्राणी तें कार्य शेपूट हालविणें, कान टवकारणें, फणा आपटणें, डरकाळी फोडणें इत्यादि तऱ्हांनी करीत असतात. मात्र मनांत उसळलेले तुफानी वा भावसंकुल विचार व्यक्त करण्याकरता भाषा तोकडी पडली म्हणजे, मनुष्य चित्रकला, गायनकला किंवा

नृत्यकला अशांपैकी एक वा अनेक कलांना साह्यास पाचारतो; यांत मूर्तिकलेचा उगम आहे, असे म्हणण्यास हरकत नाही.

गंधकांच्या सरोवरांत

ख्रिस्त, व इस्लामी इ. धर्मामध्ये मूर्तिकलेचा प्रसार विशेष झाला नाही. याचें कारण उघडच आहे. मूर्तिपूजा म्हणजे किती भयंकर पाप मानलें आहे, हें 'पवित्रशास्त्रां'तील अनेक वचनावरून दिसून येईल. "मी परमेश्वर तुझा देव आहे. माझ्यासमोर तुला अन्य देव नसावे. आपल्यासाठी कोरीव मूर्ति करूं नको. कशाचीहि प्रतिमा करूं नको व तिची पूजा करूं नको व पाया पडूं नको." निर्गम २०:२-५

"कुवासना व लोभ इ०कांना मूर्तिपूजा म्हणावे; यास जिवें मारा" कलसै ३,५,६

"भेकड, विश्वास न ठेवणारे, अमंगल, खून करणारे, मूर्तिपूजक व सर्व लबाड यास अग्नीच्या व गंधकांच्या सरोवरांत वाटा मिळेल!" प्रगटीकरण २१:८

बुद्ध धर्म सुरवातीला निरीश्वरवादी असल्यामुळे, बुद्धाच्या जीवनाशीं निगडीत असलेलीं स्थळेंच मात्र बुद्ध लोक पवित्र मानीत आले आहेत. त्याच-प्रमाणे तीर्थंकरांना जेथे मोक्ष मिळाला तीं स्थानें पवित्र मानण्याची जैनांत पद्धत आहे. महानुभाव पंथांतहि जवळ जवळ अशीच पद्धत आहे.

बुद्धाच्यानंतर मात्र बुद्ध हाच ईश्वर म्हणुन मानण्यांत येऊं लागला व बुद्ध व जैन या दोघांनीहि वैदिक धर्मापासून पुढे मूर्तिपूजा उचलली. जैनांत तीर्थंकराच्या २४ मूर्ती सध्या पूजल्या जातात. पुढे पुढे तर मानवी प्रतिमा करूनहि त्या पूजण्याची प्रथा पडली. उ० पार्श्वनाथाच्या जीवनाशीं संबंध आलेल्या पद्मावती या नाग राजकन्येच्या प्रतिमामूर्ती करण्यांत येऊन त्या जैन देवळांत पूजिल्या गेल्या. जैनामध्ये दिगंबर व श्वेतांबर असे दोन पंथ असून, पहिल्या पंथांत नागव्या मूर्तींची पूजा करतात व दुसऱ्यांत मूर्तीला कपडे, दागिने असतात.

ख्रिस्ति धर्मांत मूर्तिपूजेबद्दलच्या अशा भयंकर कल्पना असल्यामुळे अर्थातच भारतवासियांच्या मूर्तिकलेबद्दल त्यांना आदर वाटणें शक्य नव्हते.

विचारशक्तीला परिभ्रमणांत पाडणाऱ्या असंख्य मूर्तींची गजबज पाहून भारत-वासियांच्या रानटीपणाचें तें एक भलें मोठे प्रदर्शन आहे, अशी त्याची समजूत झाली. भारतवासीयांचें मूर्तिशास्त्र व कला यांचें खरेखुरें रसग्रहण करावयाचें असेल तर, भारतीय प्राचीन ग्रंथांचा-पुराणांचा वगैरे-सखोल अभ्यास व्हावयास पाहिजे. यूरोपीय विद्वानांच्या ग्रंथांत संस्कृतसंहितांच्या द्वारें मूर्तिचें विशदीकरण केलेलें नाही. बहुतेक मूर्तीबद्दल त्यांनी स्वतःच्या दृष्टिकोनामधून विचार प्रगट केलेले आहेत. नागेंद्रनाथ बसु आणि टी. ए. गोपिनाथराव अशा सारख्या भारतीय विद्वानांनी मात्र संस्कृत ग्रंथांच्या आधारें मूर्तीशास्त्र व मूर्ति-कलेचें बारकाईने सम्यग्दर्शन घडवून आणलेलें आहे. स्टेला क्रिमरिश यांनी संस्कृत सूक्तांच्या आधारें मूर्तींचें वास्तविक स्वरूप प्रगट झालें आहे वा नाही हें पडताळून पाहिलेलें आहे.

भिवयांतील अग्निकमळ !

ज्याप्रमाणे सार्वजनिक मूर्ती पाहाण्यांत येतात त्याचप्रमाणे प्रत्येक घराण्याच्या इष्ट व कुलदेवता असतात. रत्नांपासून तो हस्तिदंतापर्यंतच्या मूर्तींची विविधता कोठवर वर्णावी ? त्यांत सोन्याच्या, काशाच्या, पितळेच्या, लाकडाच्या, मातीच्या, स्फटिकांच्या, 'प्लॅस्टर'च्या मूर्तींचे सर्वच प्रकार येतात. त्यांत कित्येक मूर्ती साठ साठ फूट उंचीपासून तो अंगुष्ठ मात्र प्रमाणापर्यंतच्या दिसून येतात. (वऱ्हाडामधील चिखली तालुक्यांतील (सिंघण यादवाच्यावेळची) अमडापूर येथील 'बल्लाळी' देवीच्या मूर्तीच्या पावलांचीच लांबी साडेदहा फूट आहे ! ती सर्वच मूर्ती सध्या अस्तित्वांत नाही. तिचे कांही भाग मात्र देवळाच्या बाहेर मांडलेले आहेत. या पावलावरून ती देवीची मूर्ति ६०-६५ फूट तरी सहजच उंच असावी. तशाच वारी व लोणार येथेहि हनुमानाच्या प्रचंड मूर्ति आहेत.) त्याचप्रमाणे मूर्तीचे चलाचल रुद्र-शांत योगी-भोगी असे प्रकार असतात. हत्ती, सिंह, वराह, गरुड, इत्यादिकांचीं तोंडें असलेल्या, व निरनिराळ्या कठोर भावनांना चालना देणाऱ्या मूर्ति बरोबरच, राजहंसाचीं वगैरे मुखें असणाऱ्या व कोमल भावना जागृत करणाऱ्या मूर्तीहि दिसून येतात. सप्ताश्वांच्या मूर्ती कोठे कोठे दिसून येतात. गरुड हा शुभशकुनी मानलेला आहे. त्याचप्रमाणे नागचक्र असलेला शालिग्रामहि. मात्र कार्तिकेयाच्या मूर्तीजवळ सुवासिनींनी जाऊं नये असा दंडक आहे !

मूर्तींच्या शरीरांच्या निरनिराळ्या ठेवणी (Postures) कूर्मासन, भद्रासन, पद्मासन इत्यादिकांनी दाखविल्या जातात. मूर्तींवर वक्षाभरणें, कंकणें, कटिबंध इत्यादि अलंकार असतात, व कार्पास, रेशीम, व्याघ्र-मृगचर्मे इत्यादि वस्त्रांनी त्या युक्त असतात.

कांही मूर्ती आयुधांनी सज्ज असतात. गदा, चक्र, शूळ, अंकुश, अग्नि, खड्ग, परशु, हीं प्रमुख आयुधें होत. देवींच्या सायुध मूर्ती असतात. त्या आयुधांत विशेष आयुध म्हणजे शृंखला. दुर्गेच्या मूर्तींच्या प्रकारांत तर विलक्षण वैचित्र्य आहे. वनदुर्गा, अग्निदुर्गा, विंध्यवासिनी, रूपमती, मंगला, सर्वमंगला, ललिता, रंभा, योगनिद्रा इत्यादि अनेक स्वरूपांत देवीची आराधना करण्याचा प्रघात आहे. बालाजीचें आयुध निशाणदंड (Flag staff) आहे. बाकीच्या बऱ्याच मूर्तींचीं आयुधें वगैरे लोकांच्या परिचयाचीं असतात.

मूर्तींची यापेक्षा सर्वांत श्रेष्ठ शोभा अग्निज्वालांनी युक्त अशा प्रभामंडळांत असते. कित्येक देवतांच्या भिवयांतील अनेक पाकळयायुक्त विशुद्धर्णाचें 'अग्निकमळ' ज्वालाच्या रूपाने, चक्राकार तेज ओसंडत असतें. अशा प्रकारच्या दृश्याने देवतांबद्दलच्या रौद्र–भयानक व अद्भुत-रम्य काव्यात्म भावनांना उधान येते. देवताचें गांभीर्य व शुचित्व मनावर त्यामुळे बिंबल्याशिवाय राहात नाही.

### सौंदर्याचा साक्षात्कार

कित्येक भाविक, मूर्तीची पूजा न करतां शालिग्राम, पादुका विष्णुकरता; त्रिशुळबाण शिवाकरता; इत्यादि प्रतीक रूपानेच देवतांची पूजा करतात. हिरवे, निळे, लाल व याखेरीज पांच मूलरंगतत्वांचें संमिश्रण असणाऱ्या सुंदर शालीग्रामासारख्या प्रतिकाची पूजा करणें म्हणजे, एक प्रकारे अपूर्व सौंदर्याचीच पूजा करणें होय यांत शंका नाही! सौंदर्याबद्दलची मानवांची भक्ति मूर्तिकला (व इतर सर्व कलांतहि) भरून राहिलेली आहे, हें यावरून दिसून येते! कांही मूर्तींच्या करांत वीणेसारखी सुंदर वाद्यें वा कांही मूर्तींच्या साहचर्यांत मृगासारख्या (शिवाच्या मूर्तींत मृग बहुधा दिसतो) सुंदर पशूंचा योजना करण्यांतहि वरीलच हेतु दिसून येतो!

पण कलाकाराच्या मनोगर्भांतील आशय व नैतिक दृष्टिकोन मूर्तीत व्यक्त झाला नसेल तर तास कांहीच किंमत नाहीं ! हा आशय बहुधा प्रतीकांच्या ( Symbols ) योगाने दाखविण्यात येतो. भारतीय मूर्तीकला प्रमुखतः प्रतीकात्मक व संकेतात्मक आहे. त्या त्या प्रतिकांच्या व संकेतांच्या सहाय्याने असा आशय सूचित केल्या जातो. उ. कांही मूर्तीत पार्वती, शंकराच्या प्राप्तीसाठी विरहातूर झालेली दाखविली असते, पण तिला शंकर मीलनाची पूर्णांशाने आशा वाटत असल्यामुळे तिची मनःस्थिति शांत दाखविलेली असते. त्या चित्रांत भैरवीराग दर्शविलेला असतो. हा प्रभातसमयाचा शांत भावना दर्शविणारा राग आहे. भारतीय संगीताचे त्या त्या प्रहराचे योग्य असे राग व सूर देवताच्या मूर्तीत दर्शवून, त्यांच्या भावनांचें यथातथ्य उन्मीलन करणें हा मूर्तिकारांच्या तंत्राचा एक भाग आहे, असें म्हणण्यास हरकत नाही. त्याचप्रमाणे हे भाव अंजुलीमुद्रा, अभयमुद्रा, वरमुद्रा, ज्ञानमुद्रा इत्यादिकांनी दर्शविले जातात. व मागे वर्णिलेल्या निरनिराळ्या आसनांचाहि याकरता उपयोग केल्या जातो.

## गिरिगुंफांतील प्राचीनतम मानव

भारतांतील विवरमंदिरें व त्यांतील रंगकला हींहि संशोधनाच्या कुतूहलासच नव्हे तर आदरमिश्रित विनम्रभावास कारणीभूत झालेली आहेत. इतिहास पूर्वकालीन व इतिहासकालीन असे दोन भाग या कलेंत पाडतां येतील. इतिहास पूर्वकालीन रंगकलेमधून प्राचीनतम मानवाचे ( Dawn man) जीवन उत्तरोत्तर जास्त व्यक्त होण्याचा संभव आहे. खडकाखडकांच्या आश्रयांत राहणाऱ्या, मृगयेवर उदरंभरण करणाऱ्या, केवळ, वल्कले वापरून मुक्त हवा प्रकाशांच्या क्रीडावनांत वावरणाऱ्या मानवजातीचें निसर्गसुंदर जीवनचित्र या खडकाच्या रंगकलेंत शाश्वत होऊन राहिलेलें आहे. विंध्य सातपुड्यांच्या डोंगर–रांगांत, व महाकोशलांत अनेक गिरिगुंफा असून त्यावर अनेक प्रकारचें प्राचीनतम खोदकाम, लेख व चित्रकर्मे आहेत. त्यापैकी कांहीकडे सरकारी अधिकाऱ्यांनी लक्ष पुरविलेलें आहे. प्रसिद्ध संशोधक पंडित लोचनप्रसाद पांड्येय यांनी या विभागासंबंधी संशोधन केलेलें आहे. त्यांच्या लेखामुळे अनेक विद्वानांचें लक्ष या विषयाकडे लागलें. पंचमढी व

हुशंगाबाद येथील अशा तऱ्हेचे अवशेष मिळालेले आहेत. त्रिकम खोल-मधील अवशेष सर्वात जुने आहेत, असे मानतात.

कांहीं खडकावर हातांच्या आकृति आहेत. 'उषा-कुटी' या खडकाने बनलेल्या 'घरकुलावर'हि कांहीं अक्षरें, आकृती व मानवाकृती कोरलेल्या आहेत. स्वास्तिकासारख्या कांहीं शुभ प्रतिकांच्या त्या प्रतिकृती आहेत असें दिसतें. सर्वात महत्वाचीं चित्रें रायगड विभागांत शिंघनापुर डोंगरांत आहेत. कांहीं खडकांत कांगारु, रेनडिअर व अजस्त्र हत्ती, दाखविलेले आहेत. त्यावरून हीं चित्रें फार प्राचीन दिसतात. गोंडवनाच्या भूमीशीं ज्याप्रमाणे दक्षिण हिंदुस्तान, आस्ट्रेलियाचा पश्चिमभाग, आफ्रिका, दक्षिण अमरिकेचा पूर्वभाग इत्यादि भूमींचा संबंध जोडून तिचें प्राचीनत्व दर्शवितात, त्याचप्रमाणे या भूमीचें प्राचीनत्व, दुसऱ्या देशाच्या कांहीं भूमीच्या प्राचीनत्वाबरोबरचें आहे हें सिद्ध करण्यास वरील चित्रांची मदत होणें शक्य आहे. रानटी जनावरें, सापळे, शिकारीचे देखावे हीं समाजाच्या कृषिपूर्व, मृगया अवस्थेंतील मानवजीवन दर्शवितात. कांहीं चित्रांत मात्र धनुष्यबाण, तरवार, कुऱ्हाडी इत्यादि शस्त्रास्त्रांचें अस्तित्व नाहीं; त्यावरून हीं चित्रें तुलनेने बरीच पुढील काळांतील दिसतात. पांचहजार वर्षापूर्वींचें (समाजाच्या शैशव कालापूर्वीचेंहि) जीवन खडकांतील रंगकलेंतून यथातथ्य प्रतीत झाल्यास, ते कोणास रोमहर्षक वाटणार नाहीं? (कांहीं वर्षापूर्वी महेश्वरजवळ पाषाण युगाची अवशेष असलेलीं शस्त्रास्त्रें सापडलेलीं आहेत.)

### नवरसाचा भर

इतिहासकालीन विवरमंदिरांत भारताच्या कौशल्याची पराकोटी दृष्टीस पडते. "All Commentary grows pale before such magnificient ruins." असे डॉ. बर्जेस म्हणतो. वेरूळच्या लेण्याला 'Region of Wonders' असें म्हटलें आहे. कैलासांतील राम-रावण, व कौरवपांडवांच्या रसाळ कथांच्या आविष्करणांत नवरसांचा भर उतास चाललेला दिसून येईल. अजंठा, घारापुरी, कान्हेरी इत्यादि लेणी सुपरिचितच आहेत. इतक्या विशाल व भव्य चमत्कृति मिसर देशांतच आहेत. पण त्यांत सौंदर्याचा लेश नाहीं!

भारतांतील अत्यंत विस्मयोत्पादक अशी रंगकलेचीं निवासस्थानें म्हणजे बाग व उदयगिरी लेणीं होत. गुप्तकालीन सुवर्णयुगांतील अभिजात कला त्यांत प्रकर्षानें प्रकट झालेली आहे.

बाग गुहा आणि त्यांतील रंगकला खिस्ती सनाच्या चवथ्या शतकाच्या शेवटांतील आहे. बुद्ध भिक्षुंनीं या गुहा खोदलेल्या असून, तीं बुद्ध धर्मियांचीं पवित्रस्थानें आहेत. रामायण महाभारत यांतील दृश्यें येथेंहि चित्रीत केलेलीं आहेत! या गुहांत वास्तुशास्त्र, खोदकाम, व रंगकला यांचा त्रिवेणीसंगम झालेला आहे. तेथील रंगमहालहि (Hall of colours) लक्षांत भरण्यासारखा आहे. येथील एक वैशिष्ट्ययुक्त दृश्य म्हणजे अश्रुपात करणारी रमणी. एक कमनीय दृश्य म्हणजे ६ पुरुषो आकृत्या मेघपंक्तींमधून बाहेर पडत आहेत; व खालील वृंदवादकावर शुभभावनांचा वर्षाव करीत आहेत. बागकेव्हचीं रंगकला फक्त अजिंठा येथील रंगकलेशींच तुल्यबळ ठरूं शकते.

उदयगिरी गुहा हिंदु व जैनांचें पवित्रस्थान आहे. त्या शिवगुहा आहेत. उदयगिरींत एकूण वीस गुहा आहेत. त्या खडकामधे कोरलेल्या खोल्या भासतात. येथील एक वीणावादक, वराहमूर्ति, शेषशायी भगवान, स्वर्गीय नृत्यकार इत्यादि आकर्षक आहेत. या गुहेमधील खारवेल राजाचा शिलालेख अत्यंत गाजलेला आहे. ओरीसाची दोन हजार वर्षांपूर्वींची संस्कृति व इतिहास यावर या लेखानें प्रकाश पडलेला आहे. त्यावेळीं उदयगिरी टेकड्यांना कुमार व कुमारी टेकड्या अशीं अभिधानें होतीं. राणीगुंफेमधील दृश्य अत्यंत विलोभनीय आहे. एक थोरला हत्ती व दोन लहान हत्ती यांना त्या गुहेमधून हुसकाऊन लावण्याकरतां एक मनुष्य प्रयत्न करीत आहे व एक स्त्री त्याच्या पाठीमागे दोर घेऊन उभी आहे व भोंवती लोकांचा थवा आहे. सुप्रसिद्ध भारतीय उदयन–वासवदत्ता कथेचें हें निदर्शन आहे असें समजलें जातें. (उदयन, हत्ती कसा पकडावा ते वासवदत्तेला शिकवीत असे.)

वरील सर्व दृश्यांत व इतरत्रहि नृत्यकलेचें फार मोठ्या प्रमाणावर दिग्दर्शन झालेलें आहे. वरील दोन्ही गुहांमध्ये नृत्यकलेचे बरेच संदर्भ आढळतात. पावया येथील नृत्याचीं दृश्यें तर सर्वोत्कृष्ट आहेत. त्यावरून भारताच्या नृत्यकलेच्या श्रेष्ठत्वाची कल्पना येते.

शिल्पकला व वास्तुकला यांना जरुरीच्या असणाऱ्या रेखागणितशास्त्रा-तील बुद्धिमत्तेचा उच्चांक भारतीय कलावंतांनी गाठलेला आहे. त्यांनी स्वतःचा आत्मा कलाकृतींत ओतला. कलांच्या आराधनेंत त्यांच्या प्रतिभेला पंख फुटलेले दिसतात. असीम श्रद्धा व भक्ति या महान् कलांच्या प्रेरक असतात. त्याचेंच प्रत्यंतर म्हणजे भारतीय कला!

संशोधकांना आवाहन!

विदर्भामध्येहि वरील कलांचा कांही प्रमाणांत उत्कर्ष झालेला आहे. वेरुळचीं लेणीं विदर्भांतीलच. त्यांचें वर्णन वर आलेलेंच आहे.

विदर्भांत बुद्ध, जैन व वैदिक धर्मांचा प्रसार झाला; त्यामुळे त्या त्या धर्मांचे अवशेष व शिल्प या भागांत विपुल पाहावयास मिळतें.

भेडाघाटचें एक देऊळ अल्हनदेवीनें बांधविलेलें आहे. हें भेडाघाट शिलालेखावरून दिसून येते. तेथीलच योगिनींचें देऊळ वर्तुलाकार असून सर्वांत जुनें आहे. हा शिलालेख न्यूयार्कच्या ओरिएंटल सोसायटीच्या मुझिअम-मध्ये नेलेला आहे. त्याचप्रमाणे जबलपूर जिल्ह्यांतील रूपनाथ आज्ञापत्र (edict) प्रसिध्द आहे. येथे डोंगरराजीवरून एक ओहोळ वाहातो व तीन लहान धबधबे आहेत. या खडकावर अशोकाचें आज्ञापत्र कोरलेलें आहे. महा-कोसल मधील राजिम हें एक पवित्रस्थान आहे. ह्यांतील अनेक प्राचीन देव-ळांपैकी एक राजीवलोचनाचे असून आंतील भागास कोरीव लेख आहेत. राम-टेक व (त्याजवळील मनसर) कौंडिण्यपूर येथील अवशेषहि उल्लेखनीय आहेत. सातपुड्याच्या मुक्तागिरी येथील धबधब्याजवळ अनेक जैन देवळें आहेत. एक देऊळ तर सरळ उभ्या भिंतीसारख्या काळ्या पाषाणाचा, सुमारे तीन चारशे फूट कडा खोदून, धबधब्याच्या पायथ्याशीं तयार केलेलें आहे. या सर्व देवळांत पारसनाथाच्या काळ्या अगर संगमरवरी नग्न मूर्ति आहेत.

हेमाडपंती देवळे हें वऱ्हाडचें एक वैशिष्ट्य आहे. तीं चुन्यानें सांधलेलीं नसतात. हा स्थापत्यकलेचा एक आश्चर्यकारक विजय होय! धोत्र व सातगाव (ता. चिखली) येथील हेमाडपंती देवळें प्रसिध्द आहेत. तशीच मेहकर येथील पैनगंगेच्या काठी असलेली एक इमारत लांब दगडी चिऱ्यांनी बांधलेली

आहे. तेथेहि चुना किंवा माती यांचा कोठेच उपयोग केलेला नाही. ही इमारत चालुक्यकालीन आहे. हेमाडपंती देवळें हीं महादेवाचीं असून, तीं बांधणींत जडजूड (massive) व वर विरळ खोदकाम असलेलीं अशीं दिसून येतात. मेहकर येथील श्री बालाजीची मूर्ती प्राचीन हिंदु मूर्तिकलेचा उत्कृष्ट नमुना आहे. एकसंधी अशा काळया पाषाणामधून ती कोरलेली आहे. या मूर्तीचा महाविष्णु म्हणून उल्लेख मत्स्यपुराणांत आहे व पद्मपुराणांत शार्ङ्गधर असा आहे.

लोणार येथील दैत्यसूदनाचा उल्लेख प्रस्तुत ग्रंथांत पूर्वीच आलेला आहे. विदर्भांत कांही ठिकाणीं उत्कृष्ट सूर्यमंदिरें आहेत. मराठवाड्यांत जयनद येथे एक सुंदर सूर्यमंदिर आहे. कळंब येथील चिंतामणीचें देऊळ (याचा उल्लेख गणेशपुराणांत आहे) चांदा येथील अचलेश्वराचें देऊळ, माहुर येथील वैदिक धर्माची लेणी, पातूर व सालबर्डीची लेणी, नागपूर येथील रुक्मिणी मंदिर, तळेगाव दशसहस्र (जिल्हा यवतमाळ) येथील वैशिष्टयुक्त अनेक मूर्ति व याच जिल्ह्यांतील सातिफळ येथील कपिलेश्वराचें देऊळ, महागावचें कळमेश्वराचें देऊळ इ० नांव घेण्यासारखीं आहेत.

यवतमाळ जिल्ह्यांतील दुसरी दोन महत्वाचीं देऊळें तपोना–तपोवन– येथे आहेत. एक शिवाचें देऊळ असून त्याच्या पूर्वेकडे सभामंडप व पश्चिमेकडे टाकें आहे. त्यांत पायऱ्याची विहीर आहे. हें देऊळ यादवकालीन असावें. मुख्य देवळाच्या पश्चिमेला एक स्त्रीची नागवी आकृति आहे आणि नृत्य विलासांत मग्न झालेल्या दुसऱ्या स्त्रियांच्या आकृत्या आहेत. तेथे (तपोना) शिवगणाचे दोन पुतळे आहेत. त्यांच्या हातांत डमरू असुन ते द्वाररक्षकाचें कार्य करतात.

भांदकसारखे प्राचीन अवशेषाने समृद्ध असें दुसरें गाव तर या प्रांतात क्वचित असेल. येथे बुद्ध व जैन लोकांच्या पुरातन मूर्ती पुष्कळ असून दोन्ही धर्मांच्या इतिहासावर सारखाच प्रकाश पाडतात. भांदक हा गाव २८ मैल लांब व १६ मैल रुंद अशा जंगलाने वेढलेला आहे. यौवनाश्वराजाचा महाल, पाषाणाचा बाण, भद्रनाग, राक्षसाच्या देवळांतील नारसिंहाची शेंदूर फासलेली अकाळ विकाळ मूर्ती, पार्श्वनाथाची काळया पाषाणाची जैनांची भव्य मूर्ति,

सूर्यकुंड, चंद्रकुंड, दुधाळें हीं टाकीं, बौद्ध भिक्षूंचीं खडकांतील लेणीं, स्तूप, पडके विहार, वैदिक धर्मियांच्या मूर्ती इत्यादि प्राचीन व काव्यमय अवशेषानें हें स्थळ इतकें गजबजलें आहे की, कोणत्याहि संशोधकाच्या जिज्ञासू वृत्तीस तें आवाहन दिल्याशिवाय राहात नाही.

मूर्ती-देवालयें या विषयाकडे दृष्टिक्षेप केला म्हणजे त्याची एक कृष्ण बाजू समोर आल्याशिवाय राहात नाही. मूर्तिपूजेच्या नावाखाली आजपर्यंत असंख्य पंड्ये-पुरोहितांनी भक्तीच्या पवित्र मार्गातहि दलाली करून, आपल्या पोळीवर तूप ओतून घेतलें आहे. आता काय देव अभ्यंग स्नान करतात, आता काय देव आहार करतात, आता काय देव कंचनींच्या नृत्य-गायनाचा भोग घेतात, असे सांगून, भक्तांना त्यांनी बाहेर ताटकळून ठेवलेलें आहे. देशांतील असंख्य देवळाकडे दृष्टि फेकली तर अंगावर काटा राहील, असें दृश्य दृष्टीस पडतें! पण मूर्तिकलेवरील ग्रंथांत शिरल्याग, देवता व देवळें या संबंधींच्या एका अभूतपूर्व व अमृतदृष्ट अशा दैदीप्यमान अपर सृष्टींत आपण विहार करीत आहोंत, असा भास होतो!

एक होता राजा!

लोककथा, लोकगीतें, पोवाडे, लावण्या कहाण्या, आख्यायिका, दंतकथा, जात्यावरचीं गाणीं, झोपाळ्यावरील गाणीं, सामुदायिक गाणीं, फेराचीं गाणीं, जानपद कथा, वीरकथा, नीतीकथा, रूपककथा, चौक, कटिबंध, दंडारी, तमाशे इत्यादिकांतील संशोधनाचें व वाङ्मयाचेंहि महत्व अद्याप लोकांना पटावें तितकें पटलेलें दिसत नाही. कस्तुरी मृगाला ज्या प्रमाणे आपल्या नाभींतील कस्तुरीची जाणीवहि नसावी, त्या प्रमाणे बहुजनसमाजालाहि आपल्या जवळ असलेल्या या सौरभसंपन्न वाङ्मयाची कल्पना नाही.

उपरोक्त वाङ्मय-संग्रहाच्या बाबतींत भारत इ. संशोधन मंडळ, डॉ. केतकर, पुण्याचे श्री. दाते, राजवाडे (भोंडल्याचीं गाणीं), साने गुरुजी (स्त्रीजीवन), श्री. ना. गो. चापेकर (आमचा गाव), कु. दुर्गाबाई भागवत, कु. अनसूया भागवत, सौ. मालतीबाई दांडेकर, डॉ. सौ. चंद्रकला हाटे यांनी कार्य केलेलें आहे. वऱ्हाड-मध्यप्रांत पुरतेंच घेतलें तर, नागभीडचे श्री.

बा. त्रि. जोशी (चंद्रपुरी लोककथा व लोकगीतें), यवतमाळचे श्री. पां. श्रा. गोरे (वऱ्हाडी लोकगीतें.), प्रा. वा. कृ. चोरघडे (साहित्याचें मूलधन), जवळ जवळ येवढेच साहित्यिक दृष्टीसमोर येतात. त्यांत श्री. आनंदराव जोशी, व कै. सौ. शांताबाई मडखोलकर (हिंदुपगावरील लेख) यांचा उल्लेख करावा लागेल.

अशा प्रकारचीं गीतें विदर्भातील देशमुख, पाटील, कुणबी, माळी, तेली, सोनार, धनगर, धीवरापासून तो हरिजनांच्या संग्रहीं आहेत.

या गीतांमध्ये, सणांचीं गाणीं, लग्नाच्या वेळचीं गाणीं, धार्मिक रूढी, सामाजिक चालीरीती, देवदेवता, कुळाचार, बहीणभाऊ प्रेम, अपत्यप्रेम, नणंदाभावजयांचीं मत्सरयुक्त भांडणें, किंवा थट्टामस्करी, सासवासुनांची एकमेकांशीं वर्तणूक, भल्याबुऱ्या समजूती, कौटुंबिक घटना, शकुनावरील विश्वास, नवस इत्यादिकांचा समावेश होतो. म्हणूनच या गीतांमधून सांस्कृतिक, सामाजिक, भाषाविषयक, व मानववंशशास्त्रविषयक संशोधनाला विपुल साधनसामग्री मिळूं शकते. मराठी भाषेच्या अभ्यासास, तिच्या सर्व उपभाषांचा अभ्यास अपरिहार्य आहे हें कोण अमान्य करूं शकेल ?

या सर्व गीतांत त्याग, सेवा, प्रेम या उच्च भावनांबरोबरच, भाषेचा अवीट गोडवा भरून राहिलेली आहे. श्रमजीवनाच्या पार्श्वभूमीवर थरारत्या करुणरसाच्या जोडीने शृंगारभावनांचें मुलायम स्पंदन त्यांत प्रतीत झाल्याशिवाय राहात नाही. शिवाय 'गंध काय लेला कपाळाले-फाकली चंद्रकोर !' अशा सारख्या सहज उपमेने विचार-विकार व्यक्त करण्याचें या गीतांत मोठें सामर्थ्य आहे !

अद्भुततेबरोबरच, लोकवाङ्मय हें खऱ्याखुऱ्या वास्तविकतेवर आधारलेलें आहे; व तेंहि अश्लीलते (Obscenity) चा लवलेश न येऊं देतां ! मराठींत व हिंदींतहि सध्या वास्तविकतेच्या नांवाखाली अतिकृत व अतिरंजित वाङ्मय निर्माण होत आहे. किंबहुना लैङ्गिक भावनांना न चाळविणारे वाङ्मय, 'वास्तविक' वाङ्मयच नव्हे, असा सिद्धांत होऊं पाहात आहे ! अभिरुचीस धरून असलेली वास्तविकता हा लोकवाङ्मयाचा मला सर्वांत मोठा गुण वाटतो.

अशा वाङ्मयातील कल्पनेची अद्भुतता काहींशी पलायनवाद (Ivory-tower) प्रमाणे जीवनाशीं विसंगत आहे असें समजून, त्याबद्दल नाकें मुरडण्याचा कित्येकांचा शिरस्ता आहे; पण जीवनाशीं विसंगत व फार दूर असलेली दृष्टीच, जीवनाशीं जास्त सुसंगत व फार जवळची आहे असें म्हणावेसें वाटतें! कोणास हा मनःकल्पित असत्यभाव (Fantastical paradox) वाटेल! पण अशा वाङ्मयात मूळात जाऊन पाहिलें तर कोणत्यातरी जीवनविषयक महान् सिद्धांताचें प्रच्छन्नपणे दिग्दर्शन केलेलें असतें, हें दिसून येतें. अद्भुततेमुळेच ' एक होता राजा ' असें म्हटल्याबरोबर देवदूत, पऱ्या, राक्षस इत्यादिकांच्या कथा ऐकण्यास थोरापासून पोरापर्यंत सर्वच कान टवकारतात! अद्भुतरम्य कल्पनेनेच रुक्ष मानवी जीवनाच्या असह्यतेची धार बोथट होण्यास मदत होते. पंचतंत्र, इसापकथा, 'डॉन क्विक्झोट' 'गलिव्हर्स ट्रॅव्हल्स' ' रॉबिनसन क्रुझो ' ' अरेबियन नाइटस् ' इत्यादि कथांची जगातील शाश्वत वाङ्मयात गणना झालेली आहे, ती यामुळेच!

काही गीतांतील शृंगार, करुण, अद्भुताचे नमुने पाहण्यासारखे आहेत. त्याचबरोबर कित्येक ठिकाणीं गूढ तात्विक समस्या टाकलेल्या असतात. व काहींत त्यागाची शिकवण वगैरे दिसेल. स्थलाभावास्तव फक्त एकेक उदाहरण काही थोड्याशा ओळीच उधृत करून, देतों.

"तुही पिवळी कंचोळी। भांगाची भांगजाळी।
तशी डोळ्याची पाकळी। बिचव्याचा मुखर!"

यातील धुंद करणारा शृंगारस

'आंबे मोहराचे नाही। तुझ्या घरात तांदुळ। जन्मजुग नाही।
मोर्चापुराची साखर। 'डुब्र'[१] तुव्हा शामी[२]। भीक मागल पाच घर।
सौभ्याग्याची तू नार। मागुन पसर पदर॥

यातील त्यागाची शिकवणूक

१ गरीब २ स्वामी

"गेला भरतार वंजेले । राइरंभा कोमावली ।
सासूऱ्या काहलींन[1] । वागुलींत[2] उडी घाली ।
बगलूल[3] ढाळे आसू । मातिसरी श्राप देई ।
आसाड्या[4] पडतिल मुखात सासूबाई ।
आला भरतार परतून । पाहे जव्हा काठाहून ।
त्याच्या करता तरंगे । (पानिग्राच्या वरी कोत)।
होवोन कमळण ? ॥१॥

यांतील अद्‌भुत आर्तता, किंवा

पहिल्या प्रहरीं स्वप्न पडीले । अर्थ कर पंडिता ॥धृ०॥
सखी सुंदरी, राजमंदिरी स्वप्न पडीले ।
जपुन् बाई मी जागी झाली उठून् ॥
आधी जन्मल बाळ मंग जन्मली बाळाची माता रे ऽऽऽ॥...
दुसऱ्या प्रहरीं स्वप्न पडीले, सपनांत आला आड ।
खाली नाडा वरती विहिर, आंत पाणि डळमळे हो ऽऽऽ॥

यांतील प्रत्येक प्रहाराचें स्वप्न सांगून, पंडिताचें चातुर्य जोखणारी तात्विक समस्या इत्यादि अयंत हृद्य आहेत. ताल (तलाव) व बारव (पायऱ्याची विहीर) यांचा रंगेल 'लाडझगडा' एका रूपक-कथेंत अति सुंदर रंगवून, त्यावरून नवराबायकोमधील प्रणय व्यक्त केलेला आहे.

लोकगीतांतील कांहीं रूढींचा व आचारविचारांचा उगम वेदांत सापडतो। व त्या त्या चालीरीती त्या त्या काळापासून कमीजास्त प्रमाणांत चालत आलेल्या दिसतात. कोणत्याहि घटनाचें मूळ कशांत आहे, हें अजमाविणें केवळ मनोरंजकच नव्हे तर, कोणत्याहि शास्त्रीय अभ्यासास आवश्यक आहे. उदाहरणार्थ वऱ्हाडमध्ये कापसाचा पहिला वेचा वेचण्याच्या पूर्वी, एक शुभदिवस पाहून 'सीतादेवी' करतात. याविषयी एक बरेंच मोठें गीत मजजवळ आहे. त्या दिवशी शेतांतीलच कापसाचें सूत काढून, त्याच्या लहान दोऱ्या विणतात व त्या पिवळ्या फडक्याचा पाळणा करून त्यास बांधतात. नंतर तो पाळणा एका

१ छळामुळे २ डोह असलेली लहान नदी ३ बगळा ४ किडे

मातीच्या राशीवर ठेवतात. त्यांत शेंदूर दही वगैरे टाकून सवाष्णी (सुवासिनी) गाणीं म्हणत सीतादेवींचें पूजन करतात. नंतर 'झाल्री' गव्हाचें जेवण देतात. सीता ही क्षेत्रदेवता आहे या चालीचें मूळ ऋग्वेदांतील खालील ऋचांत सापडतें.

अर्वाची सुभगे सीते वंदामहे त्वा।
यथा नः सुभगः ससि यथा नः सुफला ससि
इंद्रः सीतां नि गृह्णातु तां पूषानु यच्छतु
सा नः पयस्वती दुहामुत्तरामुत्तरां समाम् ॥

ऋग्वेद मंडल ४ सू. ५७-६-७

(भावार्थः—हे सीते आम्हाला चांगलें भाग्य व फळ दे. इंद्र तासाला आधार देवो. वगैरे,) यांतहि सीतेचें क्षेत्रदेवता असेंच वर्णन आहे.

वृक्षाच्या मुळया एकमेकांत गुंतलेल्या असतात तसेंच कांहीसे लोकगीतांचें झालें आहे. त्यामुळे त्यांचा काल ठरविणें कित्येक वेळा अशक्य होत असलें तरी कांहीं लोकगीतांच्या काळाचा अंदाज अशा उल्लेखावरून बांधतां येणें शक्य आहे. व त्याच्या अभ्यासाची ती एक दृष्टि होऊं शकते.

मृगाक्षींचें मृगनृत्य!

विदर्भाच्या उत्तरभागीं, सातपुड्याच्या गिरिकुहरांत व कांहीं इतरत्रहि नाग, शबर, भिल्ल, क्षत्रिय, गोंड, कोरकू, कोलाम, बंजारी, कैकाडी वगैरे अनेक वन्य आदिवासी जाती आहेत. विदर्भ देश आर्य- अनार्यांच्या संस्कृतिमिश्रणाचें केंद्र झालेला होता. महाभारत, वररुची, ऐतेरीय ब्राम्हण यांत दिलेल्या अनार्यांच्या यादींत गोंडाचें नांव सापडत नाही, तरी अनार्य गोंड हे भारतीय आर्यांइतकेच जुने आहेत असें म्हणण्यास हरकत नाही. गोंड हे मूळचे द्रवीडवंशीं आहेत. या जातींतून अनेक तऱ्हेचें प्राचनि अलिखित वाङमय उपलब्ध होऊं शकते. त्यापैकी कांहीं नृत्यगीतें तर अतीव बहारदार आहेत. नृत्यकला समाजाच्या सुरवातीस, अगदीच प्रथमावस्थेंत (Crude) असली तरी, भाषेचा त्या वेळीं विकास न झाल्यामुळे, आनंदोद्रेक वगैरे उत्छृंखल भाव व्यक्त करण्याकरता नृत्य हें फार मोठे साधन असलें पाहिजे. नृत्याचे तेच अवशेष जवळजवळ

त्याच प्रमाणांत आजहि या जातींत रेंगाळून राहिलेले दिसतात. या लोकांत नृत्याला अनुरूप अशीं विविध गाणीं आहेत. शृंगारसाज केलेल्या, निसर्गरमणीय वन्य युवती, कणखर युवकगणाबरोबर, सणाच्या प्रसंगीं दारूंत तर्रऽऽ होऊन, ढोलकीं वगैरे वाद्यांच्या तालयांत नागनृत्य, हरीणनृत्य इत्यादि नृत्य प्रकारांनी, आपल्या मनांतील सर्व भावनांचें तांडव बेहोष प्रकट करतात. विवाहित वधूला तिच्या प्रियकराने पळवून नेणें, सावकारांचा त्याच्यामागील [illegible] रेलवे ट्रेन, सडक-रूळ, इलेक्ट्रिक बल्ब या विषयींचें त्यांचें कुतूहल इ. विषय त्यांच्या गीतांतून व्यक्त होताना दिसतात. मुरडलेलीं शृंगें (आटी), लोंबती कर्णफुलें (टोपलीं), गळ्यांतील गुंजामाळा (मुंडाव), कोपरापर्यंत हस्तिदंती बांगड्या (बल्या), लहंग्यावरील वाटोळे बिल्लोरी व साध्या आरशाचे तुकडे (मुगा), पायांतील पितळेच्या वागऱ्या व घुंगरे (धांदऱ्या), या सर्वांच्या बाह्य नखशिखांत बारकाईच्या वर्णनाबरोबरच, एका निसर्गसुंदर वन्यरमणीच्या भरदार यौवनाचें व दिलखुलास मोकळेपणाचें वर्णन केलेलें एक गीत अती सुंदर आहे. मानवी संयमाचा चुराडा करणारें संमोहास्त्रच जणूं काय, या गीतांतील प्रतिमेच्या रूपाने समोर उभें आहे असें वाटतें! तें बरेच मोठे असल्यामुळे उधृत करण्याचा मोह आवरावा लागत आहे. गोंडाच्या एक दोन वैशिष्टय-युक्त गीतांतील भाग संक्षेपाने आणखी थोडे पुढे देतों.

आदिवासी लोकांचे वाङ्मय संग्रहीत करण्याचे बाबतींत व्हेरिअर एल्विन, श्री. शामराम हिवाळे, प्रा. शामचरण दुबे, प्रो. बी. सी. लॉ इत्यादिकांचे प्रयत्न उल्लेखनीय आहेत.

लोकवाङ्मयाच्या बाबतींत कथा, गीतें इत्यादिकांचा काळ ठरविणें, हा जसा अभ्यासाचा एक भाग होऊं शकतो, त्यापेक्षाहि जास्त सोपा व जास्त जरूरीचा असा अभ्यासाचा एक भाग म्हणजे कोणतें लोकगीत नक्की कोणत्या प्रदेशाकडील आहे हें ठरविणें. अशा तऱ्हेचे प्रयत्न आतापर्यंत बहुतेक कोणी केलेले दिसत नाहीत. याबाबतींत मी अल्पप्रयत्न केले आहेत. नमुन्याकरता दोन चंद्रपुरी गीतें खालीं उधृत करीत आहे.

"येऊन चहाळ नाही राह्यला । दुख असे नोको हे ।
मार्गेसरात झाली त्याची भेट । तवापासुन् डोऱ्याच ।
पानी नाही खळळल वऽऽ ॥१॥
दिसला नाही कही । मनात मैना झुरे ।
तुह्यावर म्या केली प्रीत ॥२॥
जगणं झालं कडू । ...... लेकाच का लागते ।
* कराव आपल्याले । दोन दिवस जगात वस्ती ।
कशी तरी भली बुरी ॥३॥
केळफुलाची पारी तुह्या करताच आहे । जिवाया राया येरे ।
हात लावुनश्यानी जाये ॥४॥
झुयझय् झुयझुय् वाहे नई । भग्भग् वाहात राह्ये वारा ।
माह्या मनातली तगमग् । दुखाची उरून राह्यली शीग ॥५॥
पड्ली घड्ली उबडी पान्यांत । ध्यान नाही राह्येल तिच्या कडं ।
आता येईल दाल्ला । घरी येऊन् जाईल ।
वीख पोटीं डहुळल वऽऽ ॥६॥
मित आली घाईस वऽऽ ।
येते कारीऽऽऽ सांग जो ॥७॥
मार्गेसरात झाली भेट । तव्हापासुन् डोऱ्याच ।
पाणी नाही खळळल वऽऽ ॥८॥

हें गीत मला येथे एका गोंडाकडून मिळालें. चंद्रपूरच्या भागाकडून वऱ्हाडांत येऊन त्याच्या दोन पिढ्या झाल्या. पहिल्या प्रथम हें गीत मी ऐकलें तेव्हा मला त्यांतील 'चहाळ' 'वस्ती' इत्यादि शब्दांवरून व 'माह्या' 'तुह्या' 'म्या' 'मि' (अत्यंस्वर ऱ्हस्व होण्याची वर्ण प्रक्रिया) इत्यादि प्रयोगावरून तें मला अस्सल वऱ्हाडी लोकगीत आहे असें वाटलें. चांद्याच्या कांही भागांतहि वऱ्हाडी बोलली जाते. पण फारच थोड्या. वरील गीताची घडणहि चंद्रपुरी गीतासारखी विशेष दिसली नाही. या गीतांतील मधल्या कांही ओळी मिळाल्या नाहीत. पण त्या गीतांतील 'नोको' 'डोऱ्याच' 'लावुन-

ऱ्यानी ' 'कारीऽऽ' 'वऽऽ' 'त' (मित) इत्यादि प्रयोगावरून हें गीत चांद्याकडील नसावें, याबद्दलचा संशय कमी झाला. चंद्रपुरी भाषेंत 'ल' च्या ऐवजी 'र' येतो. पूर्वकालवाचकाला 'शानी' जोडण्यांत येते. 'कारीऽऽ' हा शब्द हेल काढून प्रश्नार्थक उपयोजिल्या जातो. व कांही प्रसंगीं क्वचित् क्षोभ व्यक्त करण्याकरताहि. एकाद्याला हाक मारली व तो लवकर आला नाही म्हणजे किंचित् संतापून "एनेकारीऽऽ" असे हेल काढून म्हणण्याचा प्रघात आहे. "करतेकारीऽऽ" "देतेकारीऽऽऽ" वगैरे. "वऽऽ" बहुतेक प्रसंगीं हाकेला उत्तर देतांना व भावनांचें परिणामकारकत्व वाढविण्याकरता उपयोगांत आणतात. तेलगू भाषेचा चंद्रपुरी भाषेवर क्वचित् ठिकाणीं परिणाम होऊन 'अ' चा 'ओ' होतो. जसेः 'नोको.'

लोकगीतांतील ओळी कित्येक वेळीं नियमित नसतात. कधी कधी चरणांतील अक्षरांची संख्या ५ पासून १३ अक्षरापर्यंत दिसून येते. एका भागांतील लोक दुसऱ्या भागांत राहावयास गेले किंवा एकमेकांचा कांही कारणाने संबंध आला तर त्यांच्या भाषांत संघर्ष होऊन, एका भाषेंतलि शब्दप्रयोग दुसऱ्या भाषेंत घुसलेले आढळून येतात. कित्येक ठिकाणीं तर गीताच्या घडणींतहि थोडासा फरक पडतो. उ. वरील गीतांतच 'मनांत मैना झुरे' ही अस्सल लावणींतील ओळ आलेली आहे. 'प्रीत' हा शब्दहि तसाच वाटतो. 'झुय् झुय्' हाहि शब्दप्रयोग चांद्याकडील दिसत नाही. त्याचप्रमाणे कांही लोकगीतांत पद्यपंक्तिक्रम (Sequence of Stanzas) व क्वचित् एकसूत्रताहि दिसत नाहीत व कित्येक ठिकाणीं अर्थाची असंदिग्धताहि असते.

वरील गीतांत प्रियकराच्या विरहाबद्दलची आतुरता व्यक्त झालेली आहे. पारी शब्दाचा अर्थ आच्छादन असा आहे. केळफुलासारख्या असणाऱ्या उरोजभागाची सूचकता मनोहरच नव्हे तर मादक आहे. 'केळफुलाचें नुसतें आवरण तुझ्याकरता आहे' ही ओळ स्त्रीसुलभत्रपागर्भ आहे. मनांत उत्पन्न झालेलें प्रीतीचें तुफानी वादळ—पण तें संयमित शब्दांत व्यक्त करणारी प्रेयसी दर्शवून या गीताची काव्यात्मता वाढविण्यांत आलेली आहे. त्याचप्रमाणे गीतांतील 'मार्गेसरांत झाली भेट। तवापासून डोऱ्याच। पाणी नाही खळलल वऽऽ' या ओळीची पुन्हा शेवटी पुनरुक्ति करून गीताच्या परिणामकारतेंत

भर टाकण्याचा प्रयत्न केलेला आहे. दुसरें चंद्रपुरीगीत उपरोक्त गोंडाकडूनच मिळालें. हें दसऱ्याच्या सुमाराचें इनाईचें आहे.

कन्याची खरवड । वर तेलाची धार ।
जेवली लवकर । पडली ढकल ॥१॥
पुढचा धंदा गौराईले जड । सांग सांग सासूबाई ।
मला कोणचा धंदा ॥२॥
जाय जाय ग । बीन बंधनाची मोळी आण ।
मोळी पाह्यली । लडत बसली ॥३॥
सातही सर्प जमा झाले । एक सर्प म्हनते ।
काऊन काळजी तुले । दुख गेला तुम्हा सर्वा ।
ते बाईच्या मोळीले गुंडिले ॥४॥
घरा आली गौराबाई । सासुनी पाहिले ।
सर्प गुपत झाले ॥५॥
घ्या घ्या सासूबाई बीन बंधनाची मोळी ।
सासु म्हणाला लागली । भली ग भली ।
कौसलाची (कौशल्याची) पोरी ।
भरुन् इया (विया) तुला पुरी ॥६॥

या गीतामध्ये क्रियापदाचीं रूपें कर्त्याच्या लिंगाप्रमाणे बदलत नाहीत. उ. 'एक सर्प म्हनते.' 'दुख गेला' वगैरे. नपुंसक लिंगाबद्दल पुल्लिंग वापरलेलें आहे. 'दुख गेला' वगैरे. शिवाय 'काउन्' वगैरे. शब्दावरून हें गीत चांद्याकडील आहे असा कयास बांधतां येतो. मात्र "लडत" (बसली) हा शब्द अहिराणी व वऱ्हाडी भाषेंतहि वापरल्या जातो. या गीतांतील अद्‌भूतता कोणाच्याहि मनांत भरण्यासारखी आहे. सुनांचा छळ करण्याचे सास्वा कोणते कल्पकतापूर्ण मार्ग शोधून काढीत, त्याचें भेदक चित्र या गीतांत रेखाटलें आहे.

जबलपूरकडील भागांतील 'ऐनपुरांत गावरानि ताडी-रंगरोवान चाले इझनंगाडी' या ओळींनी सुरू होणारें, मी संग्रहीत केलेलें लोकगीत तरुण भारतच्या खास अंकांत (१९४५) प्रसिद्ध झालेलें आहे. गोंडवनच्या या

भागांतील कांही लोकगीतें किती आकर्षक आहेत पहाः (अ) वेली वेली। कंबरमे ढिली। अगे तुझी जानी। पिकल्या निंबाच्या वानी ॥१॥ मोहना जुनाल (जोडा?) मारी येऽऽऽ तुझि जानी। पिकल्या निंबाच्या वानी ॥२॥ (आ) लंबे लंबे सडक (बाल?)। निकल गया दूर। कई गब्रून मारा। उतर गया नूर ॥१॥ लंबे लंबे सडक बिछाट गिर्टा। बारा बज् गये दर्ग्या। देदेव शिटी ॥२॥ हात मे लोटा उसर गया दूर कइ। गब्रून मार। उतर गया नूर ॥३॥ हें गीत सडकेवर, रुळाने गिटी दाबण्याचें काम चाललें असताना म्हणतात, असें दिसतें.

वरील गीतांत मऱ्हेटी (हिंदीभाषेचा मराठीवर परिणाम होऊन ही मिश्रबोली झालेली आहे) व विशेषतः हळबी गोंडी, छत्तिसगडी व कतियाई या भाषांचें मिश्रण दिसून येतें. आणखी एक गीत याच भागाकडचें उधृत करतों. "रुपया देतो बहू। त्याचे घेऊं गहू। परकार करूं बहू। याऽऽऽ माझ्या रंगु गे ॥१॥ एकताटी आपन। दोघेजन जेऊ ॥२॥ रुपया देतो अरशी। त्याच्या घेऊ म्हशी ॥ याऽऽऽ माझ्या रंगु गे। आपण दोघेजन दोहू ॥२॥ रुपया देतो शंभर। त्याचा घेऊ नंबर। आपण दोघेजन वाहू गे ॥ आऽऽऽ माझ्या रंगु जीऽरे जीऽऽऽ ॥४॥ हरएक प्रकारची कामें करतांना, (तणस काढतांना, निंदणी करतांना, वगैरे) ग्रामीण, व वन्य स्त्रीपुरुष हीं गाणीं गाऊन आपले श्रम हलके करांत असतत.

साध्याभोळ्या गीतांच्या रूपाने मानवतेवर वात्सल्याचा पदर धरणाऱ्या, लावण्याचे रूपानें यौवनभरांतील अभिसारवृत्ति प्रकट करणाऱ्या, व पोवाड्याच्या रूपाने रौद्र दुर्गेप्रमाणे मध्येच चमकून जाणाऱ्या प्रतिभादेवीचीं विविध मनोज्ञ रूपें लोकवाङ्मय मंदिरांत दिसून आल्याशिवाय राहात नाहीत!

आजपर्यंत विद्वान रसिकांकरता पुष्कळ वाङमय लिहिलें गेलें आहे. लोकशाहीचा हा काळ असल्यामुळे जुन्या लोकवाङमयाच्या संशोधना बरोबरच, नवीन लोकवाङमयाची निर्मिती करून, वाङमय लोकाभिमुख करणें हें आजच्या साहित्यिकांचें कर्तव्य आहे. *

* प्रस्तुत लेखकाने मराठींतील निरनिराळया पोटभागांतील वैशिष्ठ्ययुक्त अशी साठएक गीतें संग्रहीत केलीं आहेत व ८०० ओळीचें 'सुलभ रामायण' अती सोप्या भाषेंत लिहिलेलें आहे. (प्रकाशित 'नवें जग' दिवाळी अंक)

प्रकाशसंचारी हंस

आजपर्यंत विदर्भातील मंदीरें–मूर्तींचे, कांही राजवटींचे व संशोधन-वाङ्मयाचे थोडेसे धागेदोरे हाती लागले असले तरी, ते बिंदुमात्र असून सिंधुमात्र हस्तगत व्हावयाचे आहेत! विदर्भाचे 'खणतीसंशोधनाचें' कार्य, अजून दोनशे वर्षे पुरेल असें डॉ. केतकरांनी म्हटलें आहे.

इतिहास–संशोधनाचा अवकाश अनंत–अज्ञात असून त्यांत राजवाड्यां-सारखा प्रतिभावान् प्रकाशसंचारी हंसच मुक्त संचार करूं शकणार! 'नांगरल्याविण भुई बरी, असे कितीतरी, शेतकरी सनदी तेथे कोण बदा? हजारातुनी एकादा' हें खरें असलें तरी, सर्व साधारण माणसानेंहि अशा प्रकारच्या ध्येयाशीं उत्साहानें तल्लीन होण्याचा स्फूर्तीमंत्र घेतला, तर त्याचाहि या प्रांतांत शिरकाव होणार नाही असें थोडेंच आहे? या क्षेत्रांत पंडितांपासून अशिक्षितापर्यंत कुणालाहि भाग घेणें शक्य आहे. कुठे एकादा जुना कागद किंवा वस्तु सापडल्यास ती एकाद्या संशोधनसंस्थेंत आणून टाकणें तर एकाद्या पोरासहि जड जाऊं नये!

जगन्नाथाचा विराट रथ पुढे ढकलला जावा म्हणून प्रत्येक व्यक्ति त्याला आपला हातभार लावणें जसें आपलें कर्तव्य मानी, त्याचप्रमाणे संशोधन शकटाचीं चकें दिवसानुदिवस प्रगत होण्याकरता, प्रत्येक व्यक्ति त्याला हातभार लावण्याचे मनांत आणील तर विदर्भीय संशोधनाला आंतर्राष्ट्रीय संशोधनक्षेत्रांत सन्मानाचें स्थान लवकरच मिळाल्याशिवाय कसें राहील?

# संशोधनक्षेत्रांतील मानकरी ७

## 'मानवतावाद' हाच स्थायीभाव !

विदर्भाच्या भूमींत गद्य-पद्य वाङ्मयाच्या शिव-शक्तीचा मुक्त संचार अनेक शतकांपासून चाललेला आहे. पहिल्या शतकांतील हालाच्या सप्तशतीचा व महानुभावीय वाङमयाचा उल्लेख मागे आलेलाच आहे. पहिल्या शतकापासून आतापर्यंतचा पद्य वांङ्मयाचा व तेराव्या शतकापासून आतापर्यंतच्या गद्य वाङमयाचा राजमार्ग मधून मधून कांही लहान लहान कालखंड सोडल्यास, अनेक नवनव्या पदपथ व वाटचालींना आपल्या बरोबर घेऊन ध्येयध्रुवाकडे चाललेला दिसून येईल.

विदर्भातच निर्माण झालेला चवथ्या शतकांतील महाराष्ट्री भाषेतील दुसरा महत्वाचा ग्रंथ म्हणजे वाकाटकवंशीय राजा प्रवरसेन याने लिहिलेला सेतुबंध होय. आपल्या कर्पूरमंजिरी सट्टकामध्ये प्राकृत भाषेच्या (महाराष्ट्री ही प्रमुख प्राकृत भाषा आहे) सुकुमारत्वाचे व सर्वजनप्रियतेचे 'पुरिसाणं महिलाणं जेत्तियमिहंतरं तेत्तियमिमाणं' (संस्कृत् व प्राकृत् भाषेच्या सुकुमारत्वांत पुरुष स्त्री इतके अंतर आहे) या शब्दांत राजशेखरने वर्णन केलेल्या महाराष्ट्री भाषेच्या ग्रंथातील स्वादुता कोठपर्यंत वर्णावी ?

करुणरसाची आसावरी आळविणारा भवभूती[1] 'भारवेरर्थगौरवम्' असे बिरुद मिळविलेला भारवी, अंतरंगांतील उभड-उमाळे स्वतःच्या अंगांतील रक्ताने व्यक्त करणारा गुणाढ्य[2], पदलालित्याचा प्रभु दण्डी, काव्यसतारीच्या

---

१. गोंदियापासून जवळच महाकवी भवभूती याचें पद्मपूर हें जन्मस्थान आहे. या पद्मपूरचा शोध आपल्या प्रांतांतील अग्रगण्य संशोधक प्राचार्य म. म. मिराशी यांनी लावलेला आहे.

२. याची जन्मभूमी वऱ्हाडमधील वाशीम ही आहे असे श्री. लक्ष्मण शास्त्री (कवि मयूर) गाडगे यानी सिद्ध केलेलें आहे. यवतमाळकरांना याचें भूषण

पहिल्या शृंगारतारेंतून रसराजाचा पंचम छेडणारा कवि पुष्पदंत[1] हे त्यांच्या 'यशःकायांना जरामरणज भय' नसलेले विदर्भाचे 'रससिद्ध' कवी होत!

त्याचप्रमाणे मराठीचे (जवळ जवळ ज्ञानेश्वराच्या तोडीचे) आद्य कवि मुकुंदराज[2] (कांही संशोधक हा मान चक्रधरास देतात!) पंजाब सारख्या परप्रांतात विदर्भीय पराक्रम गाजविणारे नामदेव (यांची कांही पद्यें शिखांच्या धर्मग्रथांत आढळतात.) स्नेहाळ भक्तिनीरांजने उजळणारी जनाबाई, सेवाधर्मातून अद्वैत पाहणारे एकनाथ, बृहद् रचना करणारे दासोपंत, सौंदर्य-संस्कारयुक्त काव्याचे निर्माते मुक्तेश्वर इत्यादि कवी-कवयित्रींनी आपल्या काव्यकृतींनी विदर्भाची भूमी धन्य केलेली आहे.

उपरोक्त कवींत कल्पनांचे भारद्वाज, भावनांचे भ्रमर, तत्वज्ञानाचे दिव्य मोती टिपणारे राजहंस व पारतंत्र्याच्या जाणीवेने तडफडणारे शुक आहेत. तसेच मानवतावाद श्वास–निश्वासांत भरून राहिलेल्या कवींबरोबरच केवळ आत्मरंगी रंगणारे 'अवलिये' कवी हि आहेत. किंबहुना 'मानवतावाद' हा आमच्या प्राचीन कवींच्या काव्याचा भक्तिमार्गाइतकाच प्रमुख असा स्थायिभाव आहे हें कोण नाकारूं शकेल?

---

वाटावयास हवें. गुणाढ्य कवीच्या आयुष्यांतील एका रोमहर्षक प्रसंगावर मी आठशे ओळीचें मुक्तछंदांत नाट्यकाव्य लिहिलें असून तें माझ्या इंग्रजी-मराठी काव्यसंग्रहांत प्रसिद्ध केलें आहे.

१. हा कवि राष्ट्रकूट राजाच्या आश्रयास होता. त्याने अपभ्रंश भाषेंत रचना केली आहे. त्याने इतर काव्याबरोबरच 'नायकुमारचरित्' हें नितांत मधुर असें शृंगार रसाने ओथंबलेलें कथा–काव्य लिहलेलें आहे.

२. ज्ञानेश्वराच्या अमृतानुभवामधील व मुकुंदराजाच्या विवेकसिंधूंतील कांही प्रकरणांत इतके विलक्षण साम्य आहे की, दोघांपैकी कोणीतरी एकाने दुसऱ्याच्या कल्पना उचललेल्या आहेत, असे म्हणण्याकडे कांही संशोधकांचा कल दिसतो. ज्ञानेश्वराच्याहि कर्तृत्वाचा कांही भाग विदर्भांत येतो.

या ठळक कवींबरोबरच इतर कवींच्या अनेक शाखा व त्यांत उदयास आलेले अनेक कवी विदर्भांत विखुरलेले आहेत. कांही संशोधक, गोदावरी तीरावरील परभणीच्या हंसराज कवीला विदर्भांतीलच, नव्हे तर सबंध महाराष्ट्रांतील पहिला अर्वाचीन कवी मानतात.

उमरखेडची उत्तम श्लोकाची व चिन्मयानंदाची, सुरजी अंजनगावची देवनाथाची, उमरावती जिल्ह्यांतील मारकीनाथाची व शिवदिन केसरीची अशा नाथ संप्रदायाच्या पांचही शाखा विदर्भांतच विस्तार पावल्या. उत्तम श्लोकांचा उत्कृष्ट ग्रंथ 'सप्तशतीवरील ओवीबद्ध' टीका हा होय. यास श्री. मा. श्री. अणे यांची प्रस्तावना आहे. हा उत्तमश्लोक मंडळीमार्फत प्रकाशित झाला. देवनाथ व दयाळनाथ यांची कविता प्रासादिक आहे. दयाळनाथांचा 'ये धावत कृष्णा बाई अति कनवाळे निजजनमनसरसमराळे' हा द्रौपदीचा धावा कुणाचें अंतःकरणास पीळ पाडणार नाही? ती श्री. अ. सि. साठे यांनी सटीप प्रकाशित केली. चिन्मयशाखेंतील 'पाताळकांड'चे कर्ते विठ्ठल किंकर इत्यादि चांगले कवी होऊन गेले. मारकी शाखेमध्येहि गोसावीनंदन इत्यादि अनेक कवी झाले. कारंजा येथील कल्याणशाखेच्या मठांत समर्थांच्या प्रमुख शिष्यांच्या परंपरेची यादी सांपडली आहे. पुसदच्या बाळकराम नांवाच्या यजुर्वेदीय ब्राम्हणाने रामदासी मठ इकडील भागांत स्थापन केले. फारशी, उर्दु व मराठी या तिन्ही भाषांवर सारखीच हुकमत असलेल्या अमृतरायाच्या कटावाने कांही काळ विदर्भभूमि निनादित झालेली होती. मराठी काव्यरचना करणारे अनेक कवी विदर्भांत होऊन गेले.[1]

तुजवर आम्ही फिदा!—

वरील कवींत वणी येथील गोविंद कवीचा उल्लेख जरा प्रामुख्याने करावा लागेल. त्याची 'तुजवर आम्ही फिदा, एकदा बोल पद्मलोचने' या ओळींनी

१. बैरामखानचा पुत्र अबदुलरहिम खानखानान हा स्वतः संस्कृत व हिंदी भाषेचा कवि होता. त्याच्या प्रशस्तीपर एक पूर्ण संस्कृत ग्रंथ उपलब्ध झालेला आहे.

सुरू होणाऱ्या पदांत केवड्याच्या पानांतील उन्मादक सुगंधश्री भरलेली आहे.' संतवाङ्मयांत भक्त स्वतःकडे पत्नीची भूमिका घेऊन विठ्ठलाकडे पतीची भूमिका देत असतो. त्या वाङ्मयांत परमेश्वर आणि भक्त यांचा प्रियकर-प्रेयसी असा संबंध अनेक ठिकाणीं आढळतो. उ० ज्ञानेश्वरींत अध्याय बारा मध्ये "**अर्जुना तो भक्तु । तोची योगी तोची मुक्तु । तो वल्लभ मी कांतु । ऐसा पढिये ॥**" या धर्तीची कल्पना आलेली आहे. अशा उत्कट प्रीतीचेंच पुढे भक्तींत रूपांतर होतें. रामकृष्ण परमहंस कात्यायनी व्रत स्वीकारून स्वतःला राधा समजून तीन दिवस अस्पर्श बसत.[२] (नुसते काल्पनिक नव्हे) कृष्णाच्या चिंतनाने त्यांचा सर्व देह राधामय बनून जाई.

ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम क्वचित मुक्तेश्वर इत्यादिकांची कविता वगळली तर मराठींतील बरीचशी संतप्रणीत कविता दुय्यम दर्जाची आहे असें म्हणावेसें वाटतें. कारण तेंच तें तत्वज्ञान वा तेच ते संकेत कवींनी प्रायः मांडलेले आहेत. या तऱ्हेच्या काव्यांत दोषहि विपुलतेने दृष्टीस पडतात. पदांतील कांही थोड्याच ओळी—विशेषतः सुरवातीच्या अति उच्च दर्जाच्या असून बाकीच्या त्या मानाने अत्यंत फिक्या असतात. एकाच पद्यांत परमेश्वर-कडे 'जननी' 'राजसे' 'सखे' अशा संबोधनांनी, आई व प्रियकरणीच्या

१. गोविंदकवीची 'जयकमलोद्भवकन्यके' व गुरुवरील 'स्तनतत्वमसि रस पाजुन मज उद्धरी' इत्यादि पदें भक्तीरसाने उचंबळलेलीं आहेत.

२. या भक्तीस मधुरभाव साधना म्हणतात. "मीं कित्येक दिवस राधाभावाने घालविलें. मी स्त्रियांसारखा वेष करी व स्त्री वेषासाठीं लागणारे सर्व जिन्नस व दागिने मला मथुरने आणून दिले. १९ ठिकाणचे भाव एकाच ठिकाणीं प्रकाशित झाल्यास त्यास महाभाव म्हणतात. जन्मभर साधना करून साधक एकाद्या भावाची सिद्धि मिळवितो. इथे मात्र एकाच धाराने एके ठिकाणीं १९ ही भाव पूर्णपणे प्रकाशित होतात. स्वाधिष्ठान चक्र असलेल्या भागाच्या सर्व रोमकूपांतून, दर महिन्यास ठराविक वेळीं शोणितस्राव होत असे. आणि तो स्त्रियाप्रमाणे तीन दिवस चाले. श्रीरामकृष्णचरित्र पानें १३८ व ३२८. त्याचप्रमाणे उमरावतीचे गुलाबरावमहाराज बांगड्या घालून व काजळकुंकू लाऊन याच पद्धतीने भक्ति करीत.

भावनेने पाहिलेलें असतें. तशीच पुनरुक्तीहि दिसते ! व्याकरणदुष्ट प्रयोग (रुन, लिला) इ. तर अनेक असतात. कांही ठिकाणीं छंद शिथील वा चुकलेला असतो. इतकें असूनहि या काव्यांतील रसाळपणावर रसिक एवढा लोभावतो की हे सारे दोष त्यांच्या लक्षांतहि येत नाहीत ! हृदयांतील ज्वलंत जिव्हाळाच ( High sincerity ) कवितेंत एवढें सामर्थ्य ओतूं शकतो यांत शंका नाही. " We want something genuine ( which finds an ever surer and surer stay ) rather than original " या कार्लाईलच्या दृष्टीने या काव्याकडे पाहिल्यास ही कविता विदर्भीयास आपुलकीची वाटावयास हरकत नाही.

विदर्भांतील संत कवींत कृष्णमुनी ख्यालीबहादुर, माहूरचे विष्णुदास, व सध्याचे तुकडोजी महाराज यांच्या कवितांचा उल्लेख करावयास पाहिजे. कृष्णमुनींचा कलगी तुऱ्यांचा आखाडा प्रसिद्ध आहे ! विष्णुकवींची कविता विरागी–विलासी आहे ! तुकडोजीच्या ' खंजिरींत ' बहुजन समाजाला खेचण्याची शक्ति आहे. त्यानंतरच्या विदर्भाच्या पुढील कवींत, कविसम्राट केशवसुत[1] ' व 'बी' यांच्या कवितांनी तर विदर्भकाव्ययशावर सुवर्णाचा कळसच चढविलेला आहे. दुःखाची गोष्ट येवढीच की, विदर्भाची कृषि व काव्य हीं दोन खास वैशिष्टयें असतांना, पहिल्याबद्दल जरी जनतेला तीव्र जाणीव असली तरी दुसऱ्याबद्दल मात्र कवडीचीहि कल्पना नाही. अगोदर काव्याबद्दल ( कांही चार दोन कवी व रसिक सोडून ) चर्चा बहुशः निघतच नाही. व निघाली तरी उत्तरराम चरित्रांतील ऋषिकुमाराच्या शब्दांत 'अश्व अश्व म्हणतात, तो हाच काय ? ' अशा तऱ्हेच्या खाक्याने " काव्य काव्य म्हणजे तें हेंच काय ? " अशासारखा बावळट प्रश्न सुद्धा विचारण्याची लोकांची जिज्ञासा दिसून येत नाही ! वरील कवींपैकी बहुतेक कांही संशोधकांनी, संशोधनाच्या साह्याने अंधारांतून उजेडाकडे आणण्याचे प्रयत्न केलेले आहेत, ही मात्र त्यांतल्या त्यांत भाग्याची गोष्ट आहे !

१ केशवसुतांना आमच्या विदर्भात ओढण्याचा मोह अनावर होत आहे ! विदर्भाच्या प्राचीन सीमा लक्षांत घेतल्यास हें शक्य होईल काय ? नसल्यास विशेष खळखळ घालीत नाही !

## विदर्भातील राजघराणीं व पंडित परंपरा

पेशवे दरबारच्या कारभारामध्ये प्रामुख्याने ज्यांनी भाग घेतला असे सरदार भवानी काळू, देवाजीपंत चोरघडे इत्यादि अनेक इतिहासप्रसिद्ध घराणीं विदर्भांत (नागपुरांत) झालेलीं आहेत. त्याचप्रमाणे चिटणवीस, जामदार, कोल्हटकर, काळीकर, बक्षी, मुनशी, फडणवीस, गुजर, उपाध्ये, कप्तान इत्यादी घराणींहि उल्लेखनीय आहेत. नागपूरकर भोसले, किल्लेवाले गोंडराजे, चांदाचे गोंडराजे, एलिचपूरकर नबाब, शिंदखेडचें राजे जाधवराव घराणें, माहुरचे राजे उदाराम इ. घराणीं अद्याप हयात आहेत.

विदर्भातील प्राचीन पंडित परंपराहि विदर्भास भूषणभूत आहे. यादवकालीन पंडित हेमाद्रि बोपदेव यांचीं नावें कोणाच्या स्मृतिपटलावर कोरलीं गेलीं नाहीत ? रघुजी भोसल्याने मोठ्या पराक्रमाने आपलें वर्चस्व गोंड राज्यावर प्रस्थापित केलें. त्यानंतर भोसल्याच्या कारकीर्दींत, अखेर अखेर राजाश्रयाने अनेक पंडित घराणीं अस्तित्वांत येऊन, नागपूर हें एक महान सांस्कृतिक केंद्र बनलें होतें. वैय्याकरणकेसरी सदाशिवशास्त्री घुले,[१] गंगाधर शास्त्री मंगरूळकर, म. म. भट्टजीशास्त्री घाटे (जन्म तळेगाव दशसहस्त्र वऱ्हाड) प्रिं. केशवरावजी ताम्हन, श्री. पंढरीनाथशास्त्री घाटे, श्री. बाळशास्त्री घाटे इ. विद्वद्रत्नांनी धर्म, न्याय, व्याकरण, ज्योतिष, अलंकार इत्यादि शास्त्रांच्या ग्रंथांत मोलाची भर घातली. वरील बहुतेक सर्व राजवटीचे व कांही पंडितांच्या ग्रंथाचें संशोधन, आजच्या संशोधकांनी करून त्यांचेवर नवीन प्रकाश पाडलेला आहे.

---

१ नागपुरचे राजे रघूजी दुसरे व मुधोजी भोसले यांच्याजवळ अनुक्रमें वीरराघवाचार्य व कृष्णशास्त्री रामानुज असे पंडित–पहेलवान (!) होते. त्यापैकी कोण श्रेष्ठ म्हणून ठरविण्याकरता काशीवरून सदाशिव भट्टास पाचारण करण्यांत आलें. उपरोक्त पंडितांचा एकवीस दिवस वाद चालून दोघेहि 'पाडास पाड' आहेत असा सदाशिव भट्टानी निकाल दिला व राजांनी त्यात जहागिरी देऊन नागपुरांतच ठेऊन घेतलें. त्यांच्या शेखरनिवृत्ति इ. ग्रंथामुळे त्याचें नांव अजरामर झालेलें आहे.

# सुरवातीचें संशोधन

## मानाचा अर्घ्य

संशोधनापासून जसा इतिहास बनतो, त्याचप्रमाणे प्राचीन इतिहासांतहि संशोधनाला वाव आहे. संशोधनाचें ऐतिहासिक ( पुराणवस्तु वा खणती ) संशोधन व वाङ्मयीन संशोधन असें वर्गीकरण करतां येईल. पहिल्या प्रकारच्या संशोधनांत ताम्रपट, शिलालेख इत्यादिकांच्या साह्याने केलेल्या संशोधनामुळे नवीन माहिती उपलब्ध होऊन, ऐतिहासिक शास्त्रशुद्ध निष्कर्ष मांडतां येतात; तर दुसऱ्या प्रकारच्या संशोधनामुळे बहुशः जुन्या वाङ्मयांत, अगोदरच उपलब्ध असणाऱ्या साधन-सामग्रीला व अपसिद्धांतांना वगैरे सत्याच्या निकषावर घासून नवीन पद्धतशीर स्वरूप देण्यांत येऊन, नवीन प्रमेयें अस्तित्वांत आणतां येतात. आतापर्यंत संशोधकांनी ऐतिहासिक संशोधनापेक्षा वाङ्मयीन संशोधनांतच जास्त प्रमाणांत शिलेदारी केलेली आहे.

महाराष्ट्रांतील संशोधनसूर्य म्हणून सर्वप्रथम वि. का. राजवाडे यांना मानाचा अर्घ्य दिला पाहिजे. त्यानंतर लो० टिळक, डॉ. भांडारकर, डॉ. भाऊ दाजी, शं. बा. शास्त्री इत्यादि संशोधनताऱ्यांना प्रणाम करावयास हवा. डॉ. सरदेसाई,[1] डॉ. केतकर, (समाजशास्त्रज्ञ व संशोधक) चिंतामणराव वैद्य, शं. श्री. देव, द. ब. पारसनीस, रा. रा. भागवत, वासुदेवशास्त्री खरे, का. ना. साने, शं. तु. शालिग्राम, द. बा. पोतदार, ग. ह. खरे इत्यादि संशोधन-तेजोगोलक त्यानंतर अभिवादनास पात्र आहेत. (अखिल भारतीय कीर्तीचे दयाराम साहनी, डॉ. मुझुमदार इत्यादिकांचीं नांवें सहजच डोळ्यांसमोर उभीं राहतात.)

## संशोधनाची पहिली पिपाणी

राजवाड्यांनी महाराष्ट्रांत संशोधनाची तुतारी फुंकण्यापूर्वी तीस पस्तीस वर्षे अगोदर, व वा. दा. ओक यांच्या काव्येतिहास संग्रहास सुरवात होण्यापूर्वीच

१ रियासतीचे खंड, मराठ्यांच्या इंग्रजी इतिहासाचे खंड, व पेशवे दप्तराचे पंचेचाळीस भाग प्रकाशित करून यांनी इतिहास रचनेचें मोटें कार्य केलेलें आहे.

(इ. स. १८९०) वणीचे (जि. यवतमाळ—वऱ्हाड) सत्पुरुष आप्पाजी महाराज ढुमे यांचे वडील, निळकंठ लक्ष्मण ढुमे उर्फ सरमुकद्दम यांनी, संशोधन कार्याची पहिली पिपाणी वाजविली. त्यामुळे विदर्भांत आद्य संशोधकाच्या मानाचा टिळा त्यांच्याच भालप्रदेशावर कायमचा झळकत राहील! स. १८६२ मध्ये त्यांनी वणीचा इतिहास गोंडाच्या बखरी, छंद, पोवाडे जमीनदाराच्या सनदा, भोसल्याचा इतिहास यांच्या आधाराने लिहिलेला आहे. या इतिहासांत त्यांनी चंद्रपूरच्या राजघराण्याची वंशावळ प्रारंभापासून दिलेली आहे. हा इतिहास अद्यापि अप्रसिद्ध आहे. जीनविजय नांवाच्या संस्कृत ग्रंथाधारें पांडवादिकांचे काल, 'श्रीकृष्ण लीलामृत कथासार[१]' या स्वतःच्या इतिहास ग्रंथांत नमूद करण्याचा त्यांनी प्रयत्न केलेला आहे. उ. भारत शक ९०३, प्रमाथी संवत्सर, मार्गशीर्ष शु॥ प्रतिपदा, हा भारतीय युध्दाचा काळ त्यांत दिलेला आहे. (पृ. १२९) या मित्याकरता तरी हा ग्रंथ अभ्यासूंना आवश्यक होण्यासारखा आहे. आजच्या संशोधनाच्या मानाने निळकंठरावांचें संशोधन तेवढेसें निर्णायक वाटत नसलें तरी, संशोधनाच्या उद्गमकालांत संशोधकाची बुद्धि बहुशः पंचहत्यारी तट्टू (ज्याला चालविण्याकरता, स्वाराला दोन हात दोन पाय व तोंड यांचा उपयोग करावा लागतो! वरचेवर अडखळणारे घोडें) प्रमाणे कृति करीत असतां सरमुकद्दम यांच्या बुद्धीने अल्पांशीं तरी अरबीअश्वाप्रमाणे कृति[२] केली, याचें कोणास आदरमिश्रित कौतुक वाटणार नाही? त्यांचे बरेचसे ग्रंथ अजूनहि प्रकाशित न होतां शारदाश्रमाच्या दप्तरांत धूळ खात पडले आहेत हें कशाचें लक्षण?

खास ऐतिहासिक संशोधनाच्या बाबतींतील अग्रपूजेचा मान भोसल्याच्या दरबारचा रेसिडेन्ट रिचर्ड जेंकिन्स याचा आश्रित श्री. विनायकराव औरंगा-

१. हा यांचा एकच ग्रंथ नागपूरचे रावबहादूर गोपाळराव बुटी यांच्या आश्रयाने १८९५ मध्ये प्रकाशित झाला. यांत श्रीकृष्णापासून व्हिक्टोरीया राणीपर्यंतचा हिंदुस्तानचा इतिहास आणला आहे; तो कांही ठिकाणीं चुकीचा आहे. त्यांनी वैद्यक व जगाचा भूगोल या विषयावरहि ग्रंथ लिहिले आहेत.

२. यांनी छंदशास्त्र वगैरे सारख्या कठीण विषयावर ग्रंथ लिहिण्याचा प्रयत्न केला आहे.

बादकर या विद्वानाकडे जातो असें म. म. मिराशींचें मत आहे. छत्तीसगड विभागांतील अनेक शिलालेख व ताम्रपट इत्यादि कोरीव लेखांचें पहिल्याप्रथम यशस्वी वाचन उपरोक्त विद्वानानेच केलेलें आहे.

त्याचप्रमाणे विदर्भांत दुसरीकडेहि इतिहास संशोधनाचे त्यावेळीं लहान सहान प्रयत्न चाललेले होते. सुमारें साठपासष्ट वर्षांपूर्वी एलिचपूरचे खतीब खानबहादुर अजमत यांच्या वडिलांनी तवारिख-इ-अजमती नांवाचें वऱ्हाडच्या इतिहासाचें एक पुस्तक पर्शियन भाषेमध्ये लिहिलेलें होतें.

वेलस्लीने कलकत्यास स्थापलेल्या फोर्टवुइल्यम कॉलेजमध्ये मराठीचा अध्यापक असलेला, व बंगालमधील श्रीराम मिशनचे मुख्य डॉ. कॅरी यांच्या मराठी भाषेच्या व्याकरणास हातभार लावून, मराठी भाषेसंबंधी प्रयोग करणारा नागपुरस्थ पंडित वैजनाथ शास्त्री कानफाडे, याचेंहि नांव येथे उल्लेखनीय आहे.

### सुधारणेचा अललाम !

आपल्या प्रांतांत संशोधन कार्याचा खराखुरा आरंभ करणारे यथार्थनाम अध्वर्यु नीलसीटी हायस्कूल मधील मुख्याध्यापक कै. हरि माधव पंडित हे होत. ते उत्कृष्ट संस्कृतज्ञ पंडित होते. संशोधकास आवश्यक असणारी सत्यान्वेषण बुद्धि, निरभिनिवेशता, मार्मिकपणा इत्यादि गुणामुळे, त्यांचें संशोधन उच्च दर्जाचें असें. देशसेवक पत्र चालवून, त्यांनी आपल्या लोकजागृतीच्या कार्याचें केंद्र जरी नागपूर हें केलेलें असलें, तरी त्यांनी आपल्या कार्याची कक्षा मुंबईपर्यंत वाढविलेली होती. ते बरेच दिवस विविधज्ञानविस्ताराचे संपादक असत. परंतु त्या मासिकावर संपादक म्हणून त्यांचें नांव नसें. त्यांनी स्वतः विस्तारांत अनेक विषयावर (ऐतिहासिक बखरी वगैरे) लेखन केलें. परंतु त्यांच्या प्रसिद्धिपराङ्मुखतेमुळे तें टोपणनांवाने किंवा बिननांवाने मुद्रित आहे ! काव्यसंग्रहांतून प्रसिद्ध झालेल्या जुन्या मराठी कवीच्या काव्यावरील पुष्कळशा टीपा पंडितांनी लिहिलेल्या होत्या. वि. ज्ञा. विस्तारांत ज्यावेळीं पंचवटीस्थलनिर्णयाच्या वादास के. हि. लक्ष्मणराव यांनी सुरवात केली तेव्हा दोन्ही पक्षांचें म्हणणें विचारांत घेऊन, हरि माधव पंडित यांनी त्या वादाचा समारोप अत्यंत मार्मिक व समतोल बुद्धीने केला होता. पंडिताकडे त्यावेळीं

निळकंठराव उर्फ बापुसाहेब भवाळकर, म. म. कृष्णशास्त्री घुले, नारायणराव अळेकर इत्यदि तरुण मंडळी जमत असत. त्या मंडळींना हरिपंतापासूनच चालना मिळाली. या प्रांतांत सुधारणेचा अललाम (झेंडा) पहिल्याने उंन्नावण्याचा विक्रम घडवून आणणारे धुरंधर, पंडितच होत. यावेळीं त्यांच्या सुधारकी मतांचा परिणाम होऊन म. म. कृष्णशास्त्री घुले यांनी 'पतितोद्धार मीमांसा' हा संस्कृत प्रबंध स्वतःचें नांव न देतां प्रसिद्ध केला. त्यांतील बिनतोड युक्तिवाद व धर्मशास्त्राचे आधार यामुळे त्यावेळीं तो निबंध विद्वानवर्गांत फार गाजला होता. (त्याचप्रमाणे पुनर्विवाहाची चळवळ या प्रांतांत याच वेळीं दृढमूल झाली) पंडितसम्राट घुले यांच्यासारख्या वैदिक धर्माभिमान्याचे देखील स्फूर्तिस्थान होणाऱ्या हरिपंताच्या कर्तृत्वाची तारीफ कोठवर करावी! परप्रांतांतून येऊन, विदर्भांत समाज व साहित्य या विषयींच्या नूतन कल्पनांच्या कल्पतरूचें बी रुजविण्याचा प्रयत्न करणाऱ्यांत हरिपंताचें नांव नेहमीच वरच्या श्रेणींत राहील! नवतत्व प्रणालीच्या आगमनाची चाहूल देणाऱ्या अग्रदूताचें दर्शन समाजाला वा वाङ्मयाला 'खंजन'[1] पक्षाप्रमाणेच शुभ व प्रेरक झाल्याशिवाय राहात नाही. व त्यांचींच नांवें कोणत्याहि प्रकारच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिलीं जातात.

हरिपंताच्या प्रभावळींत (प्रामुख्याने वा. दा. ओक, यांचेबरोबरच) नावीन्याचें निशाण फडकविणाऱ्या घंटय्या नायडू व श्री. के व्ही लक्ष्मणराव (दोघेही तेलगू ब्राह्मण) यांचा समावेश होतो. नायडू यांनी मेघदूताच्या धर्तीवर 'मैना' नामक निर्यमक खंडकाव्य लिहून काव्य-सनातनांच्या उरांत पहिली धडली भरविली! व जीर्णमताच्या तालावर नाचणाऱ्या काव्यदेवीचा एक पायबंद खुला करून तिला मुक्ततेच्या मार्गावर आणून सोडण्याचें श्रेय घेतलें. त्यामुळे त्यावेळच्या प्रतिष्ठित टीकाकारांनी त्यांच्यावर सणसणीदार टीका केली होती! त्याचप्रमाणे त्यांनी 'मराठी भाषेची पूर्वपिठीका' हा लेख लिहून, सोमायागाच्या तृतीय सवनांतील चढत्या सुराप्रमाणे, पहिल्यापेक्षांहि दुसरा श्रेष्ठ असा अभियोग करून दाखविला! राजाराम शास्त्री भागवत यांच्याहि आगोदर मराठी भाषेच्या रूपसिद्धीच्या (कानडी, तेलगू, गोंडी इ. व

१. खंजनदर्शन—वराहमिहिर. या पक्षाचा थवा गव्हाच्या हंगामाच्या सुरवातीस, महाराष्ट्रांत परप्रांतातून येतो.

मराठी भाषेंतील साम्यस्थळें पाहून व व्याकरणविषयक विकासाच्या अज्ञातदालनाकडे महाराष्ट्र संशोधकांचें त्यांनी लक्ष खेचलें ही घटना अचंबर नाही असें कोण म्हणेल ? कवि, ग्रथंकार व भाषाशास्त्रज्ञ या तिन्ही नात्यांनी ते मराठी भाषाभीज्ञांच्या आदरास पात्र झालेले आहेत. के. व्ही. लक्ष्मणराव यांनीहि 'विज्ञान सर्वस्वमु आंध्र विश्वकोशा' चें काम हरिपंताच्याच देखरेखीखाली पुरें केलें. हे दोघे विद्वान मद्रासी गृहस्थ असूनहि त्यांनी जी मराठी भाषेची सेवा केली आहे, ती मराठी वाङ्मय-शारदेच्या दरबारांत कायमची रूजूं आहे !

शलभ-शरभ संग्राम !

नारायणराव अळेकर यांनीहि ऐतिहासिक संशोधनाकडे लक्ष पुरविलेलें होतें. कै. दत्तात्रय बळवंत पारसनीस यांनी ब्रम्हेंद्रस्वामींचा जो पत्रव्यवहार प्रसिद्ध केला होता, त्यास 'तेलातुपाचे कागद' म्हणून राजवाड्यांनी ब्रम्हेंद्र स्वामींचा त्याचबरोबर कै. पारसनिसांचा आपल्या पद्धतीप्रमाणे खरपूस समाचार घेतला ! राजवाड्यांच्या लिखाणास प्रत्युत्तर देणें म्हणजे शलभाने शरभाशीं[1] टक्कर देण्याइतकेंच धाडसाचें होतें; अशी स्थिति असताहि नारायणराव अळेकर यांनी सुमारे दोनशे पृष्ठांचा निबंध लिहून राजवाड्यांचीं मतें खोडून काढण्याचा प्रयत्न केला ! त्यांनी ऐतिहासिक कागदपत्रेंहि गोळा केलीं होतीं; परंतु ते पुढे राजकारणांत पडल्यामुळे त्यांनी तीं पांडोबा पटवर्धन यांच्या स्वाधीन केलीं.

हरिपंत पंडितांच्या संशोधन कार्यांतील उजवे हात म्हणजे वा. दा. ओक हे होत. आतापर्यंत विदर्भ संशोधन येवढेसें नांव घेण्याच्या योग्यतेचें झालें नव्हतें. विदर्भ संशोधन–शिशूच्या नामाभिधानाचा "त्रिविक्रम[2] समारंभ" हरिपंत पंडित व वामनराव ओक या द्वयींनी साजरा केला असें म्हणतां येईल.

१ शरभः–सिंहाच्या आकाराचा व गरुडाच्या मुखाचा एक शक्तिमान काल्पनिक प्राणी. हा सिंहालासुद्धा लीलेने उचलून नेतो.

२ बारशाच्या दिवशीं मुलाचें नांव ठेवतांना कुंची घातलेला नारळ पाळण्याच्या खालून वर व वरून खाली देतात तो समारंभ.

ओकांकडे १८९० सालीं काव्येतिहास संग्रहाचें काम आलें. मराठीचे शिवाजी विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्याशीं वा. दा. ओक यांनी ' यमकबद्ध कवितेचा पहिला पुरस्कर्ता कोण ? ' व ' मोरोपतांची कविता. ' इ. बाबतींत छोटीशी 'हातपराजी' केली होती. ते रायपुरावरून आपले कार्य चालवीत. त्यांनी काव्यसंग्रहांत मुक्तेश्वर, मोरोपंत, उद्धवचिद्घन वगैरे कवींच्या ग्रंथांच्या सटीप आवृत्त्या मधून मधून प्रकाशित केल्या. मोरोपंतांच्या कर्णपर्व व आदिपर्वा-च्याहि आवृत्या त्यांच्याकडून तयार झाल्या. त्यांनी भरपूर टीपा वगैरे देऊन ग्रंथरूपानें अनेक कवींना पुनर्जन्म दिला ! त्यापैकीं देवनाथ व वणीचे गोविंद कवी हे होत. हें त्यांचें विदर्भावर खरोखरच फार मोठें ऋण झालेलें आहे ! अनेक बखरींतील दुर्बोध स्थलांचें स्पष्टीकरणहि त्यांनीं विस्तृत टीपा देऊन केलें आहे. त्यांनी सान्यांच्या सहकार्यानें नागपूरकर भोसल्याचें कागदपत्र प्रकाशित केलेलें आहेत. त्यांच्याकडे या प्रांतांतील निरनिराळ्या भागांतील विद्वान कागदपत्रें व पोथ्यांचें संकलन करून पाठवीत असत.

### संशोधन-क्षेत्रांतील रथी-महारथी

त्यानंतरच्या काळांत श्री. या. मा. काळे, म. म. कृष्णशास्त्री घुले, डॉ. के. ल. दप्तरी, प्रा. म. म. मिराशी, महंत दत्तलक्षराज व त्यांचे शिष्य बाळकृष्णशास्त्री, प्रिं ह. ना. नेने, श्री. नि. ब. भवाळकर, डॉ. शं. दा. पेंडसे, प्रा. श्री. ना. बनहट्टी, डॉ. रावबहादुर हिरालाल, पंडित लोचन प्रसाद पांडेय, डॉ. हिरालाल जैन, डॉ. तु. ज. केदार व सापेक्षतेने तरुण पिढींतील श्री. वा. ना. देशपांडे, डॉ. वि. भि. कोलते, श्री. शं. गो. चट्टे, डॉ. मा. गो. देशमुख, श्री. दे. गो. लांडगे इत्यादि संशोधकांनी संशोधनक्षेत्रांत मुलुखगिरी करण्यास सुरवात केली.

### कै. श्री. या. मा काळे.

विदर्भ संशोधन–क्षेत्रांत यादवराव काळे यांची कामगिरी फार मोलाची आहे. सुरवातीला त्यांनी लोणार वर्णन लिहिलें. १९०५ सालीं त्यांनी जो वऱ्हाडचा छोटासा इतिहास लिहिला, त्यावरच वाचक त्यासंबंधीची आपली भूक भागवीत होते. पण त्यानंतर त्यांनी पुढे कित्येक वर्षे क्रमशः माहिती गोळा करून, खि. पू. सरासरी चारशे वर्षांपूर्वीपासून तो आंग्लशासन

कालापर्यंतचा (शेवटचीं कांहीं वर्षे सोडून) वऱ्हाड प्रांताचा विस्तृत इतिहास तयार केला. या ग्रंथांत वऱ्हाडांतील भौगोलिक रचनेच्या पार्श्वभूमीवर राजांच्या वंशावळी, राज्यक्रांत्या, राजकीय[१], औद्योगिक, सामाजिक परिस्थितिबरोबरच वऱ्हाडी भाषा व वाङमयाचाहि परामर्ष त्यांनी घेतलेला आहे. विदर्भांत घडलेल्या बहुतेक हर्षामर्षादि प्रसंगाचें व वैशिष्ट्ययुक्त स्थलांचें त्यांत वर्णन केलेलें आहे. त्यांत रायबागण, उदाराम करंवडकर देशमुख वगैरे ऐतिहासिक पुरुषांसंबंधी नवीन माहिती त्यांनी प्रथमच उजेडांत आणलेली आहे.[२] श्री. गो. स. सरदेसाई यांनी या ग्रंथांतील पुनरुक्ति वगैरे दोष दाखविलेले असले तरी त्याची इतर बाबतींत मुक्तकंठाने स्तुतीच केलेली आहे.

या ग्रंथांतील विशेष गुण म्हणजे हा इतिहास लिहितांना श्री. काळे यांनी प्राचीनांविषयींची आदर व चिकित्सा बुद्धि या दोहींसहि समसमान राखलेलें आहे ! संशोधनाचार्य श्री चिं. वि. वैद्यासारख्या विद्वानाचें "हा इतिहास वऱ्हाडांत राहणारास, किंबहुना सर्व हिंदुस्थानच्या इतिहासकारास फारच माहितीचा असल्याने, अवश्य संग्रहणीय झालेला आहे" हें मत येथे उधृत केलें म्हणजे, या ग्रंथाच्या महत्वाविषयी जास्त लिहावयास नकोच. त्याचप्रमाणे त्यांचा नागपूर प्रांताचा इतिहासहि असाच महत्वाचा आहे. श्री काळयांचें संशोधनविषयक एक मोठे वैशिष्ट्य म्हणजे "पद्धतशीरपणा." तो त्यांच्या ग्रंथांत जसा दिसून येतो तसाच त्यांच्या इतर लेखांतहि दिसून येतो ! जेवढें केलें तेवढें भरीव ! (solid) विदर्भांतील कांही नाणावलेल्या संशोधकांत 'नानीचा भतिजा !' (दूरचे नातें; दूरान्वय) या न्यायाने संशोधन करून, दिसली ती बाब 'उष्टी' करून ठेवण्याची खोड दिसते ! जांभळांतील मोठ्या बी प्रमाणे विस्तार व त्यांतील छोट्याशा गराप्रमाणे विकास ! अशी त्यांच्या संशोधनाची कित्येक वेळी स्थिती झालेली असते ! सुदैवाने हें काळ्यांच्या संशोधनांत दिसत नाही.

१ जमीनधान्याची पद्धति वगैरे.

२ सील या नांवाच्या बंगाली गृहस्थानेहि History of C. P. & Berar या नांवाचा इंग्रजी ग्रंथ सुमारे बावीस वर्षांपूर्वी लिहलेला आहे. श्री. ऐय्यर यांनीसुद्धा History of C. P. Berar हें पुस्तक लिहिलेलें आहे.

श्री. काळे यांची बुद्धि कायम ठशाची नसून, त्यांच्या संशोधनांत अस्पृष्ट विषयाला हात घालणारी स्वतंत्र बुद्धीहि कांही अंशीं व्यक्त झालेली दिसून येते. त्यांच्या मृत्यूमुळे अर्धवट राहिलेला वाकाटकांचा इतिहासच याची साक्ष देईल! वाकाटकांच्या घराण्यावर आज मितीस बराच प्रकाश पडला आहे. पण इतर संशोधकांचें या बाबतींत लक्ष वेधण्यापूर्वीच कितीतरी वर्षे, श्री. काळे यांनी या विषयावरील साधन सामग्री गोळा करण्याचा उद्योग करून, तो अर्धा अधिक लिहूनहि ठेवला होता. श्री. काळयांनी 'गोंडाचा इतिहास' हा ग्रंथ लिहून मानव जातीविषयक शास्त्रांतहि 'सूतोवाच' केलेलें दिसतें! विदर्भसाहित्य संशोधनास वाहिलेलें मासिक काढावें अशी त्यांची महत्वाकांक्षा होती व राजवाड्यांनी त्यांना हवें तेवढें सहाय्य करण्याचें कबूलहि केलें होतें. पण त्यांच्या मृत्यूमुळे तीहि त्यांची महत्वाकांक्षा त्यांच्या मनांतच राहिली! त्यांच्या फुटकळ लेखांत बरेचसें नवें संशोधन आहे. 'आप्पासाहेब भोसले व मनभट' यांत मनभट हा शेवटपर्यंत भोसल्याशीं राजद्रोही नव्हता, असें दाखविलेलें आहे. या खेरीज 'मालोजीचा मृत्युशक' 'कळंब येथील बुऱ्हाण निजामशहाचा लेख' इ० त्याचे लेख महत्वाचे आहेत. त्यांनी जगन्नाथ कविकृत शशिसेना, हें काव्यहि सटीप प्रकाशित केलेलें आहे. नागपूरकर भोसल्याच्या बखरीची (वा. दा. ओक यानी संपादिलेली) टीपांसहीत काळे यांनी तयार केलेली आवृत्ति मध्यप्रांत-संशोधन मंडळाने प्रकाशित केली आहे. त्यांनी संग्रहीत केलेला छोटासा पण महत्वाचा कागद–पत्र–संग्रह मध्यप्रांत संशोधन मंडळांत ठेवलेला आहे. विदर्भ साहित्य संघाचें दुसरे अधिवेशन एप्रिल १९२४ मध्ये अमरावती येथे, श्री. काळे यांच्या अध्यक्षतेखाली भरलें होतें.

### कै. श्री. बापुसाहेब भवाळकर

नागपूरास महानुभावीय वाङ्मय–संशोधनाचें नवीन केंद्र नि. ब. भवाळकर यांच्या सहाय्याने प्रि. ह. ना. नेने यांनी निर्माण केलें. भवाळकर यांनी आजन्म व्यासंग केला! ते एक चालता बोलता संदर्भ ग्रंथ होते!! त्यांनी 'श्री चक्रधर परिसिध्दांत सूत्रें' हा ग्रंथ प्रकाशित करून महानुभावीय वाङ्मयांत पदार्पण केलें. तसेच त्यांनी तुकारामाचे गुरु केशव चैतन्य यांच्या चरित्राचा ओविबद्ध 'केशव चैतन्य कल्पतरु' हि प्रसिद्ध

केलेला आहे. साधारणतः १९२८ पूर्वीच्या पाउणशे वर्षांमध्ये मध्यप्रांत-वऱ्हाडमध्ये जे ग्रंथ आणि नियतकालिकें प्रसिद्ध झालीं, त्यांची सूची श्री. भवाळकर यांच्याच नेतृत्वाखाली तयार करण्यांत आली होती.[1] त्यांनी अनेक वाङ्मयविषयक व संशोधनविषयक लेख विविधज्ञानविस्तार वगैरेमध्ये लिहिले होते. त्यांचें बहुतेक लेखन टोपणनावाच्या बुंथीखाली चालत असल्यामुळे त्यांच्या कामगिरीचा कीर्तिसुगंध जेवढा पसरावा तेवढा पसरला नाही असें वाटतें.

### प्रिं. ह. ना. नेने

प्रिन्सिपाल हरिभाऊ नेने हे अव्वल दर्जाचे संशोधक व विद्वान म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांनी महानुभावीयांचे 'सूत्रपाठ' 'दृष्टांतपाठ' व 'लीळाचरित्र' (पूर्वार्ध व उत्तरार्धहि) हे महत्त्वाचे ग्रंथ प्रकाशित केलेले आहेत व महानुभावीय वाङ्मयासंबंधी त्यांनी अनेक महत्त्वाचे लेख प्रकाशित केलेले आहेत. त्यांच्या कार्याचा आणखी काही उल्लेख डॉ. कोलते यांच्या संशोधनाबरोबर, पुढे केलेला आहे.

### कविभूषण प्रा. ब. ग. खापर्डे

वाङ्मय वा संशोधन कार्याइतकेंच, त्या त्या क्षेत्रांत प्रगति करण्याकरता वाङ्मय वा संशोधन-संस्था निर्माण करणें हें कार्यहि महत्वाचें आहे. आज मध्यप्रदेशाच्या वाङ्मय व सांस्कृतिक केंद्र बनलेल्या, विदर्भ साहित्यसंघाच्या विराटवृक्षाला अंकुरित करून, कविभूषण ब. ग. खापर्डे यांनी आपलें नांव संस्मरणीय करून ठेवलेलें आहे. प्रत्यक्ष पाऊस पडण्यापूर्वी जमीनींत केलेल्या 'धूळवाफी' प्रमाणेच, कोणत्याहि कार्याची सिद्धि सुरवातीला तरी दोलायमानच असते. खापर्ड्यांनी अशाच स्थितींत कार्यास सुरवात केली. हळूहळू तें कार्य अंकुरित होऊन, विदर्भ साहित्यसंघाने, या प्रांतांतील अनेक वाङ्मयविषयक चळवळीला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कार्यान्वित केलेलें आहे. यवतमाळच्या शारदाश्रमाने वि. सा. संघापासून प्रेरणा घेतली, असें म्हणण्यास हरकत नाही. अमरावतीच्या १९३७ च्या संमेलनापासून मात्र पुढे वि. सा. संघाचें कार्य

१ बैतूलच्या देवाजी नांवाच्या इसमाने रचलेला, आप्पासाहेब भोसल्याचा पोवाडा भवाळकरांनी संग्रहीत केलेला आहे.

सात आठ वर्षे जवळ जवळ स्थगितच होतें. पण पुढे संघाचें पुनरुज्जीवन होऊन, १९४८ मध्ये बिहारचे माजी गव्हर्नर ना. अणे यांच्या अध्यक्षतेखाली गोंदिया येथे संघाचा रौप्यमहोत्सवहि साजरा करण्यात आला।

रावबहादुर डॉ. हिरालाल

सुरवातीच्या, कोरीवलेखसंशोधनाच्या क्षेत्रांत डा. रा. ब. हिरालाल यांची कामगिरी अनन्यसाधारण आहे. यशोमंदिराच्या केवळ देहलीवर बुजऱ्या वृत्तीने घुटमळत असलेल्या विदर्भसंशोधनश्रीला, आपल्या कर्तृत्वाचा करभार वाहून, डॉ. हिरालाल यांनी त्या मंदिराच्या अंतर्भागाकडे नव्या विश्वासाने प्रगत केलें ! इतकेंच नव्हे तर त्यांनी इतर कांही संशोधक उमेदवारांना व संशोधनपटूनांहि आपल्या उदाहरणाने उत्साहाचा अमूप तणावा दिला !

विनायकराव औरंगाबादकर यांचेनंतर कोरीव लेख संशोधित करण्याचें काम जवळ जवळ थांबलेलेंच होतें. डॉ. रावबहादुर हिरालाल यांची जिल्हा गॅझेटिअरच्या प्रकाशनाकरता रसेल साहेबाचे साह्यकारी म्हणून नेमणूक झाली. व डेप्युटि कमिशनर या नात्याने ते या प्रांतांत फिरत असतां त्यांनी कल्चुरी, चंदेल्ल, राष्ट्रकूट, नाग इ. राजवंशाचे बरेच कोरीव लेख जमा करून त्याचें वाचन व प्रकाशन केलें. याशिवाय "Castes and tribes in C. P." मध्यप्रांत वऱ्हाडमधील कोरीव लेखाच्या पुस्तकाच्या दोन आवृत्त्या (Descriptive List of inscriptions in C. P. and Berar) व संस्कृत प्राकृत ग्रंथांची सूची (Descriptive list of manuscripts in C. P. and Berar) इत्यादि पुस्तकें प्रकाशित केलीं. त्यावरून या प्रांताच्या खासगी गृहस्थाच्या संग्रहांत किती प्रसिद्ध व अप्रसिद्ध अमोलिक ग्रंथ आहेत याचीहि कल्पना येते. या यादीच्या प्रकाशनामुळे सरासरी तीन हजार हस्तलिखित ग्रंथ असलेल्या तीन प्राचीन ग्रंथ भांडाराची महाराष्ट्रास प्रथमच ओळख झाली. या भांडारांत मालखेडच्या अमोघवर्ष या राष्ट्रकूट राजाच्या कारकीर्दीत खुद्द महाराष्ट्रांत तयार झालेल्या पुष्पदंत कवीच्या अपभ्रंश भाषेंतील माहिती मिळाली. अपभ्रंश भाषेंतील ग्रंथ संभारामुळे मराठी रूपसिद्धीला आणखी जास्त साधनसामग्री मिळालेली आहे. त्यांचा "Prehistoric

Berar" हा लेख उल्लेखनीय आहे त्यांना १९३१ च्या प्राच्य विद्या परिषदेच्या अध्यक्षपदाचा मान मिळाला होता.

डॉ. हिरालाल यांनी जेव्हा (१९०१) संशोधन कार्याला सुरवात केली त्या वेळीं विदर्भातील निरनिराळ्या राजवंशाची व त्याच्या प्राचीन इतिहासासंबंधी फारशा माहिती उपलब्ध झालेली नव्हती. त्यानंतर १९३४ पर्यंत (डॉ. हिरालाल कालवश झाले तें वर्ष) विदर्भातील सातवाहन व नंतरच्या अभीर वाकाटक, राष्ट्रकूट, शकनृपति इत्यादि अनेक वंशाचे कोरीव लेख वा नाणीं या काळांत उपलब्ध होऊन विदर्भाचा प्राचीन इतिहास बराच रंगारूपास येऊ शकला. याचें बहुतेक श्रेय डॉ. हिरालाल यांच्याकडे आहे, येवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या कार्याविषयी निराळें विस्तृत वर्णन देण्याचें कारण राहात नाही.

## डॉ. हिरालाल जैन

डॉ. हिरालाल जैन यांनी कारंजा येथील संग्रहांतीलच (अपभ्रंश भाषेंतील) 'जशहर चरित्र' 'सावयधम्मकहा' 'करकुण्डचरित्र' हे ग्रंथ संपादून प्रकाशित केलेले आहेत. पुष्पदंत कवीचा 'नायकुमार चरित्र' हाहि ग्रंथ त्यांनी प्रकाशित केलेला आहे. त्यांनी 'प्राकृत पंच संग्रह' यांत जैन कर्म तत्वज्ञानावरील उपलब्ध झालेल्या लिखाणाच्या काळावर प्रकाश टाकला आहे. त्यांना याशिवाय दक्षलक्षणपर्व लिहून जैनत्वाच्या इतिहासावर विवेचक पुस्तिका लिहिली आहे. ती जैन सेवामंडळ नागपूरतर्फे प्रकाशित आहे. १९४०–४९ या सालापर्यंत 'जैनिझम' व प्राकृत वाङमयावर त्यांनी तीसएक महत्वाचे लेख लिहिलेले आहेत. "गोम्मटसार कर्मकाण्डकी तृटि पूर्तीपर विचार "In refutation of the arguments to regard Karmkand (कर्मकाण्ड) of Nemi Chandra as incomplete" etc. "Paishashi traits in the language of Kharosthi inscription" "Some recent finds of Apabhransha literature" "Prakrit text on Jain cosmology" "गिरिनगर की चंद्रगुंफा" (जेथे धारसेनाने पुष्पदंत व भूतवाली यांना जैन तत्वें शिकविलीं ती गिरिनारची गुंफा आहे असें यांत दर्शविलेलें आहे) "अपभ्रंश भाषा और साहित्य" "क्या षट्खण्डागम सूत्रकार और उनके

टीकाकार वीरसेनाचार्य का अभिप्राय एक ही है ?" (दिगंबर व श्वेतांबर याच्या एका वादग्रस्त मुद्यावर चर्चा ) इ. त्यांचे लेख उल्लेखनीय आहेत.

पंडित लोचन प्रसाद पाण्डेय

पंडित लोचन प्रसाद पाण्डेय यांनी आस्थेचें संशोधनकार्य करण्याबरोबरच महाकोशल हिस्टॉरिकल सोसायटी ही संशोधन संस्था स्थापन करण्याचेंहि महत्कार्य केलें. यांचा महाकोशलमधील 'पेटिका शिर्षक लिखाण' हा लेख महत्वाचा आहे. हें लिखाण वाकाटकांच्या वेळीं पाचव्या सहाव्या शतकांत प्रचलित होतें. यांत अस्सल (Genuine) व नकल (False) असे दोन प्रकार असतात. खऱ्या लिखाणांत अक्षराच्या डोक्यावर भरीव पेटीच्या आकाराची आकृति असते व दुसऱ्या लिखाणांत पेटीचा आकार कोरलेला असतो. बालाघाट ताम्रपट हा पहिल्या लिखाणाचें उदाहरण आहे. लोचन प्रसाद पाण्डेय यांच्या इतिहासपूर्वकालीन संशोधनाविषयी (गिरीगुंफा) मागे उल्लेख आलेला आहे. त्यांची नांव घेण्यासारखी कामगिरी म्हणजे त्यांनी तयार केलेला "A collection of original Oriya poems" (Kavita Kusum) हा ग्रंथ होय. जागतिक कीर्तीचे भाषाशास्त्रज्ञ सर ग्रिअर्सन व त्यावेळचे संशोधनाधिकारी (Superintendent of the linguistic survey of India) यांनी हा ग्रंथ वाचून "The portion in Chattisgarhi dialect looks very interesting. Kavita Kusum is an excellent work. I must confess that my taste is in favour of Awadhi or Brija 'Bhasha' being used for poetry and not Khari Boli." अशा तऱ्हेचे उद्गार काढून समाधान व्यक्त केलेलें आहे. त्यांनी छत्तिसगडी व्याकरणाच्या वाढविलेल्या आवृत्तीचें एकदोन इतर सहाकाऱ्याच्या मदतीने संपादन केलेलें आहे.

छत्तिसगढ विभागांत राज्य करणाऱ्या शरभ नृपती या राजवंशाचे बरेच ताम्रपट, या वंशाचा मूळ पुरुष प्रसन्नमात्र[1] याचीं दोन सोन्याचीं नाणीं, पुराणांत उल्लेखिलेला सात वाहनांचा आठवा राजा अपिलक[2] याचें नाणें (तें पं. लोचनप्रसाद यांना रायगडजवळ महानदीच्या वाळवंटांत सापडलें) कलचुरी

1 A silver coin of Prasannamatra.
2 An unique coin of Andhra king Apilaka.

रतनपूर शाखेचे—अनेक लेख, शरभपुरीय, सोमवंशी राजांचे अनेक ताम्रपट यांचा संग्रह, वाचन व प्रकाशन करून पंडित लोचन प्रसाद पांड्येय यानी विदर्भ संशोधकांत बिनीचें स्थान मिळविलेलें आहे !

वरील ताम्र रौप्य नाणीं, ताम्रपट शिलालेख लोकगीतें इत्यादिवरील एकूण ४७ ( २७ इंग्रजी व २० हिंदी लेख एपिग्राफिका इंडिका, प्राच्यविद्या परिषद व हिस्ट्री कॉंग्रेस प्रोसिडिंग्ज, आंध्र हिस्टॉरिकल रिसर्च सोसायटी जरनल, व अनेक हिंदी मासिकांतून आलेले आहेत. त्यांचे यापैकी कांही लेख खालील प्रमाणे आहेत. (1) Balpur copper coin (2) Date of Chauhan Maharajas of Sambalpur (3) Folk tale of Chathisgarh (4) An insrciption of Suryavarma of the Ashwapati family. (५) उदयन और उनका समय (६) पुराणे सिक्कोंकी कुछ बातें (७) त्रिपुरी मुद्रा.

सोमरसांतून पाझरलेली सूर्यकन्यका !

त्याचप्रमाणे या प्रांतांत परप्रांतांत गेलेल्या वासुदेव बळवंत पटवर्धन, केशवसुत, अच्युत बळवंत कोल्हटकर, डॉ. केतकर इत्यादि साहित्यिकांनी 'छायानिधी' पक्षाप्रमाणे त्या प्रांतांची वाङ्मय—श्रीमंती समृद्ध करण्याचें केलेलें कार्य विदर्भीयांसहि भूषणभूत नाही असें कोण म्हणेल ? वा. ब. पटवर्धन हे पष्टीचे रसिक होते. प्राचीन ऋषिवर्यांनी उकळलेल्या सोमरस-शेषांतून पाझरलेल्या सूर्यकन्यकेप्रमाणे, केशवसुतांच्या काव्य—जटिस्यांतून निर्माण झालेल्या कविता—कन्यकेने महाराष्ट्रांत नवतेजाचा व नवचैतन्याचा कल्लोळ उठविला ! केशवसुतासारखा प्रतिभाशाली कवी आधुनिक मराठी भाषेत झाला नाही ! अच्युतराव कोल्हटकरांनी 'ज्ञतिबोध' 'उषा' 'संदेश' 'मेसेज' इत्यादि वृत्तपत्रें व नियतकालिकें काढून वृत्तपत्रकलेवर नवविचाराचें व नवशब्दसमुच्चयाचें चवडें ( कलम ) बांधलें ! डॉ. केतकर यांच्या ज्ञान-कोशाची कल्पना विदर्भांतच जन्मास येऊन त्यांच्याच संपादकत्वाखाली त्यांचा 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूची' हा प्रथमखंड विदर्भांत प्रकाशित झाला. साऱ्या वाङ्मय-सागरचें एकाच आयुष्य-आचमनाने प्राशन करूं पाहणाऱ्या डॉ. केतकरांचा विराट वाङ्मय-विस्तार पाहून अगस्तिची आठवण झाल्याशिवाय राहात नाही !

### या कालांतील इतरत्र संशोधन

या शिवाय साधारणतः वरील काळांत इतर अनेक लहानमोठ्या संशोधकांनी विदर्भ संशोधनांत भर घातलेली आहे, व त्या बरोबरच इतर महत्वाचें वाङ्मयकार्यहि केलें आहे.

अ. सि. साठे यांनी नागपूर युनिव्हर्सिटींत मराठी भाषेचा प्रवेश व्हावा म्हणून कळकळीचे प्रयत्न केले व आज त्यांच्या खटपटीचें फल प्राप्त झालेलें दिसतें. अग्निहोत्रींनी साठ्यांच्या देवनाथ दयाळनाथाच्या (प्रस्तावना व सटीप) ग्रंथप्रकाशनांत सहाय्य केलें. स. र. पांडे व अयाचित यांनी प्राकृत सप्तशती प्रकाशित केली. विष्णु मोरेश्वर महाजनी यांनी 'रामायणकालीन लोकस्थितीचा इतिहास' लिहिलेला आहे. यांनीहि काव्येतिहास संग्रह व वि. ज्ञा. विस्तारांत अनेक लेख लिहिले. त्यांच्या देखरेखीखाली 'ज्ञानसंग्रह' हें मासिकहि निघत होतें. ना. के. बेहरे यांच्या '१८५७' व 'बाजीराव पेशवा' या पुस्तकांत नवीन संशोधन नसलें तरी, त्या त्या विषयावरील उत्तम पुस्तकें म्हणून तीं वाचनीय आहेत. त्याचप्रमाणे यवतमाळचे पृथ्विगीरी हरिगीर यांचा 'गोसावी व त्यांचा संप्रदाय' हेंहि पुस्तक संग्राह्य आहे. गणपतराव मोडक यांनी शिवकल्याण यांची रासपंचाध्यायी प्रकाशित केली आहे. म. कृ. पाध्ये यांनी जपानचा इतिहास लिहिला आहे. एम्. के. गौतम यांनी खळतकरांचें संक्षिप्त चरित्र लिहिलें आहे. खरे यांनी मध्यप्रदेशाची संक्षिप्त माहिती दिली आहे. गो. रा. दळवी यांनी 'मराठा कुळाचा इतिहास' या ग्रंथांत दिलेली बरीचशी माहिती नवीन आहे. होतकरू इतिहास लेखकांना संदर्भग्रंथ म्हणून याचा नेहमीचा उपयोग करता येण्यासारखा आहे.

महंत दत्तलक्षराज यांनी संशोधनकार्य गतिमान् होण्याकरता चांगलेंच सहाय्य केलें. लोकमान्य टिळक, डॉ. भांडारकर, वि. ल. भावे यांच्यासारख्या विद्वानांना महानुभावीय पंथाविषयी त्यांनीच प्रथम माहिती पुरविली. पंथीयेतरांना महानुभावीय वाङ्मयाच्या वनराजींतील विलोभनीय दृष्यें दाखवून त्यांच्या संशोधनजिज्ञासेची इच्छापूर्ती करणारे हेच पहिले महानुभाव होत. स्वतः पंजाबी असूनहि त्यांचा महानुभावीयवाङ्मयाचा गाढ व्यासंग होता. महंत बाळकृष्ण शास्त्री हे त्यांचे पट्टशिष्य असून, पंजाब युनिव्हर्सिटीचे पदवीधर आहेत. त्यांनी महानुभावीय वाङ्मयावर अनेक महत्वाचे संशोधनपर

लेख लिहिलेले आहेत. नरहरशास्त्री खरशीकर यांनी विष्णु कवींची कविता (भाग २) प्रकाशित केलेली आहे. सीताबाई जयवंत यांनी 'रुक्मिणी-हरणगीत' व 'सावित्री गीत' संपादन केलें आहे. हीं गीतें संशोधनपर नाहीत. पण मोरोपंताच्या रसमधुर गीतांचें एका स्त्रीलेखिकेने केलेलें संपादन म्हणून हीं गीतें वाचकांस नेहमाच हृद्य वाटतील. श्रीधरबुवा परांजप्यांच्या केकावलींत वाङ्मयापेक्षा जास्त वा क्वचित् निरर्थक टीपा दिसतात. ती संशोधनात्मक नसली तरी त्यांतील संपादन कष्टाळूपणाचें आहे.

डॉ. अणे यांनी 'महाभारतशतसाहस्रीसंहिता बुद्धकालीन की बुद्धोत्तर-कालीन' याचा, त्याच मथळ्याच्या लेखांत सूक्ष्म विचार करून, व्यासाच्या संहितेंत बरेच प्रक्षिप्त भाग आहेत; व ही संहिता बुद्ध जन्माच्या अगोदर पूर्ण झाली असली पाहिजे, असा निष्कर्ष काढून आपल्या संशोधनबुद्धीची चुणूक दाखविलेली आहे.[1]

[महाभारतांत अशा "एडुका'चें म्हणजे गर्ह्यदेवतांचें स्तोम कलींत माजेल व वैदिक देवता व देवस्थानें मागे पडतील असें भविष्य, कलीचें भयावहत्व दाखविण्याकरता कथन केलेलें आहे. त्यांत बुद्धाच्या डागोबाचा उल्लेख आहे, असें मानण्यास कोणतेंच संयुक्तिक कारण दिसत नाही" असें डॉ. अणे यांनी दर्शविलेलें आहे. डॉ. अणे यांचें संशोधन थोडकेच असलें तरी त्यांची तीव्र बुद्धि संशोधन कार्यास कशी योग्य आहे हें यावरून दिसून येतें.]

१ महाभारतामध्ये बुद्धाचा दहा अवतारांमध्ये समावेश नाही. तेव्हा महाभारत हें बुद्ध जन्माच्या पूर्वी पूर्ण झालें पाहिजें. महाभारतांत कांही शब्द असे आहेत की, कांही संशोधकांना ही संहिता बुद्धानंतर झाली आहे असें अनुमान काढण्यास भाग पडतें. पण लो. टिळक व वैद्य यांनी या शद्बांचा निराळ्या तऱ्हेने अर्थ लावतां येतो असें म्हटलें आहे. फक्त एक शद्ब एडुका= डागोबा=बौद्धस्तूप हाच अडत आहे. ही संहिता बुद्ध जन्मानंतर पण दशवतारांत बुद्धाची गणना होण्यापूर्वी अस्तित्वांत आली असावी असें टिळक व वैद्य यांचें मत होतें. डॉ. अणे यांनी 'एडुका' शद्बाचा अत्यंत चोखंदळपणे तल्लास लावून 'एडुका' हा शद्ब सुद्धा बुद्ध जन्माच्या अगोदरच अस्तित्वांत होता, असें इतर साधार प्रमाणें दाखवून, व खुद्द महाभारतां-तूनहि आधार देऊन स्पष्ट केलें आहे.

ग. त्र्यं. माडखोलकर हे मध्यप्रांत संशोधन मंडळाच्या आद्यउत्पादकांपैकी एक आहेत. व ते संस्थेचे आजीव सभासद आहेत. मराठवाडा साहित्य-परिषदेचे ते अध्यक्ष असतां (१९४६) त्यांनी वैद्यनाथ, परळी इत्यादि भागांत फिरून बरीचशी संशोधन सामग्री संग्रहीत केलेली होती. माडखोलकरांनी संशोधन विशेषसें केलें नसलें तरी, संशोधक व संशोधनाबद्दल त्यांना फार आस्था असून 'तरुण भारता' मधून त्यांनी अनेक संशोधकांचें साहित्य प्रकाशित करून, त्यांच्या श्रमाचें चीज केलें आहे. एवढेच नव्हे तर मधून मधून त्यांच्या संशोधनावर आपल्या स्वतःच्या मोहक भाषाशैलीने कौतुकदृष्टि केलेली आहे. विदर्भाचे पत्रपंडित या नात्याने त्यांनी केलेली कामगिरी प्रशंसनीय आहे.

श्री. आ. रा. देशपांडे यांनी कुंडिनपूर विषयक संशोधन केलेलें आहे. त्यांच्या "Kundinpur the ancient capital of Vidarbha" या लेखांत त्यांनी उमरावती जिल्ह्यांतील चांदूर तालुक्यांतील कुंडिनपूर (त्याच्या संबंधीची दंतकथा, त्या दंतकथेच्या प्राचीन वाङ्मयांतील उगम, त्या संबंधीची संस्कृत ग्रंथांमधील भौगोलिक माहिती (Situation) प्राचीन अवशेष, त्याच्या संबंधी आधुनिक ग्रंथकारांचीं मतें या सर्वांचा उहापोह करून) हेच प्राचीन शहर विदर्भाची प्राचीन राजधानी म्हणून ठरविण्याचा प्रयत्न केलेला आहे. 'The writer's observation being of a very superficial nature, no definite conclusion can be advanced. Still the writer feels sure that the site near Kundinpur is the situation of some ancient town.' असें जरी त्यांनी लेखाच्या शेवटीं म्हटलेलें आहे तरी अशा तऱ्हेचें संशोधन करून त्यांनी विदर्भाच्या एका जिव्हाळयाच्या प्रश्नास चालना देऊन इतर संशोधकांचें व पुराणवस्तू खात्याचें लक्ष त्याकडे वेधण्याचें महत्त्वाचें कार्य केलेलें आहे.

डॉ. इंटर यांनी नागपूरपासून पांच मैलावर असलेल्या माहुरझरी या स्थळाबावत संशोधन केलेलें आहे. ज्ञानेश्वर व रामदास यांच्या काव्याची हिंदी भाषांतरें सप्रे व भगाडे यांनी केलेलीं आहेत. त्याचप्रमाणे तुळशी-दासाच्या काव्याचें मराठी भाषांतर जामदार यांनी केलेलें आहे.

# नंतरचें संशोधन[1]

## म. म. वा. वि. मिराशी[2]

संशोधनाचे त्रिराम !

म. म. कृष्णशास्त्री घुले, डॉ. के. ल. दप्तरी, व म. म. मिराशी हे संशोधनक्षेत्रांतील ( मर्यादित अर्थाने ) त्रिराम होत ! घुले–दप्तरी–मिराशी या तीन भागांनी ( अकार, ऊकार व मकार या मात्रांनी ) संशोधनाचा ॐ कार विदर्भाच्या मंडपींत अवतीर्ण झाला की काय असा भास होतो. ते संशोधनअंतरिक्षांतील इंद्र, मरुत् व अग्नि यांची अल्पांशानेतरी स्वरूपत्रयी आहेत, असें म्हटलें असतां अगदींच वावगें दिसेल काय ? किंवा संशोधन-कार्यांतील प्रभुशक्ति, मंत्रशक्ति व उत्साहशक्ति या शक्तित्रयींचा हा गोड त्रिवेणी संगमच आहे ! अथवा वाद्यवृंदामधील स्वरसंगम साधणारा त्रितारीयुक्त असा त्यांचा 'सितारा' म्हणावा. त्यांच्या 'त्रिपुटी' तून एकाद्याचें जरी संशोधन वगळलें तरी, उपमा, उपमेय व उपमान यापैकी एकास वगळल्यास ज्याप्रमाणे अलंकाराची सिद्धता होऊं शकत नाही, त्याचप्रमाणे संशोधन विवेचनांत बरीच उणीव राहून जाईल ! छायालग रागाप्रमाणे त्यांचें संशोधन दुसऱ्याच्या प्रभावाने रंजनकारी होणारें नसून, शुद्ध रागाप्रमाणे ते स्वयंसिद्ध व स्वतंत्र असतें !

१ सुरवातीचें संशोधन व नंतरचें संशोधन हें वर्गीकरण ढोबळमानाने केलेलें आहे.

२ कालक्रमाने पाहतां म. म. घुले व डॉ. दप्तरी यांच्या संशोधनाचें विवेचन म. म. मिराशी यांच्या संशोधनाच्या अगोदर करावयास पाहिजे होतें. परंतु मिराशीविषयीचें हस्तलिखित जवळ पूर्ण लिहून असल्यामुळे, व प्रेसच्या मागणीमुळेहि तें अगोदर पाठविण्यांत आलें. शिवाय पुराणवस्तु संशो-धन या दृष्टीने विचार करतां, म. म. मिराशी यांचें संशोधन प्रामुख्याने दृष्टीसमोर उभे राहतें. म्हणून त्यांचें संशोधन जरी आगोदर घेतलें, तरी तें विशेष अनाठायी होऊं नये असें वाटतें.

मिराशींचें संशोधन 'प्रतिरोध' पर्जन्याप्रमाणे, दप्तरींचें 'आरोह' पर्जन्याप्रमाणे तर घुलेशास्त्र्यांचें 'आवर्त' पर्जन्याप्रमाणे आहे असें साधारणतः म्हणतां येईल! एकाग्राच्या चुकीच्या संशोधन-शैलशृंगाशीं मिराशींच्या संशोधनमेघाचा संघर्ष झाला म्हणजे त्यांच्या संशोधनाचा 'शिळधार' पर्जन्य कोसळण्याचा जास्त संभव! दप्तरींचें संशोधन, त्यांच्या ठायीं सामावलेल्या अतिमर्याद बुद्धिमत्तेच्या बाष्पामुळे, त्याला थोडीशी चालना मिळाल्यास, बारमहा पडणाऱ्या गामि पर्जन्याप्रमाणे वृष्टि करावयास लागते. इतर संशोधनाच्या विषयांत, त्यांना (घुले) वाटणाऱ्या कमी दाबामुळे (महत्वामुळे) वैदिक वाङ्मयविषयांचा दाब अधिक होऊन, त्याचे आवर्त उठूं लागतांच, घुले शास्त्र्यांच्या संशोधन-पर्जन्याला महापूर भरती आल्यासारखी दिसते! या त्रिमूर्तींनी सिद्धांताचीं भरघोस कणीदार कणसें निर्माण करून, विदर्भ संशोधनशिवार समृद्ध केलें आहे यात शंका नाही.

मिराशींचें प्रचंड कार्य!

गेल्या वीस वर्षांत मिराशींनी पन्नास नवीन उत्कीर्ण लेख व अनेक प्राचीन नाणीं प्रकाशित केलेलीं आहेत. त्यावरची व त्यांच्या इतर संशोधन-विषयक लेखांची संख्या दोनशेवर तरी सहजच जाईल! त्यांनी आतापर्यंत मौर्य, सातवाहन, वाकाटक, कुंतलेश, राष्ट्रकूट, शकराजे, नळराजे, शरभपुर-नृपती, पांडववंशी किंवा सोमवंशी नृपती, कलचुरी, उत्तरचालुक्य, यादव इत्यादि राजघराण्यांबरोबरच, दक्षिण विभागांतील इतर प्रदेशांत राज्य करणाऱ्या विष्णुकुंडो[1] गंग,[2] शिलहर, सिंद इत्यादि राजवंशाचे नवीन लेख प्रसिद्ध करून, त्या त्या प्रदेशाच्या प्राचीन इतिहासांत भर घातलेली आहे. इतकेच नव्हे तर डॉ. फ्लीट, डॉ. कीलहॉर्न, डॉ. बुन्हर, पंडित भगवानलाल इंद्रजी, डॉ. डी. आर् भांडारकर, डॉ. हिरालाल, म. म. पां. वा. काणे, डॉ. केतकर, डॉ. मुझुमदार, डॉ. अळतेकर इत्यादिसारख्या पाश्चात्य व पौर्वात्य पंडितांनी केलेल्या चुकीच्या अध्ययनाचे (सिद्धांताचे) दोष आपल्या संशोधन-'पावमानी' ऋचांनी नाहीसे करण्याबरोबरच, अनेक महत्वाचे नवीन

1 " New light on the ancient history of Maharastra."
2 " Epoch of the Ganga Era."

सिद्धांतहि प्रस्थापित केलेले आहेत. त्यापैकी बहुतेक सिद्धांत आता पुराणवस्तु-संशोधनखातें व विद्वज्जनांस मान्य होऊन, सोंगट्याच्या खेळांत, फुली असलेल्या कटींतील जागेंत, निश्चित झालेल्या सोंगट्याप्रमाणे अविचलित होऊन बसलेले आहेत.

भारतीय विद्वानच नव्हेत तर, त्रिखंडकीर्ति पाश्चात्य पंडित विंटर-निट्झ (प्रेग युनिव्हर्सिटीमधील प्राध्यापक) डॉ. कीथ, सर रिचर्ड, बर्न इत्यादिकांनीहि मिराशींच्या संशोधनकौशल्याची मुक्तकंठाने प्रशंसा केलेली आहे. मिराशींच्या 'राजशेखर व भवभूतीचें जन्मस्थान' या लेखांतील संदर्भ आपल्या 'भारतीय साहित्याचा इतिहास' या ग्रंथांत देण्याचा मोह विंटरनिट्झ-सारख्या पंडितासहि पडावा या पेक्षा मिराशींच्या संशोधनकर्तृत्वाचें आणखी श्रेष्ठतस असें कोणतें गमक असेल ? त्यांच्याच तोडीचे दुसरे पाश्चात्य पंडित कीथ यांनीहि एका पत्रांत मिराशींच्या 'नवसाहसांकचरिता' वरील निबंधाची तारीफ केलेली होती.

## कॉर्पस इंडिक्यारम

भारतीय कोरीवलेख संग्रह (भाग ४ था) (Corpus Inscriptionum Indicarum Vol IV) या अत्यंत महत्वपूर्ण ग्रंथाचें काम मिराशीसारख्या कसलेल्या विद्वानावर सोपविण्यांत भारत सरकारच्या समयोचित बुद्धीचें जितकें दर्शन झालेलें आहे, त्यापेक्षाहि मिराशी यांच्या कर्तृत्वाचें खरेखुरें मोजमाप झालेलें आहे, असेंच कोणासहि वाटेल. कलचुरी संवताचे जवळ जवळ आता पर्यंत सव्वाशे उत्कीर्ण लेख सांपडलेले आहेत. त्यांचें वाचन, चिकित्सा-त्मक परीक्षण, इंग्रजी भाषांतर करून, त्यांच्याशी संबंधित असलेल्या अनेक राजवंशाचा इतिहास, तात्कालीन धार्मिक, सामाजिक, आर्थिक पार्श्वभूमीवर या ग्रंथामध्ये दिग्दर्शित करावयाचा आहे. सध्या हा ग्रंथ मुद्रणावस्थेंत आहे. याकरता मिराशींनी गेलीं दहा वर्षें निरलस परिश्रम केले असल्यामुळे, तो त्यांच्या कीर्तीस साजेल असाच होईल, याबद्दल शंका वाटण्याचें कारण नाही.

## त्रिपार्श्वबुद्धि !

मिराशींचें संशोधन बहुधा ऐतहासिक संशोधनाशीं संलग्न असतें. उदय सुंदरी कथा, वाकाटक राजा सर्वसेन हा कवि होता, किंवा

दंडीच्या दशकुमार चरितामधील[1] आठव्या कुमाराने सांगितलेली कथा वाकाटक वंशीय राजाला, कशी यथातथ्यतेने लागूं पडते व त्या कथेंत 'नर्मदारोधसि' हें पद अशुद्ध असून, 'वरदारोधसी' हा पाठ कसा शुद्ध आहे, किंवा कालीदासकृत 'कुंतलेश्वर दौत्यां'तील कुंतलेश्वर म्हणजे कुंतल देशावर राज्य करणारे वाकाटककालीन राष्ट्रकूटच होत इत्यादि निष्कर्ष हा ऐतिहासिक संशोधनाचाच एक प्रकार म्हणतां येईल. शिलालेख, ताम्रपट, नाणीं इत्यादिवरील अनेक लेख वाचून, त्यांनी त्यावरून ऐतिहासिक सिद्धांत तर काढलेले आहेतच; पण संस्कृत वाङ्मयांतूनहि ऐतिहासिक उल्लेख शोधून काढून, त्यांचा इतिहासाचे अणखर व मकतूल धागे जुळविण्याकरता उपयोग केलेला आहे. "जुने कागद-पत्र जसेच्या तसे छापल्याने कार्यभाग होणार नाही; प्राचीन कोरीव लेख व नाणीं प्रकाशित करतांना संपादकाला प्रस्तावनेंत त्या विषयी सर्व प्रकारें उहापोह करावा लागतो व त्या लेखाने किंवा नाण्याने आपल्या ऐतिहासिक ज्ञानांत काय भर पडली हें दाखवावें लागतें. तसें न केलें तर या प्रकाशनाचा तादृश उपयोग सामान्य वाचकास किंवा संशोधकानाहि होणें संभवनीय नाही" असे उद्गार मिराशींनी एके ठिकाणीं काढलेले आहेत. त्या दृष्टीने त्रिपार्श्व[२] समान अशा स्वतःच्या बुद्धीने, संग्रहीत केलेल्या साधनसामग्रीचें पृथःकरण करून, नवीन सिद्धांत कसा बांधतां येईल याच्याचकडे त्यांचें नेहमी लक्ष असतें. सूर्यकिरणांचा काही विशिष्ट भागच आरपार जाऊं देणाऱ्या किंवा परावृत्त करणाऱ्या व बाकीचा भाग नष्ट करणाऱ्या रंगद्रव्याप्रमाणेच त्यांची बुद्धिमत्ता संशोधन-सिद्धांतास जरूरीच्या सामुग्रीलाच वाव देऊन, बाकीचीला डालवण्याइतकी तारतम्यशील (Discriminative) दिसून येते. म्हणूनच त्यांचें संशोधन् गुरुशिष्य संवादाने सिद्धांत प्रस्थापीत करण्यासारखें भुसभुशीत न होतां, ठाशीव अशा तऱ्हेचें झालेलें आहे. ताम्रपट, शिलालेखांच्याच नव्हे तर नाण्यांच्या व वार, तिथ्या, नक्षत्रें, ग्रहणें गणितशास्त्र इत्यादिकांच्या दूरदर्शकयंत्रांमधून त्यांनी अत्रट व धुक्याने

1 "Historical data in Dandi's Dashkumar Charit."

२ प्रकाशाचें पृथःकरण करण्याच्या उपयोगाचें, काचेचें तीन कडा असलेलें भिंग.

ल्यास अशा काल-खंड-व्योमांतील अनेक अदृश्य सिद्धांत-तार्‍यांचा वेध घेतलेला आहे!

नाणीं, ताम्रपट, शिलालेख, पुराण व काव्यें इत्यादिकांमधील संदर्भयुक्त पुरावे एकदम एकत्रित केल्यास पुराव्यांची एकसंधी व भरभक्कम साकळी तयार होऊन संशोधनांत काही पळवाट (Loophole) राहूं शकत नाही. व विधानास बळकटी येण्याबरोबरच काव्यात्मकता येते ती निराळीच! घुले, दप्तरी, मिराशी हे एकामागून एक सयुक्तिक कारण परंपरा (reasoning) देतात. त्यामुळे त्यांचे मुद्दे खोडून काढणें प्रतिपक्षांना कठीण होऊन बसते.

## अक्षरविकास.

प्राचीन ताम्रपट, शिलालेख व नाणीं संस्कृताखेरीज अनेक प्राकृतादि भाषेंत असतात. संस्कृताप्रमाणेच मिराशींचा इतर भाषांचाहि दांडगा व्यासंग आहे. प्राचीन भारतीय इतिहासाच्या व्यासंगास वरील भाषा अर्थातच उपयोगी पडून, विविध स्वरूपाची माहिती त्यांनी प्रथमच उजेडांत आणलेली आहे. भाषेंतील अक्षर विकासावरून संशोधनास कसें सहाय्य होतें, किंवा संशोधनाने अक्षर-विकास कसा कळून येतो हें पाहण्यासारखे आहे. उदाहरणार्थ 'य' हाच वर्ण घ्या. या वर्णाची पहिली व दुसरी अवस्था अशोकच्या गिरिनार लेखांत आढळते. तिसरी अवस्था कुशानवंशीं राजाच्या वेळच्या (इ० स० १ लें व २ रें शतक) मथुरा येथील लेखांत दिसून येते. शेवटची अवस्था इ० स० ५८८ मधील महानामाच्या बुद्धगया येथील लेखांत दृष्टीस पडते. आज आपण लिहितों तसा 'य' ११ व्या शतकांत उज्जनीच्या लेखांत आलेला आहे. हा वर्ण खालच्या लोकांच्या बोलींत वर्तमानकाळच्या प्रथम व तृतीय पुरुषाच्या एक वचनाच्या रूपास जोडलेला असतो. उ० 'मी जातोय.' त्याचप्रमाणे 'र' ची पहिली अवस्था अशोकच्या गिरिनार लेखांत, दुसरी मंदसोर लेखांत इ० स० ५३२, तिसरी कुंडेश्वर लेखांत इ० स० ६६१ व चवथी जोधपूर लेखांत इ० स० ८३७ दृष्टीस पडते.

## संशोधनाची शहानिशा!

मिराशींनी आपलें लेखन विशेषतः इंग्रजींत करून ज़ास्तींत जास्त विद्वानांसमोर ठेवलेलें आहे. त्यामुळे त्यांच्या संशोधनाची शहानिशा होण्यास

विस्तृत क्षेत्र लाभून, त्यांचें लेखन कसोटीला उतरलेलें आहे. या बाबतींत या. मा. काळे, सरदेसाई, व भाउजी दप्तरी यांचेहि प्रयत्न उल्लेखनीय आहेत. काळे यांचा वाकाटकांचा अपुरा ग्रंथ इंग्रजींतूनच लिहिला जात होता. सरदेसाई यांचे मराठ्यांच्या इंग्रजी इतिहासाचे खंड व दप्तरी यांचे दशोपनिषदावरील कांही लेख इंग्रजींत लिहिले गेले आहेत. पृष्ठ ६८ वर संशोधन कार्याकरता इंग्रजी लेखन किती महत्वाचें आहे याचें विस्तृत विवेचन केलेलेंच आहे. मिराशींनी आपलें बरेंच लेखन इंग्रजींत केलें आहे याबद्दल त्यांना शतशः धन्यवाद द्यावेसे वाटतात! विशेषतः 'एपिग्राफिका इंडिका' मधील लेखनानेच पाश्चात्य विद्वानांचें लक्ष त्यांच्या संशोधनाकडे वेधलें गेलें. त्यांचें मराठी लेखन भारत इतिहास संशोधन त्रैमासिक, युगवाणी, सह्याद्रि, तरुण भारत, महाराष्ट्र इत्यादि नियतकालिकांत वेळोवेळीं प्रकाशित झालेलें आहे.

### विधानें मागे घेतलीं !

अनेक रथीमहारथींच्या संशोधनांतील व्यतिरेक मिराशींनी दर्शवून दिल्याचें मागे लिहिलेंच आहे. इतर संशोधन–पंडितांच्या सिद्धांतांचे ओघ लीलेने वळविणाऱ्या मिराशींना, यमुनेचा ओघ सहजासहजी वळविणाऱ्या सामर्थ्यशाली बलरामाचीच फक्त उपमा साजते !

सन १९२८ मध्ये डॉ. केतकर यांनी "कालिदास आणि विदर्भ" या विषयावर एक निबंध हिस्लॉप कॉलेजमध्ये वाचला होता. अध्यक्षस्थानीं मिराशी होते. आपल्या नेहमीच्या विक्षिप्त वृत्तीस अनुसरून डॉ. केतकर यांनी काही अप्रयोजक मुद्दे मांडले होते. मिराशींनी त्यांचे मुद्दे साधार खोडून काढले व त्यामुळे डॉ. केतकरांना आपलीं कांहीं विधानें मागे घ्यावीं लागलीं !

कांही संशोधकांकडून अजंठा येथील घटोत्कच लेण्यांतील लेखाच्या वाचनांत अनेक चुका झालेल्या होत्या. व वाकाटकवंशासंबंधी पुढे आलेली माहिती वस्तुस्थितीस धरून नव्हती. त्या तिन्ही लेखांचें मिराशींनी संशोधन व संपादन करून त्यांतील चुका दुरुस्त केल्या. डॉ. बुल्हर यांचें मत वाकाटक वंश इसवी सनाच्या पांचव्या शतकांत होऊन गेला असें होतें. डॉ. कीलहॉर्ने

व फ्लीट यांचें मत वाकाटक राजे आठव्या शतकाच्या नंतरचे आहेत असें होतें. पण हिंगणघाट ( जि. वर्धा ) येथील एका ताम्रपटांत प्रभावती गुप्ता इने आपल्या माहेरची वंशावळ दिलेली आहे. तिजवरून ती द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्याची कन्या होती या विषयी संशय राहात नाही. त्यावरून वाकाटक राजे गुप्ताचे समकालीन असून, चौथ्या पांचव्या शतकांत होऊन गेले, असें मिराशींनी सिद्ध केलेलें आहे.

त्याचप्रमाणे वाशीमच्या विंध्यशक्ति ताम्रपटावरून वाकाटकांच्या निदान दोन शाखा होत्या, असें त्यांनी दाखविलें. एकीची राजधानी आरंभी नंदीवर्धन व नंतर प्रवरपूर व दुसरीची वत्सगुल्म होती हेंहि त्यांनी सिद्ध केलें. व या ताम्रपटाने अजिंठ्याच्या लेण्यांतील लेखावरहि प्रकाश पडलेला आहे. वाकाटकांच्या [1] राजवंशाच्या संशोधनाचें बहुतेक सारेंच श्रेय श्री. मिराशी यांनाच आहे.

'वाकाटकांचें राज्य विंध्यशक्ति दुसरा याच्या नंतर नष्ट झालें काय ?' या लेखांत वाकाटकांचें राज्य नष्ट झाल्याबद्दलचें डॉ. डी. आर्. भांडारकर यांचें मत ग्राह्य नाही असें त्यांनी दर्शविलेलें आहे.

"Vakataka Chronology" या लेखांत वाकाटकांच्या कालमानानुक्रमाची व वंशावळीसंबंधीची डॉ. मुझुमदार यांचीं अनुमानें त्यांनी बारकाईने तपासलेलीं आहेत.

छत्तीसगडांतील शरभपुर नृपती हे राजे आठव्या शतकांत राज्य करीत होते असें डॉ. फ्लीट यांचें अनुमान होतें; पण राजा महाप्रवरराज याच्या ताम्रपटावरून व इतर पुराव्यावरूनहि हे राजे पांचव्या शतकांत होऊन गेले, असे मिराशी यांनी प्रतिपादिलें.

1 "Vakataka inscription in cave No. XVI at Ajanta."
"The capitals of Vakataka"
"The Vakataka dynasty of C. P. and Berar."
"Vatsagulma branch of Vakataka dynasty."
"Localities mentioned in the Poona plates of Prabhavati Gupta."

पांडववंशी किंवा सोमवंशी नृपती हे आठव्या शतकांत अस्तित्वांत होते, असे फ्लीट व कीलहॉर्न यांचें मत होतें. व रावबहादुर हिरालालनीहि हे राजे शरभपुरीय राज्यांच्या पूर्वी राज्य करीत होते अशा तऱ्हेचा तर्क केलेला होता. पण हे राजे शरभपुरीय राजानंतर इ. स. च्या सहाव्या सातव्या शतकांत होऊन गेले हें त्यांनी सिद्ध केलेलें आहे.

## कल्चुरी-चेदी संवत्

कल्चुरी किंवा चेदी संवत्सराच्या[1] सुरवातीचा काल निश्चित करण्यासंबंधीचा मिराशींचा शोध फार महत्वाचा असून, त्यांच्या कुशाग्र बुद्धीचा पुन्हा एकवार साक्षात्कार घडवितो ! डॉ. कीलहॉर्नच्या मतें हा संवत भाद्रपद शुद्ध ॥ प्रतिपदेस (इ. स. २४९) सुरू झाला असावा, पण कांही काळानंतर त्याने हें मत बदलवून या संवताचा वर्षारंभ पूर्णिमात आश्विन शुक्ल प्रतिपदेस होत असावा असें निराळें मत मांडलें. मिराशींनी वार, तिथ्या, नक्षत्रें, ग्रहणें इत्यादिकांचा सूक्ष्म विचार करून, कल्चुरी वर्षाचा आरंभदिन प्रथम अमान्त व नंतर पूर्णिमान्त कार्तिक शुक्ल प्रतिपदा हा होता हें मत प्रस्थापित केलें.

कल्चुरी वंशाच्या (त्रिपुरी शाखा) तृतीय गोविंदाच्या, उत्तर हिंदुस्थानांतील स्वाऱ्यांचा जो काळ डॉ. अळतेकरांनी ठरविला होता, तो मिराशीस मान्य नव्हता व त्यांत बराच बदल करावा लागेल असें त्यांना दिसून आलें.

रामटेकास लक्ष्मणाच्या देवळांत असलेल्या लेखाबद्दल, तो रायपूरच्या कल्चुरी वंशाचा असावा असें कीलहॉर्नचें म्हणणें होतें व त्यास रायबहादूर हिरालाल यांचाहि दुजोरा होता. व कीलहॉर्नने त्यावरून कांही इतर अनुमानें काढलेलीं होतीं. मिराशींनी तो लेख देवगिरीच्या रामदेवराय नृपतीचा आहे असें सिद्ध करून, त्यावरून इतर महत्वाची माहिती प्रकाशांत आणली.

## रामटोला !!

महाकवी भवभूती यांचीं तिन्ही नाटकें कालप्रियनाथाच्या उत्सवप्रसंगीं रंगभूमीवर आलीं, असें भवभूतीने दिलेल्या माहितीवरूनच कळून येतें. हा कालप्रियनाथ कोणता, याबद्दल विद्वानांत कुतुहल उत्पन्न झालें, म. म.

1 " The Kalchuri-Chedi Era. "

पां. वा. काणे यांनी तो उज्जयिनीचा महाकालेश्वर होय असें दाखविलेलें होतें. व तेंच मत आतापर्यंत विद्वद्वर्यांत प्रचलित होतें. पण मिराशी यांनी कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनीचा महाकालेश्वर नसून, काल्पी येथील सूर्यदेव होय हें सप्रमाण दाखवून देऊन, काण्यांच्या मतास रामटोला दिलेला आहे ! या योगाने संस्कृत पंडितांस 'रंजक' उडाल्याचा भास झाला असेल, यांत नवल तें काय ?

### नाणकशास्त्रज्ञ

मायक्रोफोनच्या 'डायफ्राम' सारख्या, मिराशींच्या सूक्ष्मग्राही बुद्धीने, ताम्रपट, नाणीं इत्यादींवरील साधन सामग्रींच्या ध्वनीलहरींचे सिद्धांताच्या विद्युल्लहरींत रूपांतर केलेलें दिसून येईल. विशेषतः प्राचीन नाणीं उजेडांत आणून मिराशींनी अनेक महत्त्वाचे निष्कर्ष काढलेले आहेत. मिराशींचा नाणकशास्त्रांतील अधिकार फार मोठा आहे. १९४१ मध्ये भारतीय नाणक संशोधन मंडळाने ( Numismatic Society of India ) कल्चुरी नाण्यावरील लेखाबद्दल त्यांना 'नेल्सन राइट मेडल' देऊन गौरविलें आहे. त्याच वर्षी हैद्राबाद येथे भरलेल्या अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेच्या अकराव्या अधिवेशनांत मिराशी यांना पुराणवस्तुसंशोधन, प्राचीन लिपिशास्त्र व नाणकशास्त्र या विभागाचे अध्यक्ष नेमण्यांत आले होते. १९४४ मध्ये 'भारतीय नाणक संशोधन मंडळा' ने त्यांस आपला अध्यक्ष निवडले. त्याचप्रमाणे १९५२ च्या जयपूर येथे भरलेल्या नाणक परिषदेचें अध्यक्षस्थानहि त्यांनीच भूषविलें.

### इतिहासाचें उगमस्थान

इतिहासाच्या उगमस्थानांपैकी नाणें हें एक असल्यामुळे, आर्थिक व राजकीय इतिहासाच्या रचनेंत नाणकशास्त्राचें स्थान वरच्या श्रेणीचें आहे. नाण्याच्या संशोधनाने कांहीच लभ्यांश झाला नाही तरी, निदान एकादी महत्त्वाची घटना, राजाचे किंवा राजवंशाचे नांव किंवा कमींत कमी एकादा शक, सन, किंवा तारीख तरी उपलब्ध झाल्याशिवाय राहात नाही. केवळ नाण्यावरील दंतकथावरून तेहतीस ग्रीक, सव्वीस इंडोसिथियन्स, कांही

इंडोपार्थियन्स व पल्लव यांचीं घराणीं प्रकाशांत आलेलीं आहेत. कुशान राजाची नांवें सुद्धा प्रथम नाण्यावरून उजेडांत आलीं. अलेक्झांडरपासून खिस्त पहिलें शतकापर्यंतच्या इतिहासाची स्पष्ट रूपरेषा नाण्यावरून होऊं शकते. नाण्यावरून निरनिराळ्या राजवंशाचे संबंध, नाणीं कोठे पाडल्या गेलीं इत्यादि गोष्टीहि कळतात. नाण्यांमध्ये उल्लेखिलेल्या स्थळावरून कांही राजवंशाच्या राज्यविस्ताराच्या मर्यादा कोठेपर्यंत होत्या हें समजून येतें. उ० सुलतान राजाच्या नाण्यांवरील टाकसाळांचीं जीं नांवें छापलेलीं होतीं, त्यावरून त्या त्या सुलतानाच्या राज्यांच्या क्षेत्रमर्यादांचा उत्कृष्ट पुरावा उपलब्ध झाला आहे. गुप्तवंशाच्या सुवर्णयुगाची कल्पना ज्याप्रमाणे ताम्रपट शिलालेखावरून येते, त्याचप्रमाणें त्यांच्या उज्वलसुवर्ण नाण्यावरून देखील स्पष्ट होते. चंद्रगुप्त ( २ रा ) विक्रमादित्य याचें सुवर्णनाणकभांडार, त्याच्या वडिलाच्या सुवर्णनाणकभांडारापेक्षा देखील जास्त समृद्ध होतें ही गोष्ट त्यांच्या कारकीर्दीतील अत्यंत विपुलतेने अस्तित्वांत असलेल्या नाण्यांच्या संग्रहावरून दृष्टोत्पत्तीस येते. याच राजवटींतील शेवटचा राजा स्कंदगुप्त यांच्या काळीं मात्र नाण्याचा ओघ आटून त्यांची फार चण चण असलेलें दृश्य दिसतें. (त्याच्या काळीं फक्त दोन तऱ्हेचीं सुवर्ण नाणीं सापडतात.) यावरून राजकीय परिस्थितीवर बराच प्रकाश पडल्याशिवाय राहात नाही.

नाण्याच्या मागील कोण्या बाजूवरून अगदी पहिली गोष्ट लक्षांत येते ती ही की ती अगदी सुरवातीच्या कालांतील असावी. ही गोष्ट लक्षांत आल्याने संशोधन कोणत्या कालासंबंधी करावयाचें आहे किंवा करतां येईल, हें एकदम निश्चित होतें. त्याचप्रमाणे चौकोनी आकाराचें नाणें हें वर्तुळाकार आकाराच्या नाण्यापेक्षा जुन्या काळचें असतें. (चौकोनी तुकडा वर्तुळाकार आकाराच्या तुकड्यापेक्षा सहजासहजीं पाडतां येतो याचें तें कारण असावें.) यामुळेहि संशोधनाची दिशा निश्चित होण्यास मदत होते.

### उलटीं अक्षरें !

एका दृष्टीने पाहिल्यास नाणें हें इतिहासाच्या कोणत्याही सिध्दांताचा बहुतेक एकमेव पुरावा होऊं शकत नाही. कित्येक ठिकाणीं नाण्यावरील

लेखांतील अक्षरें उलटी छापल्या जाण्याचा संभव असतो तर कित्येक ठिकाणीं त्यावरील सबंध लेखच उलट्या पद्धतीने छापलेला आढळतो !! याचें कारण असें की नाणीं पाडण्याकरता जे ठसे केलेले असतात त्यावर उलटीं अक्षरें असतात. व तीं त्याच पद्धतीने जुळवून छापावयाचे असते. क्वचित वेळेला अशिक्षित किंवा त्या कलेंत अनभ्यस्त अशा माणसाच्या हातून एकसारखी उलटी जुळणी होऊं शकत नाही. त्यामुळे एकाद्या लीपीच्या लेखन प्रकाराविषयी किंवा अन्यत्रहि अनुमानें केवळ अशा नाण्यावरून काढल्यास, तीं सत्यच निघूं शकतील असें मानतां येत नाही.

शिलालेखांतहि काही असे उलटे लेख पाहावयास मिळतात ! अशोकाच्या शिलालेखांत दोन उलटीं अक्षरें कोरलेलीं दिसतात. यशोधर्म्याच्या मंदसो-रच्या लेखांत 'ऊ' ची आकृति अर्वाचीन पद्धतीची आहे पण त्याच शतकांतील गारूलक सिंहादित्याच्या लेखांत ती जवळ जवळ उलटी आहे. सीलोनमध्ये उलट्या अक्षराचे दोन लेख मिळाले आहेत. पण उलटीं अक्षरें वा उलटे लेख ताम्रपट वा शिलालेख या पेक्षा नाण्यावरच फार मोठ्या प्रमाणांत पाहावयास मिळतात. सातवाहन वंशी शातकर्णी राजाच्या दोन नाण्यावर[1] 'शात-कणिस' हा सबंध लेखच्या लेख एरणच्या नाण्याप्रमाणे उलटा[2] आला आहे. पार्थियन अब्दागिसस याच्या एका नाण्यावरील खरोष्टी लेखाचा एक भाग डावीकडून उजवीकडे निघाला आहे. इंदूर संस्थानांतील वि. स. १९४३ च्या नाण्यावरील 'एक पाव आना इंदोर' हा सबंध लेखचा लेखच उलटा आला आहे !!!

## नाण्यांची जीवनकथा !

नाण्यांचा इतिहास आपल्याला अडीच हजार वर्षांपर्यंत मागे नेतां येतो ! आपल्या इकडील याज्ञवल्क्यस्मृति, कौटिलीय अर्थशास्त्र यांत नाण्यासंबधीचे उल्लेख सापडतात. इतर देशांतहि इसवी सनापूर्वी अनेक शतकांपासून नाणीं अस्तित्वांत होतीं. अगदी सुरवातीला नाण्याचें काम शंख, शिंपलें, कवड्या मणी

१. कॅटलॉग ऑफ द कॉइन्स ऑफ द आन्ध्र डॅनॅस्टी इ. पान ४ आकृतिपट १ नं. ९ व ११

२. रॅपसन; इंडिअन कॉइन्स पृष्ठ १५

कातड्याचे तुकडे, गाई वगैरे जनावरें इत्यादिकांनी भागविले जात होते. प्रथमावस्थेंतील नाणीं ओबडधोबड (Crude) स्थितींत असलीं तरी त्याच्या पुढच्या विकासकालांत सौंदर्यप्रधान व कलायुक्त अशीं नाणीं पाडण्यांत येऊं लागलीं. उपयुक्तता व मोल (utility and value), अविनाशता (Indestructibility), अभिज्ञेयता (Cognizability), इत्यादि, नाण्यांना आवश्यक असलेल्या अनेक गुणांमुळे सोने व चांदी हीं नाण्यांचीं सर्वांत लोकप्रिय साधनें झालेलीं आहेत. चौकोनी ताम्र नाणीं भारतीय पद्धतीने पाडणारा पहिला राजा डेमेस्ट्रियस ( बॅक्ट्रीयन ) हा होय.

जहांगीरची भोगलोलुप दृष्टि !!

नाण्यांच्या योगाने देशाच्या सांस्कृतिक व ऐतिहासिक भागावर जसा प्रकाश पडतो, त्याचप्रमाणे त्या त्या राजांच्या व राजवंशांच्या वैयक्तिक आवडी निवडीहि व्यक्त होतात. महंमद तघलघचा धर्मवेडेपणा (Staunch orthodoxy) त्याच्या बहुतेक नाण्यावर प्रतिबिंबित झालेला आहे. अकबराच्या चौकोनी नाण्यावरून त्याची धर्मविषयक महत्वाकांक्षा व्यक्त झालेली आहे. जहांगीरचीं अत्यंत अलंकारिक कलाकुसराची नाणीं त्याचें भोगलोलुप जीवन व्यक्त करतात. तर औरंगजेबाची 'भयंकर' रुक्ष नाणीं त्याचें अरसिक रुक्ष (Puritan) जीवन दाखवितात. मुखवट्यावर काहीं अक्षरें व पाठीमागच्या बाजूने कोणच्या टांकसाळींत तीं तयार झालीं व कोणत्या वर्षी, एवढाच उल्लेख असतो. इस्लामी धर्मात मूर्तिपूजा निषिद्ध मानली असल्यामुळे, त्यांच्या नाण्यावर प्रतिमा सहसा दिसत नाहीत. नाण्याच्या मागच्या बाजूने राजांचीं नावें व त्यांच्या पदव्या व तारीख छापलेली असते. खुत्बा (Public places of prayer) मध्ये नांवें वाचलीं जाणें, हें राज्यावर स्वामित्व दाखविण्याचें चिन्ह असल्यामुळे, इस्लामी नाण्यावर राजांचीं नांवें छापल्या जाण्याचे धोरण कटाक्षाने पाळल्या जात असावें.

गंडाभेरुंड !!

नाण्यावरील लेखांत आश्चर्यजनक विविधता दृष्टीस पडते ! मनुष्याकृति, वृक्ष, पशुपक्षी, बुद्धपूजा, बोधिवृक्ष, बुद्धगृहें, स्वस्तिक, देवदेवता इत्यादींनी त्यांच्या वैशिष्ट्याबरोबरच सौंदर्यांतहि भर घातलेली आहे.

कनिष्काच्या नाण्यांच्या पाठीमागे देवदेवता उमटविलेल्या असतात. त्यांत ग्रीक देवता, इराणियन देवता, अग्नि, वायु व बुद्ध यांच्या प्रतिमा असतात. कनिष्काच्या नाण्यांत भारतीय रहस्यवादाचा ग्रीक सौंदर्याकृतींत अविष्कार झालेला दिसून येतो. समुद्रगुप्ताच्या नाण्यावर कधी कधी गरुड दिसून येतो. चंद्रगुप्त (दुसरा) याच्या छोट्या नाण्यावर, मुखवट्यावर चंद्र आणि मागच्या बाजूस कलश असतो. देवी लक्ष्मी सिंहासनावर बसविलेली दाखविली नसून, कमलासनावर बसविलेली दाखविली असते. ओहिंदचा रजपूत राजा कामार याच्या नाण्यावर, एकीकडून सिंह व पाठीमागच्या बाजूस मोर दृष्टीस पडतो. विजयनगरच्या कांही नाण्यावरील 'गंडाभेरुंड' (आपल्या चोचीमध्ये व पंजामध्ये अजस्त्र हत्ती उचलत असलेला काल्पनिक जुळा गरुड Double eagle ) पाहणाऱ्याच्या मनांत भव्यत्वाची व आदराची भावना उत्पन्न केल्याशिवाय राहात नाही !

कुमारगुप्ताच्या आर्चर नाण्यांवर मागच्या बाजूला उपगीति छंदांत किंवा इतर संस्कृत छंदांत अलंकारिक भाषेंत राजयश वर्णिलेलें असतें. चंद्रगुप्ताच्या (दुसरा) आर्चर टाइप नाण्यांवर, मुखवट्यावर 'देवश्री महाराजाधिराज चंद्रगुप्त' व मागच्या बाजूने विक्रम अशीं अक्षरें असतात.

### दक्षिणेंतील नाणीं

नाणक शास्त्रावर डॉ. जॉर्ज मॅगडोनल्ड, ( The Evolution of Coinage ) कनिंगहॅम (Coins of Ancient India) डब्ल्यू. थिओबोल्ट ( Coins of Hindustan ) पी. गार्डनर, ए. मास्टर, आर. पी. जावक्सन, सी. जे. ब्राऊन इत्यादिकांनी नामांकित ग्रंथ लिहिलेले आहेत.

एकंदरींत भारतीय नाणक शास्त्राबद्दल म्हणावी तितकी जिज्ञासा उत्पन्न झालेली नसल्यामुळे, या प्रांतांतील अनेक दालनें अशोधित राहिलेलीं आहेत. उत्तरेकडील नाण्यावर विद्वानांचें कांही तरी लक्ष गेलेलें दिसतें; पण दक्षिणेकडील नाण्यांवर तितकेंहि गेलेलें नाही. दक्षिणेकडील नाण्यांवर कथा ( legends ) फार संक्षिप्त असतात. फक्त राजाचें नांव व पदवी असते. तारखाहि कमीच असतात !

## मिराशींचें नाणकविषयक संशोधन

विदर्भातील प्राचीन नाण्यांचा पहिला संग्रह चांदा जिल्ह्यांतील ब्रम्हपुरी तहसिलींत स. १८८८ मध्ये मिळालेला होता. गेल्या वीस वर्षांत सातवाहन कालातील अनेक नाणीं सापडलीं. या वंशाचा मूळ संस्थापक सातवाहन[1] यांचीं तीन नाणीं हैद्राबाद संस्थानांत सापडलीं. सातवाहन नाण्यांचा बृहत् नाणकसंचय आकोला जिल्ह्यांत तऱ्हाळा येथे १९३९ सालीं सापडला. त्यांत दीड हजार नाणीं होतीं ! यांत सातकर्णी, पुळमावी, शिवश्री पुळमावी, स्कंद सातकर्णी, यज्ञ सा विजय सा. कुंभ, सा. कर्ण सा. शक सा. इत्यादि अकरा राजांचीं नाणीं आहेत. यांतील महत्वाचीं नाणीं ' जर्नल ऑफ न्युमिस्मॅटिक सोसायटी ऑफ इंडिया ' या नियतकालिकाच्या २ ऱ्या भागामध्ये मिराशींनी प्रकाशित केलेलीं आहेत. पुराणांतील कांही राजांचीं नांवें काल्पनिक नसून, 'ऐतिहासिक' आहेत हें मिराशींनी यावरून सिद्ध केलेलें आहे.

१९५१ च्या जयपूरच्या नाणकपरिषदेच्या अध्यक्षीय भाषणांत मिराशी यांनी सातवाहनांच्या नाण्यांबद्दल उहापोह करून त्याची कल्पना संशोधकांना दिली व पुढील कार्याबद्दल रूपरेषाहि दाखविली. सातवाहन, हाल, रामगुप्त, देवपाल इत्यादि प्राचीन राजांच्या नाण्यांचे फोटो व छाप दाखविले; व श्री छत्रपतींच्या होनाविषयी महत्वाची चर्चाहि केली. शिवाजी महाराजांच्या वेळीं अनेक तऱ्हेच्या मोहरा व होन व निदान शंभर निरनिराळ्या प्रकारचे रुपये तरी अस्तित्वांत होते असें दिसून येतें. रुपयांवरूनहि [१] तत्कालीन परिस्थितीचा

1 " The coins of King Satvahan "

१ निरनिराळ्या राज्यांत व निरनिराळ्या टाकसाळींतील रुपयाला निरनिराळीं नावें होतीं. कंपनीच्या १०० रुपयाबरोबर १०४ चांदवडी, १०६ भडोच, १०९ कितुरी, १०९ बडोदी बाबाशाही, इत्यादि प्रमाण होतें. ज्या परगण्याचें अगर देशाचें नांव रुपयाला असें त्या परगण्यांत अगर देशांत तो चाले. याशिवाय शिक्का तळेगावीं; पन्हळीं; अंकुशी, कोरे, दौलताबाद शिक्का, वगैरे अस्तित्वांत होते. ज्याच्यावर अंकुशाचा छाप आहे, असा 'अंकोसा' किंवा 'अंकुसी' रुपया पेशवाईत चालू होता. रुपयाला राम, अधेलीला सीता, चवलीला लक्ष्मण, पावलीला भरत अशा तऱ्हेचीं रुपया व त्यांच्या भागांना सांकेतिक नांवें होतीं !

बोध होतो. याशिवाय यज्ञश्री सातकर्णीचे दोन शिडांच्या जहाजाची आकृती उमटविलेलें शिशाचें[1] एक नाणें आन्ध्र प्रदेशात गंटूर येथे सापडलें. त्याच राजाचा मुखवटा असलेलें चांदीचें नाणें जबलपूरजवळ सापडलें.

पुराणांतील प्रतिमाचित्रें.

नाण्यांवरील उपलब्ध झालेल्या माहितीचें प्रतिमा-चित्र पुराणादि प्राचीन संस्कृत ग्रंथांत शोधणें हें मिराशींच्या संशोधनाचें एक खास वैशिष्ट्य आहे. त्यावरून व नाण्यांच्या साहाय्याने इतरहि दृष्टींनी त्यांनी अनेक महत्वाचे शोध लावले आहेत.

सेवक राजाचीं कांही नाणीं उपलब्ध झालीं असून, पुराणांत उल्लेखिलेले आन्ध्रभृत्य हेच ते सेवक राजे होत, असें मिराशींनी प्रतिपादिलें आहे.

माननावाच्या राजाचें नांव पुराणांत आलें असून देखील, पाठ अपभ्रष्ट असल्यामुळे तें संशोधकांच्या लक्षात आलें नव्हतें. या वंशाच्या नाण्यांवरील संशोधनाने त्यांच्या राज्यांत चालू असलेला संवत पुढे दक्षिणेंत कसा प्रसृत झाला, याची मिराशींनी कल्पना आणून दिलेली आहे.

बस्तर संस्थानमधील नळराजाच्या एडेंगा येथील सापडलेल्या सोन्याच्या नाण्यावरून वराह, भवदत्तवर्मन व अर्थपती या तीन राजांचीं नांवें त्यांनी प्रकाशांत आणलेलीं आहेत. दोन तांब्याच्या नाण्यांवरून शकवंशी मान नामक राजा सातवाहनानंतर दक्षिण हिंदुस्तानांत उदयास आला ही माहिती मिराशींकडूनच ज्ञात झाली. " Some Coins of the Mahesha Dynasty " या लेखाने त्यांनी त्या राजघराण्यासंबंधी माहिती (Situation) उजेडांत आणलेली आहे.[2]

1 " A ship type coin of Yajna Satkarni. "

2 Edited by Khwaja Muhammad Ahmad, M. A., LL. B. Director of Archaelogy. आपल्या प्रांतामध्ये कांही संशोधकांजवळ कांही नाणीं आहेत. श्री. रहीम खान हेडमास्तर उर्दु स्कूल आकोला यांनी महंमद तघलक, फिरोजशहा, निजामउल्मुल्क, माधवराव शिंदे, विक्रम शकाचीं इत्यादि नाण्यांचा संग्रह केलेला आहे. नागपूरच्या सेंट्रल म्युझिअममध्ये ए. ए. जादवा, ए इ. कासका, महेंद्रदित्य, प्रसन्नभाय, नळ कल्चुरी इत्यादींचीं नाणीं आहेत.

प्रस्तर लेखाचेहि कांही उल्लेख त्यांनी प्राचीन ग्रंथांत तपासलेले आहेत. याचें उदाहरण म्हणजे सातवाहनकालीन कुमारवरोदत्त याच्या प्रस्तर लेखावरून महाभारतांत उल्लेखिलेल्या कोसल देशांतील ऋषभ तीर्थाचें स्थान निश्चित झालेलें आहे.

## मिराशींच्या इतर संशोधनाचे निष्कर्ष

कालिदासाने आपलें मेघदूतकाव्य वाकाटकांच्या राजवटींत रामागिरी (रामटेक) येथेच रचलें, या मिराशींच्या शोधाने विदर्भाच्या काव्ययशाची केतुकक्षा उच्चांकास नेण्याचें महत्श्रेय मिळविलेलें आहे!

'मानपूरचे राष्ट्रकूट' या लेखांत त्यांनी त्या वंशाचे काळ व देश निश्चित केलेले आहेत. (ते वाकाटकांचें समकालीन असून कृष्णा नदीच्या खोऱ्यांत त्यांचें राज्य होतें.)

वामदेव नामक राजाने त्रिपुरी येथील घराण्याची मुख्य शाखा स्थापली; व त्याच्या वंशजांनी आपणास 'वामदेवपादानुध्यात' हें विशेषण लावण्यास सुरवात केली, असें त्यांनी दाखविलें.

देवटेक[1] येथील अशोकाच्या धर्ममात्राच्या लेखाचें प्रथम मिराशी यांनीच वाचन केलें. त्यांत 'प्राण्यांना मारणाऱ्यास शासन केलें जाईल' असें निवेदन आहे.

बागगुहा[2] व तेथील चित्रकला किमानपक्षी इ. स च्या चवथ्या शकांतील आहे असें त्यांनी दाखविलें आहे.

## यज्ञीय देवता!

मॉरिस कॉलेजच्या प्राध्यापकाच्या जागेवरून मिराशी आपल्या कर्तृत्वाने प्राचार्य या पदवीला पोहचले. ते शिस्तीचे भोक्ते असल्यामुळे विद्यार्थ्यांस

1 " New light on the Deotek inscription. "

2 " The age of the Bagh caves. "

जितके कडक भासत, तितकेच त्यांच्या अध्यापन कौशल्यामुळें ते त्यांना प्रियहि झाले होते. सध्या ते सेवानिवृत्त आहेत.

मिराशींचें दुसरें लक्षांत घेण्यासारखें वैशिष्ट्य म्हणजे साहित्यिक असून-सुद्धा त्यांनी व्यवहार-विषयक कर्तव्याची उपेक्षा केली नाही ! अशा तऱ्हेच्या व्यक्ति उंबराच्या फुलाइतक्याच अपवादाने दिसत असल्यामुळे त्यांच्याविषयी नितांत आदर वाटतो.

त्यांच्या कुशाग्र बुद्धिमत्तेचा उल्लेख मागेच आलेला आहे. विद्यार्थी-दशेंतहि त्यांच्या बुद्धिमत्तेची चुणूक दिसून आल्याशिवाय राहिली नाही. अभ्यासांत वरची श्रेणी मिळून त्यांनी 'सर लॉरेन्स जेंकिन्स प्राइझ' 'सर जार्ज ली ग्रँड जेकब स्कालरशिप' 'झाला वेदांत प्राइझ' वगैरे किती तरी शिष्यवृत्त्या वेळोवेळीं मिळविल्या. १९४४ च्या डिसेंबरमध्ये मद्रास येथे भरलेल्या 'इंडिअन हिस्ट्री कांग्रेस'च्या प्राचीन इतिहास (विभाग २) या विभागाचें अध्यक्षपद त्यांना देण्यांत आलें होतें. (ते मध्यप्रांत संशोधन–मंडळाचे कार्याध्यक्ष (१९४९–५०) व संस्थेचे आजीव सभासद आहेत.) हिंदुस्तान सरकारने त्यांना १९४१ मध्ये 'महामहोपाध्याय' ही मानाची पदवीहि दिली आहे. 'एपिग्राफिका इंडिका'च्या संपादक मंडळावरहि त्यांची योजना झालेली आहे.

मिराशींचे दुसरे अंगभूत गुण म्हणजे प्रतिभा व रसज्ञता ! काव्याच्या कोमल भूमींतहि त्यांना कणखर इतिहास-पुरुषाचीं पाऊलें उमटलेलीं दिसतात ! संशोधन आणि काव्य हे वदतोव्याघाताइतके किंवा क्रमव्युत्क्रमाइतके परस्परविरोधी असूनसुद्धा मिराशींनी त्या दोघांचा गोड व गाढ संगम घडवून आणलेला आहे. त्यांच्या प्रज्ञेची साक्ष, समुद्रांतून सुई शोधण्यासारख्या वृत्तीने संशोधनांतील सुवर्णकण टिपण्यांत, सृजनशील प्रतिभेची साक्ष त्यांचें अभिनव सिद्धांतांत रूपांतर करण्यांत, व रसिकतेची साक्ष त्यांच्या कालिदास वगैरे ग्रंथांत व लेखांत[1] प्रगट झालेल्या काव्यपुष्परसलोलुपतेंत व वेधवती धारकोर लेखनशैलींत प्रत्ययास येते. इळा, सरस्वती आणि मही अशा

1 " Some Royal poets of Vakataka age. "
1 " Some ancient Prakrit poets. "

दर्भासनावर अधिष्ठित झालेल्या यज्ञीय देवतांप्रमाणे, त्यांची प्रज्ञा, प्रतिभा, व रसज्ञता, संशोधन दर्भासनावर, त्यांचा ज्ञानयज्ञ सिद्ध करण्याकरता अधिष्ठित झाल्या आहेत की काय, असा भास होतो !!

हरिविजयाबद्दल श्रीधरकृतकाव्य !

संशोधकास लागणारी जिज्ञासा व चिकाटी ही मिराशींत भरपूर आहे. कीलहॉर्नने संस्कृत हस्तलिखितांच्या सूचीमध्ये उल्लेखिलेल्या गृहस्थांच्या विद्यमान वंशजाकडे त्यांनी कांही हस्तलिखितांची चौकशी करण्याचा प्रयत्न केला ! त्यांत त्यांना एकहि पोथी मिळाली नाही ! संशोधकाला किती जिकीरी करावी लागते व त्यांचें फळ त्याला कित्येक वेळीं कसें मिळतें यांचें आणखी हें एक प्रत्यंतर ! त्याचप्रमाणे हिरालाल यांनी जी सूची केली त्याची बरीचशी माहिती परहस्तें मिळविलेली आहे. तीहि पडताळून पाहण्याचा मिराशींनी प्रयत्न केला; वाकाटकनृपति सर्वसेन याच्या हरिविजयाची नोंद त्या सूचींत होती. दीड हजार वर्षांपूर्वीची पोथी आपणास मिळाली याचा त्यांना आनंद झाला. भोसल्यांच्या संग्रहांत ती पोथी आहे. असें त्या सूचींत नमूद होतें. महत्प्रयासाने त्यांनी ती पोथी पाहण्याबद्दल परवानगी मिळविली; पण ती पोथी उपरोक्त सर्वसेनाच्या हरिविजयाची नसून श्रीधर कविकृत मराठी ग्रंथ आहे असें त्यांना दिसून आलें ! उ० 'नर्मदारोधसी' ऐवजी 'वरदारोधसी' पाठ शोधण्याकरता त्यांनी किती खटपट केली हें लक्षांत घेतलें म्हणजे वरील विधानाची सत्यता पटल्याशिवाय राहणार नाही !

मिराशींचा स्वतःच्या कर्तृत्वावर तर विश्वास आहेच; पण त्यापेक्षाहि इतर संशोधकांचा त्यांच्या कर्तृत्वावर जास्त विश्वास आहे असें दिसून येतें. बार्शीटाकळी येथील लेख इतका खराब अवस्थेंत होता की, डॉ. हिरानंद यांनी तो संपादनास अयोग्य म्हणून बाजूला काढून ठेवण्याची शिफारस केली होती. अशा लेखावर श्रम करण्यास कुणीहि तयार नव्हता ! पण रावबहादुर हिरालाल यांनी तें कार्य मिराशीच करतील, या विश्वासाने तो लेख त्यांचेकडे द्यावा अशी डॉ. हिरानंद यांना सूचना केली व मिराशींनी त्या लेखाचें वाचन बरोबर करून, 'एपिग्राफिका इंडिका' मध्ये पहिला लेख म्हणून प्रकाशित केला !

## सिद्धि बरोबर प्रसिद्धि !!

विदर्भ साहित्य संघाच्या एका बैठकींत 'मिराशींना डॉक्टरेटची पदवी कां देऊ नये?' याचा विचार व्यक्त केला जात असतां मिराशी म्हणाले, "नागपूर विद्यापीठाने माझा गौरव केला नाही, याचें मला विशेष महत्त्व वाटत नाहीं. आपण आपलें कार्य करीत राहावें व त्या कार्याच्या मागोमाग मान अवश्य चालत येतो, अशी माझी श्रद्धा आहे. मानाकरता हपापून बसलें म्हणजे कार्य बाजूलाच राहून स्पर्धा, मत्सर, द्वेषभाव यांचाच प्रादुर्भाव होतो." हा त्यांचा संदेश सर्व वाङ्मयसेवकांनी–विषेशतः संशोधकांनी–लक्षांत ठेवण्यासारखा आहे. यावरून मिराशींची ध्येयाविषयीची आवड निर्मत्सरीपणा इ. व्यक्त होतात. वाङ्मयप्रांतांत असूयेला फार वाव असतो. कार्याच्या सिद्धिबरोबरच प्रसिद्धि न मिळाल्यास मनाचा सहजच चरफडाट होतो. संस्थांत आपापले करंडोल बडवून व साठमारी करून पदाधिकाऱ्यांच्या जागा मिळविण्यांत वेळेचा अपव्यय करण्यापेक्षा प्रसिद्धि पराङ्मुखतेने कार्य करीत राहिल्यास वाङ्मयसेवकाला काय साधतां येतें याचें मिराशी नमुनेदार उदाहरण आहे वरील समयीच प्रो. चतुर्वेदी म्हणालेः 'मिराशीचा 'कॉर्पस' हा भाग तयार झाल्यानंतर कोणतेंहि विद्यापीठ त्यांना 'डाक्टरेट' देण्यांत स्वतःस कृतार्थ मानील!' पण पदवीने पराक्रमास तेज चढत नसून पराक्रमानेच पदवी सुशोभित होते हेंच खरें!

मिराशींत कृतज्ञता बुद्धीहि वास करते. रा. ब. हिरालाल, रा. ब. दीक्षित, व श्री. ग. त्र्यं. माडखोलकर. यांनीं त्यांना अनुक्रमें त्यांच्या सुरवातीच्या संशोधनाबद्दल प्रोत्साहित केल्याबद्दल, 'एपिग्राफिका इंडिका' सारख्या विद्वन्मान्य माध्यमांतून लेखन प्रकाशनाकरता साह्य केल्याबद्दल, व त्यांचे लेखांस वेळोवेळीं तरुणभारतांत प्रसिद्धि दिल्याबद्दलचा उल्लेख ते कृतज्ञता बुद्धीने करावयास विसरत नाहीत!

## मनांतलि शल्य!

संशोधनाकरता तरुण विद्यार्थी पुढे येत नाहीत याबद्दलचें शल्य मिराशींस डाचत आहे. असेच पुढे चालल्यास आपल्या प्रांतांतील संशोधन–सामग्री

परप्रांतीय विद्वानाकडे पाठवावी लागेल, याचा त्यांना खेद होतो. याचें कारण ते असें देतात की इतिहास व संस्कृति हा विषय जसा इतर भारतीय विद्यापीठांतून शिकविल्या जातो, तसा आपल्या नागपूर विद्यापीठांत शिकविल्या जात नाही. प्राचीन इतिहासाचें यथातथ्य संशोधन व्हावयाचें असल्यास, असा विषय आपल्या विश्वविद्यालयांत सुरू केला पाहिजे ही त्यांनी सूचना केलेली असून, ती अत्यंत स्वागनाई आहे असेंच म्हणावें लागेल. इतिहास-संस्कृति इत्यादिकांचा नितांत श्रेष्ठपणा दाखविण्याकरता मी या ग्रंथाचीं कित्येक पानें खर्चीं घातलेलीं आहेत ! ही सूचना अत्यंत महत्त्वाची असल्यामुळे निकटभविष्य कालांतच ती अमलांत येवो अशीच कुणीहि इच्छा करील.

मिराशींच्या मराठीच्या लेखांचासुद्धा एक उत्कृष्ट ग्रंथ होण्यासारखा आहे. निरनिराळया ठिकाणीं विखुरलेले त्यांचे लेख, जरी निरनिराळया फुलाप्रमाणे सुगंधित भासत असले तरी, ते एकत्रित आल्यास त्याचा भरदार गुच्छ रसिकास जास्त आल्हादकारक वाटेल. तसेच त्यांच्या ६१ व्या वाढदिवशीं त्यांच्यासंबंधी गौरव ग्रंथ प्रकाशित व्हावा अशी हार्दिक इच्छा आहे. त्याचप्रमाणे नागपूर विद्यापीठाने इतर अलबत्त्यागलबत्त्यांना मानाच्या झुली देण्यापेक्षा, मिराशीसारख्या योग्य विद्वानास अविलंबेकरून पदवी अर्पण करावी असें सर्वांनाच वाटणें साहजिक आहे.

खैलिक सूत्र !

खऱ्या अर्थाने मिराशींच्या तोडीचा संशोधक आपले प्रांतांत नाही. प्राचीन लीपिशास्त्रज्ञांत ते अग्रगण्य आहेत ! संशोधनक्षेत्रांत आतापर्यंत सिद्धांतांचे अगदी थोडके कवडसेच पडलेले दिसत होते. मिराशी (धुले, दप्तरी) वगैरेंनी आता तो बहुतेक प्रांत आपल्या कर्तृत्वाने प्रकाशमान केलेला दिसतो. 'गवतांत, अग्नींत, अरण्यांत, व उदकांत जे अध्ययन नष्ट झालें असेल तें प्राप्त होवो' या ऋग्वेदामधील खैलिक सूत्रांत व्यक्त केलेल्या शुभेच्छेप्रमाणे, वरील संशोधकत्रयीने आपल्या विद्यानुरागाने तें तेजस्वी अध्ययन पुन्हा हस्तगत करून घेऊन, विदर्भ संशोधन देवतेच्या शिर्षावर समुज्वल सुवर्ण-वलयच निर्माण केलें आहे की काय असें वाटतें

## डॉ. के. ल. दप्तरी

### शिवपदी वाङ्मय

विश्वकर्म्यानें विश्वाएवढें सुवर्णाचें अंडें निर्माण करून, त्यांत स्वर्ग, सूर्य, पृथ्वी, चंद्र इत्यादि तेजोगोल उत्पन्न केलें; त्याच प्रमाणे डॉ. के. ल. उर्फ भाऊजी दप्तरी यांनी आपल्या संशोधन-सृष्टींत ग्रहगणित कुतूहल, महाभारतयुद्धकालनिर्णय, वैदिक कालगणनापद्धति व श्रीरामचंद्रजन्मकाल निर्णय, करणकल्पलता (पूर्वार्ध व उत्तरार्ध,) पंचांगचंद्रिका, भारतीय ज्योतिःशास्त्रनिरीक्षण, चिकित्सापरीक्षण, Bodily Reaction and Examination of Systems of Therapeutics, The Astronomical method and its application to the Chronology of Ancient India, Social Institutions in Ancient India. सच्चिकित्साप्रकाशिका, उपनिषदांचा वस्तुनिष्ठ व बुद्धिगम्य अर्थ; व्याससूत्रें व The Realistic and Rationalistic Interpretation of the Upanishads, धर्मविवादस्वरूप, धर्मरहस्य, जैमिन्यर्थदीपिका, स्वतंत्र भारतातील पुढील मार्ग ( निबंध संग्रह ) इत्यादि तेजोगोलक निर्माण केलें. तत्वज्ञानावरून इतिहासाचें अंतरंग कळून येतें किंवा इतिहासावरून तत्वज्ञानाचें मन जाणतां येतें. ज्योतिर्गणित, तत्वज्ञान, धर्मशास्त्र, वैद्यकशास्त्र या विषयावरील त्यांचे सर्वच ग्रंथ संशोधन क्षेत्रास भूषणभूत असून, त्यापैकी कांहींनी पुरोगामित्वाचें शेवटचें टोक गाठून क्रांतिस्फुलिंगांनी संशोधनक्षेत्र उजाळलेलें आहे. त्यांच्या 'शिवपदी' वाङ्मयामध्ये शंपेची नेत्रदीपकता व इंद्रधनुष्याची आकर्षकता आहे !

### अपूर्व युगपद्धति

ग्रहगणितकुतूहल या ग्रंथांत त्रिकोणमितीसारख्या गणिताच्या ज्ञानाशिवाय ग्रहांचें सूक्ष्म गणित करतां येईल हें स्पष्ट केलेलें आहे. महाभारतयुद्धकालनिर्णयांत महाभारतांतील ग्रहस्थितीवरून युद्धाचा काल ठरविलेला आहे. पुराणांतील उल्लेखांचाहि त्यांत पडताळा घेतलेला आहे. ज्योतिर्गणिताच्या सहाय्यानें हा काल शकपूर्व १२७५ किंवा इसवी सन पूर्व ११९७ हा ठरविलेला आहे. कै. भारताचार्य वैद्य यांनी शकपूर्व ३१८० हा भारतीय युद्धाचा काल आहे, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला होता. पण भारतांतील

उल्लेखांशीं तो जोतिर्गणिताने जुळण्यासारखा नाही असा श्री. ज. स. करंदीकरांचा आक्षेप होता. करंदीकर वा भाऊजी या मध्येहि हा वाद चाललेला होता. त्यांत उज्जयिनीच्या माधव कॉलेजचे प्रिन्सिपाल श्री. गो. स. आपटे यांनी करंदीकरांचा काल (शकपूर्व २०१९) हा बरोबर आहे, असें मत व्यक्त केलें होतें. पण भाऊजी दप्तरींचा काल लोकमान्य टिळकांनीहि मान्य केलेला आहे. या शोधावरून व्यक्त झालेल्या भाऊजींच्या अचाट बुद्धिमत्तेवर श्री. कृ. कोल्हटकर[१], तर बेहद्द खूष झालेच; पण लोकमान्यांसारखे पहिल्याप्रतीचे मेधावीहि चकित झाले व त्यांनी त्याच्याकडे करणग्रंथाची जोखमीची कामगिरी सोपविली.

वै. का. ग. प. व श्रीराम ज. का. नि. यांत श्रीरामचंद्राचा जन्म त्रेतायुगांतील २४ व्या युगांत (शकपूर्व १६८७) झाला असा त्यांनी निर्णय दिलेला आहे. हे वायुपुराणांतील उल्लेखावरून व रामायणांत सांगितलेल्या ग्रहस्थितीवरूनच सिद्ध केलेलें आहे. या अपूर्व युगपद्धतीच्या शोधामुळे बहुतेक सर्व शास्त्रांच्या इतिहासांत दिसून येत असलेल्या अव्यवस्थेला आळा बसेल, असें त्यांनी आपल्या स्वतःच्या "Astronomical Method"-या ग्रंथाच्या उपसंहारांत म्हटलें आहे.

'करणकल्पलता' या ग्रंथांत शुद्ध पंचागाच्या गणित करण्याच्या नव्या रीती भाऊजींनी शोधून काढलेल्या आहेत. भाऊजींना या ग्रंथाने अखिल भारतीय कीर्ति मिळवून दिली! पण भाऊजी म्हणतात, "हा ग्रंथ मला इतर ग्रंथांच्या मानाने विशेष महत्वाचा वाटत नाही." ग्रेचें Elegy in Country Churchyard हें काव्य साऱ्या जगाने शिरोधार्य मानलेलें आहे; पण तो म्हणतो, तें माझे श्रेष्ठतम काव्य आहे असें मला वाटत नाहीं; त्यांतलाच हा प्रकार! करणकल्पतेच्या उत्तरार्धांत छायागणित, चंद्रशृंगोन्नति वगैरे उच्च प्रकारच्या ज्योतिर्गणिताचा त्यांनी उहापोह केलेला आहे.

१ जोतिर्विद श्री. कृ. कोल्हटकर यांचा या शास्त्रांतील अधिकार सर्व विश्रुतच आहे. त्यांनी 'भारतीय ज्योतिर्गणित' हा ग्रंथ लिहिलेला आहे. त्यांत नवीन संशोधन विशेष नसलें तरी तो त्या शास्त्रावरील माहितीपूर्ण ग्रंथ आहे.

'पंचाग चद्रिकें'त स्पष्ट चंद्र सूर्य काढल्याशिवाय एकदम स्पष्ट तिथ्यंत काळहि काढतां येतो असें दाखविलेलें आहे.

'भारतीय जोतिःशास्त्रनिरीक्षणांत' त्यांनी भारतीय ज्योतिःशास्त्राच्या इतिहासाचें संशोधन करून, तें युरोपियन आणि यवन यांच्या सहाय्याशिवाय स्वतंत्रपणेंच वाढत गेलें, असें दाखविलेलें आहे. या ग्रंथांत ग्रहगतीचीं मानें सूक्ष्मपणें ठरविलीं असून, तीं आधुनिक युरोपियन जोतिःशास्त्रांतील मानांशीं मिळतात असें तुलनात्मक पद्धतीनें दाखवून, भारतीय जोतिःशास्त्राचा प्राचीनतमपणा व श्रेष्ठपणा सिद्ध केलेला आहे. भाऊजींच्या ज्योतिःशास्त्रविषयक संशोधनाची कामगिरी, श्री० कोल्हटकर म्हणतात त्याप्रमाणे सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखी झाली आहे.

चिकित्सापरीक्षणांत डा. शुश्लर याने मांडलेली बारा क्षार पद्धतीच नैसर्गिक आरोग्याच्या दृष्टीने भारतवासीयांस फायदेशीर होऊं शकेल, असें निश्चितपणे सांगितलेलें आहे.

"Bodily Reaction" या ग्रंथांत शरीरावर केलेल्या कोणत्याहि क्रियेची प्रतिक्रिया कशी घडते याचें वर्णन केलेलें आहे. व सर्वांना लागूं होणारी एकच अशी सुबोध चिकित्सापद्धति स्थापन करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

'सच्चिकित्सा प्रकाशिका' या ग्रंथाचें रहस्यवर्णन, रुग्णपरीक्षण व लौकिकरोगचिकित्सा असे तीन भाग आहेत. रहस्यवर्णनांत चिकित्सेचीं मूलतत्वें इत्यादिकांचा उहापोह आहे.

"Astronomical Method" या ग्रंथांत कंसकालनिर्णय ठरविलेला आहे. भारतीय युद्धापूर्वी झालेलीं खग्रास ग्रहणें वगैरे विचारांत घेऊन, कंसवध भारतीय युद्धापूर्वी ४० वर्षे झाला हें दर्शविलेलें आहे.

"Social Institutions" यांत मनुसप्तर्षींचा इतिहास दिलेला आहे.

धर्मविवादस्वरूप, धर्मरहस्य, ज्यैमिन्यर्थदीपिका, "Interpretation of Upnishads" इत्यादि ग्रंथांत धर्मावगैरे बद्दल क्रांतिकारक विचार मांडलेले आहेत.

भाऊजींच्या वरील सर्वच ग्रंथांची चर्चा करणें येथे शक्य होत नसलें तरी त्यांचे उपनिषद्विषयक ग्रंथ व प्रबंध आजच्या भारतीय परिस्थितीला अत्यंत मार्गदर्शक असल्याने त्यावर थोडेसें विस्तृत विवेचन करणें योग्य होईल. शिवाय खुद्द भाऊजींनाच त्यांचे हे ग्रंथ विशेष महत्वाचे वाटतात.

उज्वल रत्नदीप

ईश्वराचें अस्तित्व न मानणें, वेदाला पौरुषेय मानणें, धर्मपरिवर्तनाचा पुरस्कार करणें, बुद्धिप्रामाण्याला महत्व देणें, इहलोकीच आत्यंतिक आनंदाची प्राप्ति आहे असें समजणें, कर्मसंन्यासाचा अधिक्षेप करणें, ज्ञानावर व कर्मा-वरच भर देणें, इत्यादिकांसंबंधी अनेक विचारांचे उज्वल रत्नदीप त्यांच्या धर्मविषयावरील ग्रंथांत तेजाने तळपत आहेत ! मार्गात ठिकठिकाणीं जल ठिबकत असलेली, मृगाश्वांनी शिघ्रगामी बनलेली, 'कर्माची संरक्षक'[१] व 'बुद्धिमान'[२] अशी मरुत् देवताच त्यांच्या बुद्धिगामी व समृद्ध संशोधनाच्या रूपाने, त्यांच्या वाङ्मय–अंतरिक्षांत अवतीर्ण झाली आहे की काय, असा भास झाल्याशिवाय राहात नाही !

ईश्वर, सृष्टि व मानव

पौर्वात्य व पाश्चात्य तत्वज्ञान्यांनी, विश्वशास्त्र ईश्वराचें अस्तित्व वगैरे ( Cosmology ) द्वैताद्वैत (Ontology) परमाणूवाद (Atomic theory) (आपल्याकडील नैय्यायिकांच्या तत्वज्ञानाप्रमाणे) शक्तिवाद ( Energism ) अज्ञेयवाद ( Agnosticism ) निसर्गवाद ( Naturalism ) इंद्रियानुभववाद (Empirioism) बुद्धिवाद (Rationalism) सुधारणावाद (Meliorism) इत्यादि पद्धतांने व दृष्टिकोनांतून सृष्टि, मानव व देव यांतील सर्व अन्योन्य संबधांच्या गोफांतील पीळ विणण्याचा, किंवा उकलण्याचा प्रयत्न केलेला आहे. भारतीय तत्वज्ञानांत आत्म्याला सर्वांत श्रेष्ठ असें स्थान दिलेलें आहे, असें दिसतें. पुनर्जन्म इत्यादिसंबंधी कल्पनांचाहि त्याचप्रमाणे उलगडा करण्याचा प्रयत्न केलेला आहे. वरील सर्व प्रश्नांचा उहापोह कमी अधिक यशस्वी प्रमाणांत वरच्या तऱ्हांनी झालेला असला तरी, त्यांनी निश्चित

१. मंडल १लें सूक्त ८७ ऋग्वेद. २. मंडल १लें सूक्त ८८ ऋग्वेद.

समाधानकारक असें तत्व शोधले गेलें नाही. भाऊजींनी शोधलेल्या तत्वांसारखीं तत्वें यापूर्वींहि कांही तत्वज्ञान्यांनी व संशोधकांनी पुढे मांडलेलीं आहेत. तरी पण भाऊजींनी त्या तत्वांचा-विशेषतः भारतीय तत्वज्ञानांचा अत्यंत सखोल अभ्यास करून, त्यांची पुढची पायरी म्हणून काढलेले शास्त्रशुद्ध सिद्धांत थोरामोठ्यांसहि चिंतनियच राहणार! विशेषतः ईश्वराच्या नास्तिक्याविषयी त्यांचे विचार शंभर नंबरी पुरोगामी म्हणविणाऱ्यानांहि त्यांच्या पुडे नम्रतेने मान डोलविण्यास लावण्यासारखे आहेत, यांत शंकाच नाही!

नास्तिकतेचा कुंज

भाऊजी ईश्वर मानीत नाहीत. व 'असलाच तर तो निर्बुद्ध आहे' असे चक्क सांगतात! 'देवदानवा नरें निर्मिलें हें मत लोकां कळवूं या!' असा विचार केशवसुतांनी धडाडीने मांडला आहे. योगवासिष्ठामध्येहि खालील वर्णन आहे.

ईश्वरप्रेरितो गच्छेत्स्वर्गं नरकमेव वा
स सदैव पराधीनः पशुरेव न संशयः[1]

—योगवासिष्ठ

आपल्या इकडील लोकांच्या कल्पना म्हणजे, ईश्वर संकटकाळीं धाऊन येऊन दुःखहरण करतो वगैरे, खुळचटच समजाव्या लागतील! कित्येक वेळेला नवस केल्यानंतर संकटें लुप्त होतात व नवसांमुळे व ईश्वराचे धाव्यामुळे ती लुप्त झाली असा आभास उत्पन्न होतो. काकतालीय न्यायानेच हें बहुधा घडतें! त्यांत कार्यकारणभाव कांहीच दाखवितां येत नसल्यामुळे त्यावरून ईश्वराच्या अस्तित्वाविषयी कांहीच नक्की सांगतां येत नाही. ईश्वराने संकट नाहीसें केलें असें आजपर्यंत भूतलावर एकानेहि दाखविलें नाही! "Fish" या कवितेंत रूपर्ट ब्रूकने, ख्रिश्चनधर्मजगताला चांगलाच धक्का दिलेला आहे! ईश्वराची कल्पना प्रत्येकजण आपल्या कल्पनेप्रमाणे

१ केवळ ईश्वराने प्रेरणा केल्यामुळे, मनुष्य स्वर्गाला किंवा नरकाला जातो, असें ज्याला वाटतें, असा मनुष्य नेहमी पराधीनच राहणार!

करतो. माशाला वाटत असेल ईश्वर म्हणजे एक आपल्यापेक्षा अब्जावधी पटी कोटींने मोठा असा मासा असावा! त्याचें निवासस्थान लहानशा जलाशयासारखें नसून विस्तीर्ण सागर असेल व त्याला स्वर्गीय चिखलामधील (Celestial mud) शेवाळ खावयास मिळत असेल! उंदीराला तो एक मोठा विराट उंदीर आहे असेंभासत असेल! त्याचप्रमाणे मनुष्याला तो आपल्याप्रमाणेच पण अनंत कोटी मोठा असा असून आपल्यासारखेंच त्याचें सर्व जीवन आहे अशी कल्पना होते.[1]

शंकराचार्य, रामानुज, पूर्व मीमांसाकार, मध्व, नैय्यायिक, वैशेषिक, योगकर्ते आर्यसमाजी (एकेश्वरी असले तरी ते आस्तिकच आहेत) टिळक, गांधी, या सारखे जगांतील सर्वश्रेष्ठ पंथीय व व्यक्ति यांनी ईश्वराचें अस्तित्व मान्य केलेलें आहे! फक्त नास्तिक शिरोमणी चार्वाक, कपिल, सांख्य, थोडेसें दर्शनकार (वेदाचें प्रामाण्य मानूनहि) जैन व बौद्ध दर्शनकार यांनीच नास्तिकवादाची नान्दी वाजविली आहे. त्यामुळे भाऊजीसारख्या महर्षीने नास्तिकवादाचा कुंज निनादित केल्या कारणाने, सर्व समाज हादरल्यासारखा व्हावा यांत नवल नाही! पण भाऊजींचें, सर्वांस स्वतःच्या ठिकाणीं पाहणाऱ्या आत्मौपम्य बुद्धीचें महोदार स्वरूप, बालकासारखें प्रसन्न निरागस् हास्य, सत्याकरता आसुललेली निर्भय प्रामाणिक वृत्ति, "वेद ग्रंथांची श्रेष्ठता पाहून तुकारामाने 'काय म्या पामरें बोलावी उत्तरे परि त्या विश्वंभरें बोलाविले' म्हटलें, तसेंच "सरस्वतीने मजवर प्रसन्न होऊन मजकडून ग्रंथ लिहविले" या प्रकारचे त्यांचे उद्गार इ० लक्षांत घेतां भाउजी हे आस्तिकाग्रण्यांचेहि अग्रणी शोभतील, असें कुणास वाटणार नाही? ध्येयप्राप्ति हीच

१ ईश्वराचें नास्तित्व व तत्वज्ञान क्षेत्रांत येणाऱ्या बहुतेक सर्व विषयांचा नवीन दृष्टिकोनांतून परामर्ष घेणारें, दीडहजार ओळींचें काव्य मी १९४० सालीं लिहिलेलें आहे. तें पुढील काव्यग्रंथांत प्रकाशित करावयाचें आहे. त्यांतील एक कल्पना अशीः–ईश्वर हा एक चैतन्याचा तेजोमेघ (Nebula) असून, त्यांतून फुटून निघणारे जीवात्मे हे असंख्य ताराग्रहगोलकांप्रमाणे आहेत. व जसे ते त्यांतून बाहेर फुटून निघाले, त्याचप्रमाणे ते पुन्हा त्यांत जाऊन मिळावयाचे आहेत!

ईश्वरप्राप्ति असें कांही तत्वज्ञान्यांचें मत आहे. तें गृहीत धरलें असतां भाऊजींची 'अस्तिता'च प्रकट होते. किंवा 'फळाची अपेक्षा न ठेवतां चिकाटीने कर्म करणें हीच ईश्वरपूजा' या गीतेंतील सिद्धांताप्रमाणे ते आस्तिक ठरतात. रामायणांतलि 'सत्यमेवेश्वरो लोके' या वचनाप्रमाणेहि ते आस्तिकच आहेत! तत्वज्ञानांत सत्याशिवाय कोणत्याहि बाबीचा मुलाहिजा न ठेवणें; व तें बुद्धिच्याच अभिदिव्यातूंन तावूनसुलाखून घेण्याचा आटोकाट प्रयत्न करणें; घरीं मंगल कार्य चालू असतां, रस्त्यावरील भिकारिणीला अगोदर आंत बोलावून पोटभर जेऊं घालणें, 'अस्पृश्यता कशी जाईल?' याची तळमळ बाळगणें, शेकडो आपद्ग्रस्त रोग्यांची कित्येक वेळीं विनामूल्य सेवा करून त्यांना चिंतामुक्त करणें, इत्यादि त्यांच्या जीवनांतील अनेक प्रसंगावरून, ते एकवारच नव्हेत तर त्रिवार आस्तिकच ठरत नाहीत काय? मग ते ईश्वर मानोत अगर न मानोत!! त्यांचें याप्रकारचें जीवन अवलोकून 'स्वतःच तेजोनिधि जो तरणी, तद्गृहिं दीप जळो न जळो रे।' या शब्दांची आठवण होते.

दृश्यते धिया!

सनातनी मताप्रमाणे धर्म बुद्धिगम्य नाही; पण भाऊजींच्या मताने धर्म हा बुद्धिगम्य आहे! कांही तत्वज्ञांचें असें मत आहे की, तत्वज्ञान हें 'अंत:प्रवृत्ति' ( Intuition ) ने किंवा श्रद्धेने उमजून घ्यावयाचें असतें. बुद्धीची पोच शेवटपर्यंत जात नाही, असें त्यांचें म्हणणें[1] आहे. ब्रम्हाचें ज्ञान बुद्धीने होऊं शकत नाही, असें शंकराचार्यांने मत मांडलें आहे. अज्ञेयवादी जर्मन तत्वज्ञानी कँट, मनुष्याला परमज्ञान (Absolute knowledge) होऊंच शकत नाही, असें मत प्रगट करतो. बर्गसनसारखे तत्ववेत्ते तर बुद्धि ही मुळांतच खोटी आहे असें मानतात! भाऊजी हे बुद्धिप्रामाण्यांतूनच सत्य ज्ञानाचें दर्शन होईल असें समजतात. पाश्चात्यांत डेकॉर्टस्, स्पिनोझा,

१ ज्ञानेश्वरीच्या सातव्या अध्यायांत, "तैसी जाणीव जेथ न रिगे विचारु मागौता पाउली निगे। तर्कु आणि नेघे आंगीं जेयाचां ॥५॥ (भावार्थः श्रध्दा प्रधान आणि अनुभवगम्य हें खरें ज्ञान होय; ते केवळ श्रद्धा नसलेल्या बुध्दिवादाने साध्य होत नाही) असें म्हटलेलें आहे.

लायबीनिझ इत्यादि बुद्धिवादी (Rationalist) तत्ववेत्ते झालेले आहेत. त्यांनी बुद्धिप्रामाण्यांतून परम सत्याचें आकलन करण्याचा प्रयत्न केलेला आहे. "सर्व विश्वाच्या मूळाशीं चित्छक्ति असून, संपूर्ण जीवनविकासाकरता ती धडपडत आहे; तिनेच मानव निर्माण करून त्याला बुद्धीचें देणें दिलेलें आहे; आपल्या बुद्धीचा उपयोग करून, चित्छक्तीच्या या महान कार्यास मानवाने सहाय्य दिलें पाहिजें. याकरता मानवाच्या मेंदूची व त्याबरोबर त्याच्या बुद्धीचीहि वाढ होऊन, त्याचें अतिमानवांत रुपांतर होऊं शकेल; चित्छक्तीचा तोच उद्देश असून, तो फलद्रूप करण्याकरता मानवाने स्वतःहि झटलें पाहिजें." असें बर्नार्ड शॉ म्हणतो! आपल्या इकडे कठोपनिषदांत आत्मा बुद्धीने गम्य होत नाही असें म्हटलेलें असलें तरी, योगवासिष्ठासारख्या ग्रंथांत परमज्ञान बुद्धीनेच होऊं शकेल अशा तऱ्हेचा निर्वाळा दिलेला आहे!

न शास्त्रैर्नापि गुरुणा दृश्यते परमेश्वरः
दृश्यते स्वात्मनैवात्मा स्वया सत्त्वस्थया धिया[1] ॥

—योगवासिष्ठ

आपल्या इकडे आधुनिक काळांतहि प्रार्थना समाजिष्ट वगैरे बुद्धि-प्रामाण्यवादी आहेत.

विवेकवादी भाऊजींनी बुद्धिप्रामाण्याचा पुरस्कार खालीलप्रमाणे केलेला आहे. "शंकराचार्याने ब्रम्हज्ञान बुद्धीच्या अधिकारापलीकडे नेऊन टाकलें! 'तर्क अप्रतिष्ठित आहे' हा अपसिद्धांत एका सूत्राचा चुकीचा अर्थ करून शंकराचार्यांनी मांडला. तर्क अप्रतिष्ठित, हा सिद्धांत कोणाहि समंजस माणसास मान्य होणार नाही! वचनें तर तर्कापेक्षाहि फारच अप्रतिष्ठित आहेत! कारण तीं अनेक असूं शकतात व अनकांचे अनेक अर्थ होतात! ब्रम्हाचें देखील जेवढें ज्ञान होईल तितकें तर्कानेच होईल व असें नर्काने होणारें ज्ञानच उपानिषदामध्ये व वेदामध्ये सांगितलेलें आहे. एकूण ब्रम्ह बुद्धिगम्य आहे. "दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्म दार्शीभिः" (ब्रम्ह सूक्ष्मबुद्धि

१ परमेश्वर शास्त्रें व गुरू यांच्या योगाने दिसत नाही; तर आपल्या स्वतःच्या सत्वस्थ बुद्धीनेच त्याचें दर्शन होतें.

मनुष्याच्या श्रेष्ठ बुद्धीने पाहिलें जातें ) असें उपनिषदाने कंठरवाने सांगितलें आहे. ”

बुद्धि व श्रद्धा

भक्ति, अत:प्रवृत्ति किंवा श्रद्धा फसवूं शकेल. बुद्धि डोळस असल्यामुळे फसवूं शकत नाही. भक्तीने सांत्वन मिळतें पण ती डोळस नसल्यामुळे खरा मार्ग सापडूं शकेल असें म्हणतां येत नाही. परमेश्वराने स्वप्नांत साक्षात्कार दिला असें कित्येक भोळे भक्त पुष्कळ वेळा समजत असतात. 'मनीं वसें तें स्वप्नीं दिसें' या न्यायाने भक्ताच्या मनांत विचार येत असल्यामुळे त्यांना स्वप्नांतहि तसा साक्षात्कार होतो यांत नवल नाही ! पण तेवढ्यानेच परम तत्वाचें खरें ज्ञान झालें असें समजणें चूक होईल. कदाचित् कोणी म्हणतील जोपर्यंत जगाचें कोडें सुटत नाही तोपर्यंत तरी, बुद्धिमत्तेने तें सुटेल असें समजणें ही तरी एक प्रकारची श्रद्धाच नव्हे काय ?

तत्वज्ञान याचा अर्थ सत्य वस्तूचें ज्ञान ! द्रोणाचार्यांनी धनुर्विद्येची परीक्षा घेतली त्यावेळीं अर्जुनाला जसा पक्षाचा फक्त डोळाच दिसत होता, त्याप्रमाणे खऱ्या तत्वचिंतकाला व संशोधकाला सत्याशिवाय दुसरें तिसरें कांहीच दिसत नाही; किंवा दिसूं नये ! चिकित्सक बुद्धीच्या धारेवर धरल्याशिवाय खरें तत्व बाहेर पडूं शकत नाही. इतर कोणत्याहि साधनापेक्षा बुद्धि हीच सत्य शोधण्याचें प्रभावी व निश्चित साधन आहे, हें कोणासहि पटण्यासारखें आहे. बुद्धीने कदाचित परमज्ञान होणें असंभवनीय आहे असें मानलें तरी, बुद्धीशिवाय मात्र तें इतर साधनांनी सत्यत्वेने कधीच होणार नाही, हेंहि तेवढेच खरें आहे ! मानवी बुद्धीला अशक्य असें कांहीच नाही ! भाउजी-सारख्या “ प्रज्ञावंताच्या प्रज्ञानी* ” एके दिवशीं बुद्धीच्या सामर्थ्याने परम-ज्ञान हस्तगत केल्यास त्यांत कुणास नवल वाटण्याचें कारण दिसत नाही !

* वेदकाल निर्णयाच्या बाबतींत ( ओरायनमधील ) काळ नक्की ठरविण्याच्या दृष्टीने लोकमान्य टिळकांचीहि रीती निरुपयोगी आहे व त्यांचा काळ दोन हजार वर्षांनी कसा चुकला ( विषवबिंदु आमक्या नक्षत्रीं होता, अथवा वर्षारंभीं अनेक नक्षत्रें मानीत असें त्यांनी ( टिळकांनी ) ठरविलें आहे; परंतु विषवबिंदु एकाच नक्षत्रांत हजार वर्षे राहतो, किंवा वर्षारंभीं एकादें

दोन पंख—ज्ञानकर्म

शरीर धारणेकरता कर्म व वासनाक्षयाकरता ज्ञान या दोघांचीहि आवश्यकता आहे. ' ज्ञान—कर्म युग्माच्या मार्गानीच भारताची आध्यात्मिक उन्नति होऊं शकेल ' असा भाऊजींचा ठाम सिद्धांत आहे! आत्मज्ञान झालें म्हणजे जीव कर्मबंधनापासून मुक्त होतो असें कठोपनिषदांत सांगितलेलें आहे. जैन धर्मांत आर्यधर्माच्या उलट कर्माची प्रक्रिया सांगितलेली आहे! जिवाला चिटकलेल्या कर्मरूपी उपाधीचा नाश झाला म्हणजे मोक्ष मिळतो ही कल्पना आहे! कर्माच्या श्रेष्ठत्वाबद्दल मात्र आर्यधर्मांत ठिकठिकाणीं अनेक उल्लेख आलेले आहेत! निष्काम कर्माचें महत्व ईषोपनिषदांत वर्णिलेलें आहे. छांदोग्य उपनिषदांतहि कर्माचें महत्व आहे. ज्ञान व कर्म या समुच्चयाचें गीतेंतील श्रेष्ठत्व सर्वांस परिचयाचेंच आहे! योगवासिष्ठामध्ये परम ज्ञान होण्याकरता ज्ञानकर्माच्या जोडगोळीचें केलेलें हृदयरम्य काव्यात्मक वर्णन कोणास रोमांचित करणार नाही?

उभाभ्यामेव पक्षाभ्यां यथा खे पक्षिणां गतिः
तथैव ज्ञान कर्मभ्यां जायते परमं पदम्[१] ॥
—योगवासिष्ठ—

त्याच प्रमाणे भागवतांतील—

कर्मणा जायते जन्तुः कर्मणैव निलीयते[२]
सुखं दुखं, भयं, क्षेमं कर्मणैवाभिपद्यते ॥

हें वचन कर्माचाच पाठपुरावा करतें.

---

नक्षत्र हजार वर्षपर्यंत मानतां येईल; किंवा त्याच्या अनुमानाचें जें प्रमाण आहे तें म्हणजे वर्षाचें खरोखरांच तीन आरंभ असूं शकत नाही हेंच चूक आहे इ. कारणावरून) हें भाऊजींनी साधार दाखवून दिलेलें आहे.

१ पक्षांना आकाशांत संचार करण्यास ज्याप्रमाणे दोन पंखाची गरज असते त्याप्रमाणे कर्म आणि ज्ञान या दोन साधनांच्या योगानें मोक्षरूपी परम पदाची प्राप्ती होते.

२ प्राणी कर्माच्या योगाने उत्पन्न होतो. कर्माच्या योगानें लय पावतो, सुख दुःख भय आणि कल्याण ही सर्वहि कर्माच्या योगाने प्राप्त होतात.

## ब्रम्हवेत्ता व कर्म

बौद्धाचा पराभव करण्याकरता शंकराचार्याने बौद्धांचाच संन्यासवाद वेदामध्ये आहे व वेद व उपनिषदें हीं अपौरुषेय आहेत असें चुकीने प्रतिपादिलें आहे! व त्यांनी 'जीवावस्थेंत घडणाऱ्या कर्मांचा त्याग करणें योग्यच आहे,' 'ब्रम्हज्ञ कर्में करूं शकत नाही' इ० अपसिद्धांत मांडलेले आहेत. भाऊजींनी हे सिद्धांत खालीलप्रमाणे खोडून काढलेले आहेत. "अद्वैतज्ञान झालें असतां कर्में होऊं शकत नाहीत किंवा कर्में करण्याची आवश्यकता राहात नाही, या उपसिद्धांताचा अर्थ असा होतो की, जीवावस्था विवर्त म्हणजे भ्रम आहे. अर्थात त्या अवस्थेंत कर्में टाकून द्यावींत म्हणजे सन्यासाश्रम घ्यावा हा उपसिद्धांत चूक आहे." हें त्यांनी त्या सूत्राच्या[1] मागील सूत्राच्या शंकराचार्यांच्या भाष्यावरूनच दाखवून दिलें आहे. (भोक्तृ भोग्य परस्पराहून भिन्न आहेत आणि ब्रम्हाहून भिन्नहि नाहीत. उदकरूपी समुद्रापासून त्याचे विकार, फेन, वीचि बुद्बुद् असतात त्याप्रमाणे.) यावरून जगद्ब्रह्मजीवाचें अद्वैत असलें तरी कर्में होऊं शकतात किंवा कर्में करण्याची गरजहि असूं शकते. ब्रम्हवेत्ताहि कांही काळ शरीर धारण करतोच. अर्थात् ब्रम्हवेत्ताहि मृत्यूपर्यंत कर्में करूं शकतो आणि जो कर्में करूं शकतो त्याने कर्में करणें आवश्यक आहे." शंकराचार्यांच्या 'ज्ञान्यावर कर्माचें बंधन नाही' या सिद्धांताविरुद्ध टिळकांनीहि ज्ञानोत्तरसुद्धा ज्ञान्यांनी लोकसंग्रहाकरता आमरण निष्काम बुद्धीने कर्म केलेंच पाहिजें' असें गीतारहस्यांत सिद्ध केलेलें आहे.[2]

"शंकराचार्यांच्या ब्रम्हसूत्राच्या व उपनिषदाच्या चुकीच्या भाष्यामुळे भारताचें फार नुकसान झालें आहे. संन्यासाश्रम हाच मुक्तीचा किंवा आनंदाचा मार्ग समजून सद्गुण संपन्न लोकांनीच संन्यासाश्रम घेतला. त्यामुळे गुणसंपन्न लोकास व त्यांच्या संततीस भारतीय समाज मुकला; त्यामुळे समाजांत दुर्गुणी लोकांचें बाहुल्य झालें. (बुद्धाने लोकांस संन्यासाश्रम

१ 'तदनन्यत्वमारंभणशद्बादिभ्य' २।१।१४

२ वरील धर्तीच्या तत्वज्ञानात्मक प्रश्नांत विशेष न शिरतां "कर्मांतच श्रेष्ठतम आनंद आहे" असें गांधीजींनीहि दर्शविलें आहे.

स्वीकारण्यास लहानपणींच प्रवृत्त केल्यामुळे तेव्हाची समाजरचना विस्कळीत झाली.) अशा या दुर्गुणी लोकांनी आपसांत भांडून भारताचें स्वातंत्र्य गमावलें. आता जरी स्वातंत्र्य मिळालें आहे तरी संन्याशाश्रमाचें प्राबल्य झाल्यास तें गमावण्याचाहि संभव आहेच ! ब्रम्हवेत्ते सतत कर्म करतील तरच स्वातंत्र्य टिकूं शकेल." असा कडक इषारा भाऊजींनी 'व्यासाची शंकराचार्यावर फिर्याद' या आपल्या लेखांत दिलेला आहे.

शॉपेनहॉवर !

सनातन्यांच्या मताप्रमाणे मरणोत्तर अत्यानंद प्राप्ति आहे तर भाऊजींच्या मताने मरणापूर्वीच या जगांत अत्यानंद प्राप्ति आहे. या सिद्धांताने भाऊजींचें सर्व तत्वज्ञान आशावादाने तुडुंब भरलेलें आहे असें दिसून येतें. 'धर्माचा उद्देश ऐहिक उन्नति आहे' असे ते समजतात. मानवीजीवनाच्या विफलतेचें सावट बहुतेक पौर्वात्य, व कांही पाश्चात्य तत्वज्ञानी कवी व लेखक यावर देखील प्राचुर्याने पडलेलें दिसतें. "दुःखाचा भार आणखी झाल्यास आत्महत्येचाच आश्रय करावा लागेल" असें शॉपेनहॉवर म्हणतो ! त्यामुळे जीवनांतील नैराश्याचें धुके वितळविण्यास कारणीभूत होणाऱ्या, भाऊजींच्या सूर्यरश्मीसारख्या प्रसन्न तत्व दृष्टिकोणाची आवश्यकताच नव्हे, तर मातब्बरीहि अधिकच वाटल्याशिवाय राहात नाही !

"तैत्तिरिय उपनिषद् ३–५ येथे वर्णिलेला आनंदमय आत्मा म्हणजेच आनंदपूर्ण जीवात्मा ब्रम्हच होय. त्याच उपनिषदांत ३–६ येथील 'आनंदो ब्रम्हेति व्यजनात्' इ० वचनांत आनंद शब्द पुन्हःपुन्हः उच्चारलेला आहे. आणि त्यावरून आनंदाहि ब्रम्हच होय असें सांगितलें आहे "आनंदमयोऽभ्यासात्" या व्याख्येवरून व्यासाने असें जाहीर केलें आहे की, जीवस्थितींतील, आत्यंतिक आनंदाची अवस्था म्हणजेच जीवन्मुक्ति ! हेंच जीवाचें परमसाध्य आहे. पूर्णपणे व्याकृत झालेल्या आनंदप्रचुर ब्रम्हाचें वर्णन करणाऱ्या सूत्राचा अर्थ अशी आनंदप्रचुर जागृतावस्था प्राप्त करून घेण्याचा मनुष्याने प्रयत्न करावा. 'अत्र बम्ह समश्नुते' म्हणजे जिवंतपणीच ब्रम्हाचा उपभोग घेतो असें कठांत स्पष्ट, म्हटलें आहे. आनंदाचा खरा मार्ग दाखविण्याकरता उपनिषदें लिहिलीं आहेत असें या संबंधी भाउजींचे विचार आहेत.

गीताहि आनंदवादी व कर्मवादी आहे. गीतेंत सात्विक सुखवाद आहे. जगांत अल्पसा का होईना आनंदवाद आहे म्हणून संस्कृतीच्या, सौंदर्याच्या वगैरे कल्पनांना अशा प्रकारच्या दृष्टिकोनाने मोठाच आधार मिळाल्यासारखा झाला आहे.

चंट चार्वाक !!

सनातन्यांचें मत वेदावर सरांस विश्वास ठेऊन त्याप्रमाणे चालावें असें आहे. त्यांत व धर्मांत बदल करण्याचा मनुष्यास अधिकार नाही. वैदिक धर्मातील बहुतेक सर्व पंथास वेद मान्य आहेत. शंकराचार्यांनी वेद हे अपौरुषेय आहे असें म्हटलेलें आहे. चार्वाकासारखे खंदे वीर मात्र वेद हे स्वार्थी लोकांनी आपल्या हिताकरता केलेले आहेत, या मताचा पुरस्कार करतात. चार्वाकाच्या चंटपणाबद्दल एक प्रकारचा तिरस्कार वाटत असला, व त्यांचीं कित्येक मतें कडू असलीं तरी तीं चिंतनीय नाहीत, असें मात्र म्हणतां येणार नाही!

धर्मक्षेत्रांत चार्वाक ही व्यक्ति झडाडीच्या वैशिष्ठ्याने झळकत आहे! नैय्यायिक वेद पौरुषेयच मानतात! पूर्व मीमांसक वेदांतील शब्दच तेवढे खरें समजतात. 'जैन मार्गाचिआ आडबिदी' असून 'वेदपंथाचिआं राजबिदी' आहेत इ. उद्गार महानुभावीय पंथाबद्दल काढण्यांत आलेले असले तरी महानुभाव पंथाला कांही काळ अवैदिकत्वाचा वास येत होताच![1] भाऊजींनी 'वेद अपौरुषेय आहेत' असें म्हणून आपल्या पुरोगामित्वाचा व नावीन्यांचा आणखी एक उन्मेष व्यक्त केलेला आहे!

सृष्टींत बदल होऊं शकत नाही अशा तऱ्हचें एकमत पाश्चात्य तत्त्वज्ञानी पारमेनायडीज याने मांडलेलें आहे. असें मानलें तर सृष्टि ही साचलेल्या पाण्याच्या डबक्याप्रमाणे दुर्गंधीयुक्त होईल व प्रगतीचा कोणताच मार्ग शिल्लक उरणार नाही! हेराक्लायसिट्स व इतर कांही तत्त्वज्ञान्यांनी मात्र 'बदल हा सृष्टीचा आत्मा आहे' असें म्हटलें आहे! प्रसिद्ध कवी टेनिसननेहि "Old order changeth giving place to new" असे व या धर्तीच्या विचार–कल्पना आपल्या काव्यांत ठिकठिकाणीं मांडलेल्या आहेत.

१ बौध, जैन, ब्रम्ह समाज वगैरे वेदप्रामाण्य मानीत नाहीत.

वेद हे सर्व श्रेष्ठ ग्रंथ होत, याबद्दल वादच नाही. प्रागैतिहासाच्या दृष्टीनेच नव्हे, तर काव्याच्या दृष्टीनेहि या ग्रंथाचें महत्व अनन्य-साधारण आहे. वेदांतील–विशेषतः ऋग्वेदांतील–भव्य व्यक्ति श्रेष्ठांसमोर (Astounding characters) कित्येक वेळेला रामायण महाभारतामधील व्यक्तिचित्रेंहि फिकी वाटूं लागतात. येवढेच नव्हे तर दुसऱ्या देशीच्या प्राचीन ग्रंथांतील व्यक्तींहि तोकड्या पडतात असा भास होतो. आर्यांची उत्तुंग कल्पनाशक्ति वेदांत प्रकट झाली आहे. पण किती झाले तरी ते जुन्यांतील जुने ग्रंथ आहेत. त्यानंतर जगांतील प्रत्येक शाखेंतील ज्ञानाचा विकास येवढ्या मोठ्या प्रमाणावर झालेला आहे की त्या दृष्टीने वेदांतील कल्पना व विचार आधुनिक गुंतागुतीच्या प्रश्नांचा निकाल लावण्याकरता उपयोगी पडतील ही चुकीची समजूत आहे. त्या त्या काळांतील परिस्थिति-प्रमाणे शास्त्रांत घालून दिलेले नियम त्या त्या वेळच्या परिस्थितीला तारक झालेले असले तरी, पुढील परिस्थितीलाहि ते तसेच राहतीलच असें कसें म्हणतां येईल? कदाचित् ते मारकहि होतील. अशा परिस्थितींत ते बदललेच पाहिजेत. प्राचीन काळीं मनुसप्तर्षींसारख्या संस्थांना सुद्धा धर्म बदलविण्याचा अधिकार होताच! या विषयी 'प्रत्येक काळचे युगधर्म बदलत असतात. धर्म जर मानवी उन्नतीस पोषक नसेल तर तो बदललाच पाहिजे इ. विवेचन मी मागे पाने १२९–१३० वर केलेलेंच आहे.

कक्षिवानास यौवनदान!

वेदाचा उदो उदो करण्याच्या भरांत, (त्यांतून सर्व शास्त्रें निघालीं वगैरे दाखविण्याकरता) वेदांच्या ऋचांचे विचित्र अर्थ लावण्याचा दयानंद सरस्वतीसारख्या व इतर कांही थोर पुरुषांनाहि व्यामोह आवरला नाही, तेथे येरेगबाळे शास्त्री-पंडित कोणत्या झाडाचा पाला!

वेद अगदी निर्दोष आहेत असें कुणीहि म्हणणार नाही. त्यांतील अत्यंत मोठा दोष-विशेषतः ऋग्वेदांत-म्हणजे कल्पनाची असह्य झालेली पुनरुक्ति! शिवाय कित्येक ठिकाणीं विस्कळितताहि आहे!

जीवन हें विकासशील आहे असें मानलें तर कोणत्याहि बाबीप्रमाणे वेदांतसुद्धा संशोधन होणें क्रमप्राप्तच आहे! व्यत्यासाने वेद

हे अपौरुषेय असून, त्यात बदल करण्याचा मुळीच अधिकार नाही, असें म्हणणें, म्हणजे वर उल्लेखिलेल्या पारमेनायडीजच्याच तत्वाचा आश्रय करणें होय. आणि तें तत्व नुमतें प्रतिगामीच नसून अखिल मानवजातीच्या विकासाच्या दृष्टीने घातक व भयावहहि आहे, हें लक्षांत घेतलें पाहिजें !

यादृष्टीने वेदाचें पौरुषेयत्व मानून, बुद्धीच्या कसावर घासून त्याचें संशोधन करणें व त्यान्यांतून सुवर्णकण टिपून घेऊन, इतर शास्त्रांशीं त्याचा समन्वय करण्याचा मार्ग खुला करून देणें, या भाऊजींच्या कार्याबद्दल ते प्रशंसेस पात्र आहेत ![1] आपल्या प्रतिभामंजीवनांने, धर्मावरील जुन्या विचारांचीं जळमटें काढून टाकून त्यांत नवीन प्राण ओतणाऱ्या भाऊजींची कामगिरी, मृतवत् झालेल्या कक्षिवानाला ताजेपणचें नूतन रूप देणाऱ्या, किंवा पंखाची नाव करून भुज्यूला सागरांतून काढून त्याला प्राणदान करणाऱ्या अश्वींच्या कार्याइतकीच महत्तम आहे असें कोण म्हणणार नाही ?

## तीव्र ज्ञानलालसा

वाङ्मयांत व्यक्त झालेले लोकोत्तर व्यक्तिमत्व, तितक्याच प्रमाणांत जीवनांतहि प्रकट झाल्याचीं दृश्यें दुर्दैवाने क्वचितच प्रमाणांत दिसून येतात. वाङ्मयांत व्यक्त झालेल्या व्यक्तिमत्वाइतकेंच लौकिकांत प्रकट झालेलें भाऊजींचें विभूतिमत्वहि थोर आहे !

भाऊजींनी विद्येचा आजन्म हव्यास धरला. त्यांच्याशिवाय त्यांनी इतर कोणत्याहि बाबीची ईषणा ठेवली नाही. यमधर्माने नचिकेताला दीर्घायुष्य, पुत्रपौत्र, अलोट संपत्ति, नितंबवती नृत्यांगना देऊं केल्या असतांनादेखील त्या सर्वांविषयी तुच्छता दर्शवून, त्याने त्याला आत्मज्ञानाची मागणी केली, याची आठवण भाऊजींची तीव्र ज्ञानलालसा पाहून झाल्याशिवाय राहात नाही ! एका इस्टेटीच्या निर्णयांत पंच होणें, विद्यापीठाच्या ग्रंथपालाची जागा इत्यादि द्रव्यप्राप्तीच्या अनेक संधींना त्यांनी दाखविलेल्या विन्मुखतेवरून व डी. लिट्. सारख्या विलोभनीय पदवीचासुद्धा मोठ्या नाखुषीने स्वीकार करण्याच्या त्यांच्या कृतीवरून त्यांचें एकमेव ज्ञानपिपासूत्वच दृष्टीस पडतें !

१ अर्थात् या करता वेदाच्या मूळ संहितेंत बदल करण्याचें कारण दिसत नाही.

मध्यप्रांत कांग्रेसकमिटीच्या कोषाध्यक्षाचें काम त्यांनी एका पैचाहि इकडे तिकडे कमीजास्तपणा होऊं न देतां निर्लेपपणे केलें. दैत्यापासून आपली संपत्ति सुरक्षित राहावी म्हणून, देवांनी ती ठेव अग्नीच्या स्वाधीन केली होती. तिचा अन्यायाने परिग्रह करण्याचा दुर्बुद्धिमूलक लोभ प्रत्यक्ष अग्नींत देखील उद्भूत होऊन त्याने ती लांबविली.' मग सामान्य माणसाचा काय केवा ? भाऊजीसारखें पैशाचा व्यवहार अत्यंत चोख ठेवणारे थोडेच आढळतील !

कायदेभंगाच्या चळवळींत मुलाला दंडाची शिक्षा होऊन घरावर जप्ती आली असतां निर्विकार राहणें, किंवा पंचांगशुद्धतेसारख्या विषयांचा निकाल बहुमताने लावूं पाहणाऱ्या मालवीयजींना रोखठोक जबाब देण्याचा धडाका दाखविणें, हें त्यांच्या स्वभावांतील खडकाप्रमाणे कडक भावना दर्शविणारे प्रसंग असले तरी, झुळझुळ वाहणाऱ्या कोमल व आल्हादकारक नर्मविनोदी भावनांचे प्रसंगहि त्यांच्या आयुष्यांत कमी नाहित; किंबहुना आत्यंतिक आनंद हा त्यांच्या सर्व जीवनाचा पायाच आहे ! 'व्यासांची शंकराचार्यांवर फिर्याद' या लेखनपद्धतीच्या दृष्टीने चित्ताकर्षक झालेल्या त्यांच्या लेखांत, गंभीर विचारांबरोबरच त्यांची खेळकरपणाची भावनाहि वर उसळून आलेली दिसते. वादी-व्यास, प्रतिवादी-शंकराचार्य, वकील-दप्तरी. दाव्यांतील मागणी-सूत्रें शिकवूं नयेत, याबद्दल मनाई हुकूम. दाव्याची किंमत-अनंत कोटी रुपये. कोर्ट फी माफ-कारण वादी धनहीन आहे. अधिकार क्षेत्र-पृथ्वी (दोघाचेहि ग्रंथ येथेच असल्यामुळे) दावामुदतींत-सुखातीपासून आता-पर्यंत प्रतिवादी बदनामी करीत असल्यामुळे ! अशा थाटाने नावीन्ययुक्त व कांहीशा विनोद गर्भ पद्धतीचा अवलंब करून शंकराचार्यांवरील आक्षेप सिद्ध करण्याचा त्यांनी प्रयत्न केलेला आहे !

### " मज अध्यक्षस्थान देल ! "

भाऊजीसारख्या थोर व्यक्तींत रागाचा मागमूसहि दिसण्याचा संभव कमीच ! सभेत व्याख्यान देत असतां त्यांचीं नातवंडें वगैरे पाठीवर चढून

१ तैत्तिरीय संहिता

त्रास देऊं लागली तरी "सुधा राहा ना गा!" असें अस्सल नागपुरी भाषेंत म्हणून ते व्याख्यानाची साखळी तुटूं न देतां शांतपणे चालूंच ठेवतील! नागपुरी भाषेंत बोलणें हें त्यांचें एक खास वैशिष्ट्य आहे. व्याख्यानाच्या सुरवातीस "आपन मज अध्यक्षस्थान देल–" अशा शब्दांनी सुरवात करून पुढे व्याख्यानांतहि ते शुद्ध नागपुरीच भाषा वापरतील. बोलण्यांत ण–न, श-ष इत्यादिकांची पत्रास ते कधी ठेवीत नाहीत.

रागाबरोबर अहंकाराचाहि त्यांस स्पर्श होऊं शकत नाही. "शंकराचार्यांच्या भाष्याविरुद्ध फिर्याद करण्यास व्यासाला सव्वा बाराशे वर्षं कुणी बुद्धिमान वकील सापडला नाही. शेवटीं त्यांना 'दप्तरी' हा वकील सापडला; आद्यशंकराचार्यानंतर उपनिषदाचा इतका सखोल अभ्यास मीच केला व शंकराचार्यहि ठिकठिकाणीं कसे चुकले हें मी माझ्या ग्रंथांत दाखविलें आहे." किंवा "माझ्या ग्रंथापासून भारताचा व जगाचा फायदा होईल असें मला वाटतें" असे स्वतःविषयी उद्गार काढण्यांत अहंकाराचा आशय दिसत असला तरी, वस्तुस्थिति तशीच असल्यामुळे त्याला अहंकार म्हणून मुळीच संबोधतां येत नाही! भाऊजी व अहंकार या परस्पर विरोधी गोष्टी आहेत याचा निर्वाळा श्री. ना. झु. नंदुरकरासारखे त्यांचे विद्यार्थी व त्यांचे अनेक परिचित देऊं शकतात!

"Astronomical method" या त्यांच्या ग्रंथाबद्दल नागपूर विद्यापीठाने त्यांना सुवर्ण पदक देऊन गौरविलें किंवा डी. लिट्. ची पदवी दिली हें यथोचितच झालें. पण त्यांना एकाददुसरे वेळीं मिळणारीं बक्षिसें वा देणग्या म्हणजे त्यांच्या सेवेच्या मानाने कांहीच नव्हत![1]

वर उल्लेखिलेल्या ग्रंथ व प्रबंधाखेरीज भाऊजींचे 'तात्त्विक मीमांसा पद्धति' 'श्रीरामाच्या वनवासाची रोजनिशी, 'राजतरंगणी निरीक्षण'

१ पंचाग कमिटीने त्यांना एक हजार रुपयाचें बक्षीस दिलें. नागपूर ॲकॅडेमीने 'भारतीय ज्योतिःशास्त्र निरीक्षण' या त्यांच्या ग्रंथाला १५० रु. चें बक्षिस दिलें. (म्हणजे कांहीच नव्हे!) त्याचप्रमाणे धर्मविवाद स्वरूप, या त्यांच्या ग्रंथाबद्दल महाराष्ट्र साहित्य परिषदेने त्यांना पांचशे रुपयांचें बक्षीस दिलें आहे.

'तीन कालिदास' 'भारताच्या अवनतीचीं कारणें व उन्नतीचीं साधनें' 'आर्यांचा मौर्यपूर्व इतिहास' 'विक्रमादित्याच्या घोटाळ्याचा उलगडा,' 'कल्की कोण ?' 'भूमिती' (अप्रत्यक्षासिद्धिरहित) 'उपनिषदांचा वस्तुनिष्ठ व बुद्धिप्रत्ययार्थक अर्थ, व व्यासमूत्र भाष्य' 'एकोपनिषद् भाष्य' 'उपनिषदांतील मानवाचें प्रामण्य' 'ब्राम्हण, त्यांचीं कर्तव्यें व अधिकार,' 'गीता जयंति तिथी' 'वैद्यकसमन्वयाची रूपरेषा' 'औषधी गुणादर्श' इ० अनेक महत्वाचे ग्रंथ व लेख आहेत. 'The Astronomical Method' हा ग्रंथ नागपूर विद्यापीठाने प्रकाशित केलेला आहे. त्यांचे पूर्वी उल्लेखिलेल्यापैकी व येथे उल्लेखिलेल्यापैकी कित्येक ग्रंथ व लेख अजूनहि अप्रकाशितच आहेत. त्यांचें प्रकाशन तांतडीने व्हावयास पाहिजे, हें मी मागे सुचविलेलेंच आहे.

### मनःपूत मोकाटपणा !

आजकाल धर्माच्या बाबतींत मतामतांचा फार गलबला झालेला आहे. कोणाचाच पायपोस कोणाच्या पायांत उरलेला नाही. पूर्वींच्या काळीं कर्मकांडाचें प्रस्थ अवास्तव माजून, खंडोगणती कर्मे आम्हास करावीं लागत; तर आताच्या काळीं कांहीच करण्याचें प्रयोजन उरलें नाही. पूर्वी प्रत्येक बाबतींत कर्मांची सक्ति तर आता मनःपूत मोकाटपणा ! धर्मविषयक कोणतीहि गोष्ट केली तरी वाहवा न केली तरीहि वाहवा ! एकाचें जुनें पंचांग तर दुसऱ्याचें टिळक पंचांग ! एकाची जुन्या पंचागाप्रमाणे जी शुभतिथी तीच दुसऱ्याची टिळक पंचागाप्रमाणे अशुभ ! एकाच्या घरीं आज एकादशी तर दुसऱ्याच्या घरीं तिचें पारणें चालू असतें ! लग्न, मौंजी, श्राद्ध, पक्ष, व्रतवैकल्यें इत्यादि कार्यांतहि काही आपल्या आयुष्याचा दीर्घ कालापव्यय करतांना दिसतात तर कांही तीं सारीं कार्यें टिप्परघाईच्या 'चट' पद्धतीने उरकून मोकळे होतात ! हुंड्यापांड्यान्या बाबतींत तर शुद्ध 'दांडे पान्हवन'च चाललेली दिसते ! दंडाऱ्यावेलींशेजीसारखे, वराने आपल्या वधूला 'शकुन दिवा' घेऊन शोधून काढण्यासारखे खुळेपणाचे प्रकार तर सर्रास चालतात ! मिशाला पीळ भरून (चुकलों ! मिशाविरहीत ओठांनाच) पुरोगामित्वाच्या गप्पा झोकत असतां, कांही जुन्या रूढीचें तुणतुणें वाजवितात तर कांहीं निर्लज वर्तणूक

करून त्या तुणतुण्याची तारच तोडून टाकण्यांत धन्यता मानतात. 'एवंच तंबोऱ्याचा स्वर उंचा व तबल्याचा ताल ढाली' याप्रमाणे गैरशिस्तीचें दृष्य दिसून येतें. आपल्या इकडे आध्यात्माच्या बाबतींत कांहीच अभ्यास न करतां केवळ पोपटपंची करणारे गुरूचे गोतावळे, संताळ्यांचे मेळावे व शास्त्री पंडितांचे कळप विखुरलेले असून, ते लोकाची धर्माच्याबाबतींत दिशाभूल करताना दिसतात. यावर समाज बुद्धिवादी करणें हा एकमेव रामबाण उपाय आहे यांत शंकाच नाही !

वैदिक धर्मात, निरनिराळ्या शास्त्रकारांची दक्षिणोत्तर धृवांच्या टोकाइतकीं विरुद्ध मतमतांतरें आहेत. उ० प्राचीन शास्त्रकारांनी यज्ञसंस्थेचा जयघोष केला, भगवत्‌गीतेने कर्म हाच यज्ञ प्रतिपादिलें, तर छांदोग्य उपनिषेद्‌काराने यज्ञाचा धिःकार केला आहे ! असेच जवळ जवळ प्रत्येक बाबीचें ! अजूनहि कमी मतें मतांतरें नाहीत ! तार्‍यांच्या शर्यतीकडे पाहून त्यांच्या तेजःप्रकर्षाने दिपून जाणाऱ्या सामान्य लोकांची, शास्त्रें व शास्त्रकारांच्या बाबतींत विचारमूढतेचा व निष्क्रीयतेची (कोणाचें मत ग्राह्य मानावें याचा संभ्रम पडल्यामुळे) स्थिति झालेली आहे !

इस्लामी धर्माचीं तत्वें वैदिक धर्माच्या मानाने संकुचित असतील; पण त्यांत वैदिक धर्माइतका गोंधळ नाही. त्यांत नमाज (उपासना), रोजा (उपवास), हज (मक्केची यात्रा) इत्यादि थोडक्याच सांगितलेल्या आज्ञा बहुतेक सर्वच आस्थेने पाळतात. आगगाडीच्या डब्यांतील रेटारेटींत सुद्धा हिरव्या चौकड्याचें वस्त्र पांघरून ते आपले नमाजाचें आन्हिक शांतपणे उरकत असलेले दिसतात. इस्लामी लोकास धर्म पोरखेळ वाटत नाही !

### मनु सप्तर्षी

या सर्वात एकसूत्रीपणा आणण्याकरता पूर्वीच्या 'मनुसप्तर्षी' सारखी एक संस्था अस्तित्वांत आली पाहिजे हें भाऊजींचें मत अत्यंत स्वागतार्ह आहे.

आर्यांच्या जुन्या धर्माच्या पायावर नवीन धर्माचें मंदिर स्थापून, आजच्या काळाला पुरा पडणारा विश्वव्यापी, सर्वंकष, तेजस्वी एकच

एक मानवताधर्म[1] प्रस्थापित करण्याचा काळ आलेला आहे. त्याचें स्वरूप, सर्व जगाला प्रकाश देणारें, 'देव पुराणांत वा कुराणांत नसून सर्वभूतीं आहे असे मानणारे,' 'नीतीचें पद जेथे न ढळे धर्म होतसे तेथेच स्थिर' या तत्वाचें शिरोभूषण असणारें, सत्कर्म व सेवाभावाची सर्वत्र पखरण करणारें, अशा तऱ्हेचें महोदार असावें. मनुसप्तर्षी संस्थेसारख्या संस्थेने कांही उच्च तत्वज्ञानाच्या विवाद्य बाबीसंबंधी निर्णायकता आणण्याचा प्रयत्न तर करावाच; पण नवयुगाच्या चाहूली लक्षांत घेऊन, कांही सुटसुटीत व सर्वांनी अवश्यमेव पाळण्यासारखे निर्बंधहि तयार करावेत. भारत सरकारने त्या संस्थेला मान्यता देऊन, जनतेने या संस्थेचे तेवढे नियम तरी कटाक्षाने पाळलेच पाहिजेत, असा दंडक करावा. जनतेनेहि स्वखुषीनेच ते नियम पाळावेत.

महात्मा गांधींचें या बाबतींतील कार्य अविस्मरणीयच नव्हे तर स्फूर्तिप्रद आहे. आर्यसमाज, प्रार्थनासमाज, सर्वोदयसमाज यांनीहि या बाबतींत मोठें कार्य केलेलें आहे. टिळक, अरविंद घोष, डॉ. राधाकृष्णन, डॉ. दासगुप्ता, रानडे इत्यादिकांच्या ग्रंथांतील विचार अमोल आहेत. त्या सर्वांचा उपयोग मनुसप्तर्षींसारख्या संस्थेस होण्यासारखा आहे.

धर्माची धुरा उचलणें केवळ दिखाऊ पंडितांचें काम नव्हे. प्रजापतीने साक्षात् इंद्राला १०१ वर्षें अध्ययन करण्यास सांगून, त्याची पात्रता सिद्ध झाल्यावरच त्यास ज्ञानदान केलें! मनुसप्तर्षींसारखी संस्था अशा पंडितांनी मंडित असावयास पाहिजे. भाऊजींनी जन्मभर धर्मशास्त्रांचा सखोल अभ्यास करून धर्मशास्त्र अधिकारवाणीने सांगण्याची पात्रता मिळविलेली आहे. त्यांनी सांगितलेल्या गोष्टींचा डोळे उघडून लोक नीट विचार करतील तर, धर्मविषयक बऱ्याच तत्वांचा उलगडा झाल्याशिवाय राहणार नाही.

---

१ आजकाल निधार्मिकतेचें तत्व प्रसृत होत आहे. याचा अर्थ एवढाच की, विश्वव्यापी, एकच एक मानवताधर्म व्हावा. मानवजातीला कोणत्या तरी धर्माची आवश्यकता असल्यामुळे, 'निधार्मिक राष्ट्र' या शब्दांना फारसा अर्थ उरत नाही.

जुना वेद टाकून देऊन, आपल्या पराक्रमाने नवीन वेद मिळविणाऱ्या याज्ञवल्क्याच्या तोडीचे महाभाष्यकार भाऊजी, सरकार व लोकमान्यता मिळालेल्या अशा मनुसदृशी संस्थेचे प्रमुख शोभतील असें म्हटल्यास ते गैरवाजवी होईल काय ?

## म. म. कृष्णशास्त्री घुले

प्रतिभादीप्ति !

कृष्णशास्त्री घुले हे विदर्भातील एक प्रगाढ संस्कृत पंडित होऊन गेले. त्यांनी वैदिक वाङ्मय, धर्मशास्त्र, व्याकरणशास्त्र, साहित्यशास्त्र यांत पहिल्या श्रेणीचें संशोधन केलेलें आहे.

त्यांनी 'दाशराज्ञ युद्ध' 'महादेवाचें मूळ स्वरूप' 'भ्रातृव्य व सपत्न' 'मित्र व अमित्र' 'दिती आणि आदिती' 'वेदांतील सरस्वती नदी' इत्यादि स्वतंत्र वैदिक निबंध लिहिले. त्यांचा अंतर्भाव 'घुले स्मारक ग्रंथां'त झालेला आहे. 'गोत्र प्रवर निर्णय' 'हौत्रध्वांत दिवाकर' 'सापिंड्य भास्कर' (संस्कृत निबंध) इत्यादि त्यांचे धर्मशास्त्रावरील निबंध होत. 'हिंदूंची असगोत्र विवाहपद्धति' (Hindu exogamy), 'श्री चक्रधरसिद्धांतसूत्रें' 'प्राचीन महाराष्ट्र' इत्यादि त्यांचे समालोचनपर निबंध आहेत. या खेरीज 'रघुकुमाराचें पौर्वापर्य' 'कालिदासाचा काळ' 'गाथा सप्तशतीचा कालनिर्णय' 'पाणिनीच्या व्याकरणांतील कांही दोष' 'वेदांतील रोगजंतुशास्त्र' 'श्री. गजाननाचा काळ' 'यज्ञसंस्था आणि पशूबळी' 'गीतारहस्यावरील लेख' इत्यादि त्यांचे कांही अंशी वेदविषयक व इतर संकीर्ण विषयावरील लेख आहेत. हे सर्वच लेख त्यांच्या अंतर्भेदीबुद्धीचे द्योतक असून, विदर्भ-संशोधन-क्षेत्रास कायमचे ललामभूत होणारे आहेत.

भाऊजी दप्तरी हे घुलेशास्त्री यांचेजवळ कौमुदी शिकले, हें लक्षांत घेतले म्हणजे शास्त्रीबोवांच्या योग्यतेविषयी जास्त लिहावयास नकोच ! विद्यापीठाची कोणतीच उपाधि नसून देखील (त्यांचें शिक्षण फक्त इंटर-मिजिएटपर्यंतच झालें होतें. विद्यापीठाने त्यांना म. म. ही पदवी देऊन त्यांचा बऱ्याच कालावधीनंतर गौरव केला ही गोष्ट वेगळी !) त्यांच्याजवळ विद्यापी-ठांतील आचार्यप्राचार्यांनांहि धडे घ्यावेत, एवढी त्यांच्या विद्वत्तेची पातळी उंच

होती! संस्कृतांत तर त्यांच्या तोडीचे पंडित प्रायः अभावानेच दिसून येतात. त्यांची हिंदी, इंग्रजी, बंगाली, गुजराथी, फ्रेंच व उर्दू या भाषांतील अभिज्ञता सर्वश्रुतच आहे. त्यांचें विद्यावैभव अनभिषिक्त '–स्वयमेव मृगेंद्रता' होतें! 'पंडित साम्राट' ही पदवी कुणाला शोभत असेल तर ती घुले शास्त्र्यांनाच! ज्यांनी पाणीनिसारख्या महाप्रज्ञ पंडिताच्या व्याकरणांतील देखील दोष दाखविण्याचें धाडस केलें; व पाणिनी,[1] ग्रिफिथ,[2] डॉ. म्यूर,[3] प्रो० मॅक्‌डोनल्ड,[4] सायणाचार्य,[5] गोल्डस्टूकर,[6] मल्लिनाथ,[7] राजवाडे,[8] डॉ. केतकर,[9] प्रो० लुविग[10] इत्यादि विद्वानांचीहि कांही विवाद्य मुद्यांबद्दल मति कुंठित झाली, त्या मुद्यांचा समाधानकारक निर्णय ज्यांची सूक्ष्म-ग्राही बुद्धि देऊं शकली, त्या घुलेशास्त्री यांच्या अद्‌भुत प्रतिभादिप्तीचें

१ 'सपत्न' शब्द कसा सिद्ध झाला, त्यांत प्रकृति कोणती, प्रत्यय कोणता, व्युत्पत्त्यर्थ काय, वगैरे सांगण्याच्या भानगडींत पाणिनी पडला नाही.

२ इंद्राचा भाऊ आणि त्याचा पुत्र, कोण, हें ग्रिफिथला सांगतां आलें नाही.

३ डॉ० म्यूरलाहि वरील कोडें उलगडलें नाही.

४ प्रो० मॅक्‌डोनल्डने वरील अर्थ सांगतां येत नाही हें कबूल केलें आहे.

५ सायणाचार्यांने वरील मुद्याबद्दल दोन अर्थ सुचविलेले होते; पण ते असमाधानकारक होते.

६ वेबर व बोर्थलिंग यांनी पाणिनीच्या व्याकरणावर घेतलेल्या आक्षेपांचें गोल्डस्टूकर याने (घुले यांनी पाणिनीच्या व्याकरणांतील दोष दाखविण्यापूर्वीच) पूर्ण निरसन केलें होतें.

७ मल्लिनाथाने कालिदासाच्या मेघदूतांतील 'प्रथम दिवसे' हाच पाठ बरोबर असें ठरविलें होतें, व हेंच मत विद्वानांत ग्राह्य होतें.

८ श्री गजाननाच्या व गाथासप्तशतीच्या काळाबद्दल वाद.

९ वरील (८ मधील) मुद्याचाच वाद; व प्राचीन महाराष्ट्राच्या आदि-पर्वांतील कांही मुद्दे.

१० वरुणाचे पुत्र म्हणजे नक्षत्रें होत हें लुविगचें म्हणणें बरोबर नाही असें शास्त्रीबोवांनी दाखविलेलें आहे.

वर्णन करण्यास कोणते शब्द योजावयाचे ? वैदिकवाङ्मय-संशोधनांत तर त्यांच्या मेधेला शिलतास समा आलेली दिसते ! संशोधन गिरि-परिसरांतील निर्णय-कनाळीचा भाग, त्यांच्या वाङ्मय-वनराजीजवळ गर्द झाल्यासारखा वाटतो ! त्यांचा वैदिक वाङ्मयांतील अनिरुध्द संचार पाहून अंगिरस, ब्रम्हवृक्ष, सप्तर्षि इत्यादि मेधेच्या देवतांनी त्यांच्यावर आपला अखंड वरदस्तच ठेवला होता की काय असा भास होतो !

.नागपूरांतील सर्व पंडित घराणीं घुलेशास्त्री व त्यांच्या घराण्याला गुरु-स्थानीं मानीत. त्यांचे वडील म. म. भाऊशास्त्री घुले हेहि नागपुरांतले एक मोठे विद्वान होते. त्यांच्या एका पूर्वजास, 'तुझ्या कुलांत विद्वानच निपजतील' असा वेदव्यासांनी वर दिलेला होता. पण त्यांचे त्यानंतरचे दुसरे पूर्वज आत्मारामपंत (हेहि विद्वान पुराणिक होते) यांस पुराण ऐकण्यास येणाऱ्या अश्वत्थाम्याने 'तुझ्या सातव्या पीढींत ही विद्वत्ता नष्ट होईल' असा शाप दिला. म. म. कृष्णशास्त्री घुले हे त्यांच्या घराण्याच्या सातव्या पिढींतिल विद्वान होते. ते कालवश झाल्यानंतर त्यांच्या घराण्यांतील विद्वत्ता खरोखरच अस्तंगत झाली. वरील शापाबद्दलची जनश्रुति खरी असो अगर नसो; पण योगायोग मात्र ती खरी वाटण्यासारखा घडून आला ! तरी पण नागपूरांतील पंडित परंपरा अगदींच खंडित झाली असें म्हणतां येत नाही. श्री. बाळशास्त्री हरदास वगैरे सारखे त्यांचे विद्वान शिष्य अजूनहि त्यांच्या विद्येला तरता हात देत आहेत !

शास्त्री घराण्यांतील संस्कार मनावर दृढ झालेले असले तरी, घुलेशास्त्री यांची वृत्ति गतानुगतिकत्वाची नसून नव्या प्रणाली आत्मसात करण्याइतकी प्रगमनशील होती. त्यांच्या 'पतितोद्धार' या मागेच उल्लेख आलेल्या ग्रंथा-वरुन, व ऋग्वेदाचें मराठींत भाषांतर करण्याच्या त्याच्या प्रयत्नावरून हें दिसून येण्यासारखें आहे. पतितपरावर्तनाची चळवळ विदर्भात पुन्हा सुरु होण्यापूर्वीच, परधर्मात गेलेल्यांना हिंदुधर्मात परत घेतां येतें, हे शास्त्रार्थांने त्यांनीं दाखवून दिलें. ऋग्वेदाचें भाषांतर ही त्यांची एक फार महत्वाची कामगिरी म्हणतां येईल.

'इनकमटॅक्स न्याय'

शास्त्रीबोवांच्या लेखनपद्धतींत शब्दावडंबराचा मागमूस नसून, कमालीची तर्कशुद्धता आहे व तितकीच सहजताहि आहे ! वादाच्या

आखाड्यांत उतरले असतां, ते सामन्यांतील सर्व शिष्टाचार तंतोतंत पाळून केव्हाहि संयम सुटूं देत नाहीत ! व सत्यापलाप तर कधीच करीत नाहीत ! आपला मुद्दा खंबीर, व त्याला आपण देणारीं प्रमाणें भरभक्कम आहेत या आत्मविश्वासाचेंच तेज त्यांच्या बहुतेक लेखनांत दिसून येतें. प्रतिपक्षाने शिष्टाचाराचा मर्यादातिक्रम केला, व वाद करण्यांत अर्थ नाही असें त्यांना दिसतांच ते वाद बंदहि ठेवीत ! ' गाथासप्तशतीचा काळ ' या बद्दल वादविवाद चालला असतां राजवाडे यांची वादपद्धति पाहून, वाद चालू ठेवणें निरर्थक आहे हें त्यांना दिसून आलें व एकादा शिलालेखासारखा सबळ पुरावा पुढे येईपर्यंत स्वस्थ बसण्याचें त्यांनी ठरविलें !

त्यांच्या तर्कनिष्ठुरतेखाली, रसिकतेचा व नर्मविनोदाचा एक निरामय अंतःप्रवाह दिसून येतो. मुक्तछंदाच्या सुरवातीच्या कालांत, त्यांनी मुक्तछंद-प्रवर्तकाचें, ' माझी पाहिली कुमारी कविता ' मुक्तछंदांतच लिहून, गमतीचें विडंबन केलें होतें, ही गोष्ट अजूनहि पुष्कळांच्या लक्षांत असेल ! आणखी दुसरें एकच उदाहरण देतों. ' प्राचीन महाराष्ट्र ' या ग्रंथांत ' पौराणिक अगस्त्य हा सूक्तकर्त्या अगस्त्याहूनहि प्राचीन होय ' असें विधान करून केतकरांनी पुढे लिहिले होतें की, 'अगस्त्याची व त्याच्या वंशजाचीं सूत्रें ऋग्वेदांत आहेत, यावरून ऋग्वेदांत समाविष्ट केलेलीं सूक्तें दक्षिणेंत देखील उत्पन्न झालीं असणें शक्य आहे, हें गृहित धरलें पाहिजे व तीं झालीं नव्हतीं असें म्हणणाऱ्यांशीं सबळ प्रमाणें मागितलीं पाहिजेत !" घुले शास्त्री यांना त्या ग्रंथाचें समालोचन करतांना त्यासंबंधी असें लिहिलें होतें : ' वा ! हा तर खासा न्याय आहे ! त्यांनी म्हणे कोणत्याहि आधारावाचून वाटतील तशीं भरमसाट विधानें करावीत व तीं बरोबर आहेत असें गृहीत धरावें; आणि तीं तशीं नाहीत, असें म्हणणाऱ्याने मात्र सबळ प्रमाणें दिलीं पाहिजेत. हा तर अगदी 'इनकमटॅक्स' न्याय झाला ! तोहि असेंच म्हणतो की तुमचें उत्पन्न अमुक इतकें आहे असें आम्ही गृहीत धरतों; आणि तितकें उत्पन्न नाही असें तुमचें म्हणणें असेल तर तें, सबळ प्रमाणांनी सिद्ध करा. डॉ. साहेबांची मागणी अन्यायाची असली तरी आम्ही एकवेळ ती पुरवितोच !" .

## तेजस्वि उन्मेष !

'भ्रातृव्य व सपत्न' या लेखांत 'भ्रातृव्य' या शब्दाचा अर्थ 'भ्रातुः पुत्र' म्हणजे भावाचा मुलगा असा होत असतां, शत्रू असा अर्थ का व कसा झाला? या प्रश्नाचें उत्तर कोठेंच पाहावयास मिळत नव्हतें. हा कूट प्रश्न कोश्या करणांनाहि सोडवितां आला नव्हता. तसेंच 'सपत्न' या शब्दाबद्दलचेंहि झालें होतें. आधुनिक पौरस्त्य किंवा पाश्चात्य पंडित यांनीदेखील तो शोध लावला नव्हता. वरील लेखात 'आदित्याचा शत्रू हेच वरुणाचे पुत्र होत; आणि वरुण हा आदित्याचा भ्राता असल्यामुळे त्यांचे पुत्र अर्थात भ्रातृव्य हेच त्याचे (आदित्याचे) कायमचे शत्रू असल्यामुळे भ्रातृव्य हा शब्दच शत्रू या अर्थी रूढ झाला. भ्रातृव्य म्हणजे इंद्राचा किंबहुना इंद्रोपलक्षित सर्व आदित्यांचा भाऊ जो वरुण, त्याचे पुत्र जे असुर, दस्यु, किंवा दास ते होत व उषेची सपत्नी म्हणजे रात्रीच असून, तिचे पुत्र म्हणजे अंधःकाररूपी असुर हेच सपत्न होत' असें शास्त्रीबोवांनी वेद, उपनिषदें व इतर प्राचीन ग्रंथ यांच्यांतील आधार देऊन सिद्ध केलेलें आहे.

पाणिनीची अष्टाध्यायी निर्माण झाल्याला आज जवळ जवळ तीन हजार वर्षें झालीं. कात्यायन पतंजली यांच्यासारख्या विद्वानांनी त्यांतील सर्व दोष काढून टाकलेले आहेत; पण शास्त्रीबुवांनी, 'ङमोऽह्रस्वादचि ङमुण्नित्यं' या स्वतःच्या सूत्राचा पाणिनीने पदोपदी कसा भंग केलेला आहे, पुष्कळ ठिकाणीं संज्ञायुक्त शब्द किंवा पारिभाषिक शब्द यांचीं लक्षणें न देतांच, सूत्रामध्ये त्यांचा उपयोग करणें, त्यांना आपल्या लक्षणसूत्रामध्ये जीं विशेषणें दिलेलीं आहेत त्यांचें विशेष्य कोणतें, हें समजण्यास साधन नसणें इत्यादि अनेक दोष दाखवून दिलेले आहेत. इतकेंच नव्हे तर त्यापुढे कात्यायन, पतंजली इत्यादिकांनी दाखविलेले पाणिनीचे दोष, दोष कसे नाहीत, हें दाखवून त्यांनी आपल्या बुद्धिमत्तेचा आणखी एक तेजस्वी उन्मेष प्रकट केलेला आहे !

श्री. गजाननाचा व गाथासप्तशती काळ, या आशयाच्या लेखांत १९०६ सालींच (वि. वि. विस्तार) घुले यांनी बाणाच्या हर्षचरिताच्या पूर्वीच्या कोणत्याहि निश्चित कालाच्या ग्रंथांत गजाननाचा उल्लेख नाही, व सहाव्या

शतकापूर्वीच्या कोणत्याहि शिलालेखांत गजाननाचें नांव नाही इ. अनेक पुराव्यावरून गजाननाचा काळ सहाव्या शतकापूर्वी जाऊं शकत नाही असें सिद्ध केलें होतें. राजवाडे व त्यांच्या मतावर आधारलेलें डॉ. केतकरांचें निराळें मत असलें, (गजाननाचा काळ १५०० ते १८०० वर्षांचा जुना ठरतो) तरी डॉ. भांडारकर, डॉ. कालिदास नाग इत्यादिकांचा घुलेशास्त्री यांच्याच मतास पाठिंबा होता. डॉ. भांडारकरांनी ती देवता इ. स. च्या सहाव्या शतकांत उदयास आली, असें सांगितलें आहे. डॉ. नाग यांचें म्हणणें ही देवता गुप्तकालानंतरची असावी असें होतें. घुलेशास्त्री यांनी, बहुतेक पौर्वात्य व पाश्चात्य पंडितांनी ठरविलेला गाथासप्तशतीचा पहिलें दुसरें शतक काळहि चुकला आहे हें ठरविण्याचा प्रयत्न केलेला आहे. व तो त्यांनी सहावें शतक आहे असें निर्विवाद सिद्ध केलेलें आहे.[1] गाथासप्तशतीच्या कालाचा व गजाननाच्या काळाचा संबंध आहे. गाथासप्तशतीचा काळ जर सहावें शतक असेल–व तें घुले यांनी निश्चित मांडलें आहे–तर गजाननाचा काळ पहिल्या शतकाइतका मागे जाऊं शकत नाही असें घुले यांचें मत आपोआपच सिद्ध होतें.

'मेघदूताचा खरा पाठ कोणता ?' या लेखांत कालिदासाच्या काळीं पौर्णिमांत मास प्रचलित असल्याने, 'आषाढस्य प्रशम दिवसे' हाच पाठ घेतला असतां सर्व श्लोक संगतवार लागतात असें त्यांनी कालगणनेचा हिशोब करून व 'स जहार तयोर्मध्ये–' 'तदाननंमृत्सुरभिः–' इत्यादि कालिदासाच्या रघुवंशांतील श्लोक आधारास घेऊन व इतर पुराव्यांनी दाखविलेलें आहे.

शृंगापत्ति !!

'प्राचीन महाराष्ट्र' या लेखांत 'डॉ. केतकर यांचीं पुष्कळशीं अनुमानें गृहित धरलेल्या हेतूवर अधिष्ठित असल्यामुळे, त्यावर उभारली जाणारी

---

१ मिराशींनी 'गाथा सप्तशतीचा विशिष्ट काळ ठरविणें दुरापास्त आहे; गाथासप्तशतींत आठव्या शतकापर्यंत वेळोवेळीं भर पडत गेली असावी' असें मत मांडलें.

इतिहासाची इमारत, ठिसूळ पायावर उभारल्या गेलेल्या, इमारतीप्रमाणे फार वेळ टिकूं शकणार नाही हें दर्शविलें आहे. त्याचप्रमाणे डॉ. केतकर म्हणतात त्याप्रमाणे दाशराज्ञ युद्ध हें अत्यंत महत्वाचें मानण्यांतील अडचणी दाखविलेल्या आहेत.

'महादेवाच्या मूळ स्वरूपांत' त्यांनी असें सिद्ध केलें आहे की, महादेव हा अग्नि, आणि रुद्र म्हणजे मेरु पर्वत व उत्तर ध्रुवाकडील शरदृतूंतील अंधःकारमय प्रदेश होय, असें समजलें म्हणजे महादेवाच्या चरित्रांतील सर्व गोष्टींचा उलगडा होतो. याच लेखाच्या चवथ्या भागांत महादेवाच्या लिंग-मूर्तींचा विचार केला असून, ती देखील अग्निचेंच द्योतक कसें आहे, हें दर्शविलेलें आहे.

'श्रीचक्रधर सिद्धान्त सूत्रें आणि श्री. बाळकृष्ण शास्त्री' या लेखांत शके ११४२ सालीं भाद्रपद शुक्ल द्वितीयेस रविवार येतो, शुक्रवार येत नाही हें दर्शवून, त्यामुळे शुक्रवार ग्राह्य मानल्यास शास्त्रीजींचा श्रीचक्रधराचा आरंभकाल ११४२ हा खोटा ठरतो; अग्राह्य मानल्यास लीलाचरित्र खोटें पडतें, अशी घुलेशास्त्री यांनी शृंगापत्ति निर्माण केली आहे !

त्यांचा 'दिति व अदिति' हा लेख (वि. वि. विस्तार) त्यांतील संशोधन व काव्यात्मता या दृष्टीने कुणासहि अपूर्व असाच वाटेल. त्यांत प्रकाशात्मकदेव हे अदितीचे पुत्र म्हणून आदित्य आणि असुर हे दितिचे पुत्र म्हणून दैत्य होत; अदिति हे क्षितिजावर दिसणारे उत्तर गोलार्ध व दिति ही अर्ध गोलार्ध होय असें मांडलेलें आहे !

महानुभावीय वाङ्मयाकडेहि हे कांही काळ वळले होते व लीलाचरित्राची अप्रकाशित पोथी मिळवून ती प्रसिद्ध करण्याचा त्यांनी उपक्रम केला होता. मध्यप्रांत संशोधन मंडळाचे ते आजीव सभासद व कांही काळ उपाध्यक्ष होते. व वृद्धावस्थेंत ८० व्या वर्षी वयाच्या शेवटच्या आजारांत त्यांनी 'ऋग्वेद-पूर्व वेदाध्ययनाची पद्धति होती' हा शोध लावला !

घुलेशास्त्री यांच्या संशोधनाच्या कांही वैशिष्ट्यांपैकी, एकच शोधामुळे त्या त्या क्षेत्रांतील बहुतेक सर्व बाबींचा उलगडा होईल, इतक्या व्यापक

व खोल तऱ्हेने सिद्धांत बांधणें व एकेका शब्दाकरता अफाट वाङ्मयनिधी आमूलाग्र धुंडाळणें, हीं दोन होत. मेघदूताचा खरा पाठ कोणता हें ठरविल्याने सर्व श्लोक संगतवार लागतात, किंवा महादेव हा अग्नी व रुद्र म्हणजे मेरू पर्वत वगैरे समजले म्हणजे महादेवाच्या चरित्रांतील बहुतेक सर्व गोष्टींचा उलगडा होतो इ. पहिल्या वैशिष्ठ्याचीं उदाहरणें म्हणतां येतील. 'भ्रातृव्य' शब्दाकरता त्यांनी सबंध ऋग्वेद, इतरवेद व प्राचीन ग्रंथ डोळ्याखाली घातले! गजाननाच्या लेखाकरतां त्यांनी बाणाच्या हर्षचरिताच्या पूर्वीच्या ग्रंथाचे संपूर्ण आलोडन केलें; 'दाशराज्ञ युद्धाकरता' (त्या विषयावरील सूक्तांकरता) सबंध अफाट वैदिक व लौकीक वाङ्मयाचा मागोवा घेऊन, ऋग्वेदांतील दोनतीन सूक्तांतच त्याचा उल्लेख आहे हें कळून घेतलें! इत्यादि दुसऱ्या वैशिष्ठ्याचीं उदाहरणें आहेत.

घुलेशास्त्री यांचें संशोनात्मक कार्य 'एकमेवाद्वितियम्' आहे असें म्हणण्याचा मोह होतो! असें एक विधान केल्यास त्यांच्या संशोधनाच्या सर्व श्रेष्ठतेबद्दल जास्त लिहिण्याचें कारण उरत नाही!

## डॉ. तु. ज. केदार

मध्यप्रांतांत फौजदारी कायद्यातील सर्वश्रेष्ठ पक्षसमर्थक असा केदारांचा लौकिक होता. थोर पंडित, नाट्यशास्त्राचे अभिज्ञ व काव्याचे व्यासंगी अशी त्यांची सामान्य जनतेंत विशेष नामना नसली, तरी, वरील दृष्टीने विद्वानांच्या ते चांगले परिचयाचे होते. त्यांच्या विद्वतेचें मोजमाप त्यांनी नागपूर विद्यापीठाच्या कुलगुरुचें स्थान मंडित केलें होतें यावरून तर झालेंच; पण नागपूर विद्यापीठाने त्यांना डी. लिट्. ची पदवी दिली याहि घटनेने पूर्णपणे झालेलें आहे.

त्यांचा बुद्धि-संचार कायदा, संशोधन, व काव्य-नाट्य इ० विदग्ध वाङ्मयांतहि झालेला पाहून त्यांच्या चौफेर व्यासंगाबद्दल आदरमिश्रित कौतुक वाटल्यावाचून राहात नाही! त्यांच्या कायदेविषयक ज्ञानांतील कोटिक्रम व रामयज्ञता, त्यांच्या संशोधनाचें स्वरूप पद्धतशीर व तर्कशुद्ध

होण्यास बरीच पूरक झाली असेल, अशी कल्पना केल्यास ती चुकीची होणार नाही.

डॉ. केदार यांचा ऋग्वेदाचा चिकित्सापूर्ण अशा तऱ्हेचा अभ्यास होता. ऋग्वेदासंबंधी त्यांनी एक संशोधनपूर्ण ग्रंथ इंग्रजीमध्ये लिहिला आहे. त्यापैकी एक भाग 'The Vedasthan or the ancient home of the Indus Aryans' हा प्रकाशित झालेला आहे. यांतील विचारसरणी अनेक विद्वानांना बरीच नावीन्यपूर्ण वाटली व त्यांचा सर्व ग्रंथ प्रकाशित झाल्यास[1], वेदांतील प्रथम श्रेणीच्या पंडितांत त्यांना स्थान मिळेल, अशी केदार यांनी त्यांच्या मनांत अपेक्षा निर्माण केली होती.

महाराष्ट्र-नाट्यसंमेलनाचे (नागपूर अधिवेशन) केदार हे स्वागताध्यक्ष होते, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे नाट्यशास्त्रांतील त्यांच्या व्यासंगाची रसिकांनी दखल घेतली होती असें दिसतें !

कालिदास व त्याच्या काव्याबद्दल त्यांना कित्येक वर्षांपूर्वीपासूनच गोडी होती. कायदेपंडितासारखे लोक प्रायः काव्याच्या वाटेस जात नाहीत ! कालिदासासारख्या कवीचो जनतेंत नांवाने बरीच प्रसिद्धी असली तरी त्याच्या, काव्याचा आकंठ रस जाणिवेने लुटणारे काव्य-रसिक थोड्याच प्रमाणावर दिसतात ! कालिदासाची वैभवयुक्त प्रतिभासृष्टि (Rich Imagery) व त्याच्या काव्यांतील भव्य आशय उकलून दाखविणारें समालोचन व संशोधन पद्धतीचे ग्रंथ आपल्याकडे फारसे झाले नाहीत[2]. डॉ. केदार यांनी 'Kalidas, his date and birth place' हा प्रबंध लिहिलेला आहे. त्यांत त्यांची विद्वत्ता चांगलीच प्रकट झालेली आहे.' माळवा प्रांत ही कालिदासाची जन्मभूमी असून, कालिदास इ० स० पूर्वी पहिल्या शतकांत होऊन गेला,

१ याच ग्रंथाचा दुसरा भाग डॉ. केदार यांचे चिरंजीव, बॅरिस्टर केदार हे लवकरच प्रसिद्ध करीत आहे.

२ संस्कृत 'क्लासिक्स'चे प्राध्यापक प्रो. जी. सी. झाला यांनी कालिदासावर उत्कृष्ट ग्रंथ लिहिलेला आहे. त्यांत संशोधन विशेष नसलें तरी, समालोचन चांगल्यापैकी आहे.

असें त्यांत प्रतिपादन आहे. कविभूषण खापर्डे त्याचप्रमाणे डॉ. केदार यांच्या अध्यक्षतेखाली महाकवी भवभूति स्मारक समारंभ गोंदिया विदर्भ साहित्य संमलनाच्या अधिवेशनांत १९४८ सालीं साजरा करण्यांत आला होता.

डॉ. शं. दा. पेंडसे

'महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास' व 'ज्ञानेश्वराचें तत्वज्ञान' हे दोन उत्कृष्ट ग्रंथ लिहून, डॉ. पेंडसे यांनी मराठी वाङमयांत व संशोधनांत बरीच मोठी भर घातलेली आहे. ज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान हा प्रबंध त्यांनी डॉक्टरेट-करता लिहिला व त्यावरच त्यांना वरील पदवी मिळाली. महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास हा खराखुरा आर्यांच्या संस्कृतीचाच इतिहास आहे. डॉ. पेंडसे हे महाराष्ट्र—संस्कृतीचे अभिमानी असून, त्यांची संस्कृतिबद्दलची भक्ति त्यांच्या ग्रंथांतून व लेखांतून ठिकठिकाणीं प्रस्फुटित झालेली दिसते. संस्कृतीच्या महत्वाचें वर्णन माझ्या प्रस्तुत ग्रंथांतहि मी दीर्घपणें केलेलें आहेच! डॉ. पेंडसे यांचा वरील ग्रंथ ज्यावेळीं लिहला, त्यावेळीं व आजच्याहि परिस्थितींत स्फूर्तींचें जीवन देणारा झाला आहे यांत शंकाच नाही! वेदकाळांत वर्ण्यव्यवस्था होती किंवा नाही, ब्राम्हण काळांतील आर्यांची राष्ट्राभ्युदयाची आकांक्षा, बुद्ध धर्माच्या 'सर्व दुःखं' 'सर्व क्षणिकं' या दोन तत्वांचें समर्थन व 'एकांतिक अहिंसा' 'संन्यास' व 'सर्वशून्य' या मतांचा अधिक्षेप, रामायण महाभारत-कालीन संस्कृति, भगवद्गीता व स्मृतिकालाचें विवेचन, स्मृतिकाळांतील आर्य-संस्कृतीने गाठलेला प्रगतीचा उच्चांक व महाराष्ट्रांतील भिन्न भिन्न राजवटी इत्यादिचें मार्मिक विवरण या ग्रंथांत आलेलें आहे.

'आपल्या जीवनांतील संस्कृतीचें महत्व' वगैरे लेखांतहि संस्कृतीचा त्यांनी पुरस्कार केलेला आहे.

संस्कृतीविषयी जसें त्यांना प्रेम आहे, त्याचप्रमाणे गतइतिहासा-विषयीहि त्यांना आत्मीयता वाटते. शिवाजी रामदास यांच्यासारख्या राष्ट्र-पुरुषांविषयी त्यांच्या मनांत नितांत आदर वसत आहे. महाराष्ट्राच्या उज्वल गतवैभवाने त्यांचें मन भारल्या गेलें आहे. 'इतिहासाचा अभ्यास' (वागीश्वरी सप्टेंबर १९३३) 'समर्थ रामदास व त्यांचे तीन आक्षेपक'

( हे तीन लेख असून ग्रंथरूपाने प्रकाशित आहेत ) ' हिंदुस्थानांतील धार्मिक इतिहासाचें सामान्य निरीक्षण' (तीन भाषणें: आर. बी. परांजपे भाषण मालेंत गुंफलेलीं व नागपूर युनि०ने १९४७ सालीं प्रकाशित केलेलीं.) ' समर्थ रामदास आणि जोसेफ मॅझिनी ' ' शिवकालीन संस्कृति व धर्म ' या निरनिराळया लेखांत व्यक्त झालेले त्यांचे विचार वरील विधानाचा पाठपुरावा करतील.

संतवाङ्मयाचे मुरब्बी

संतवाङ्मयाचे–विशेषतः ज्ञानेश्वराचे ते एक गाढ अभ्यासक आहेत. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास यांच्या तत्वज्ञानांत मुरलेले विद्वान आहेत. ' ज्ञानेश्वराचें तत्वज्ञानाबरोबरच त्यांनी ' ज्ञानेश्वर आणि दासबोध ' (ज्ञानेश्वरीचा व दासबोधाचा तुलनात्मक अभ्यास; प्रकाशन रामदास आणि रामदासी धुळे १९४२ ) ' ज्ञानेश्वराचा तोतया ' ( महाराष्ट साहित्य पत्रिका जुलै १९४३ ) ' सत्य संशोधन की सत्यापलाप ' ( ज्ञानेश्वराच्या तत्ववाङ्मयाच्या एका टीकाकारास उत्तर–सह्याद्रि फेब्रुवारी १९४६ ) ' ज्ञानेश्वर आणि हिंसा अहिंसा ' (मातृभूमी आकोला; खास अंक १९४७) " मराठीचे दोन समकालीन महाकवी ज्ञानेश्वर आणि नरेंद्र " (बडोद्याला दिलेलें भाषण. व बडोदा येथील प्राच्यविद्यामंदिराने १९४७–४८ सालीं प्रकाशित केलेलें. वरील तेराव्या शतकांतील दोन समकालीन श्रेष्ठ कवींचा तुलनात्मक अभ्यास) ' ज्ञानेश्वराचें पुरोगामित्व ' ' ध्येयवादी तुकारामबुवा ' (युगवाणी एप्रील १९५०) इत्यादि लेखांवरून वरील म्हणणें सहज सिध्द होणारें आहे.

याशिवाय त्यांचे ' आमचे भाषाविषयक औदासिन्य, ' ' अनुस्वाराची कैफियत ' ' मराठी शुध्दलेखनाचा फेरविचार ' इत्यादि निबंधावरून व आकोल्याच्या विदर्भ साहित्य संमेलनाच्या निमित्ताने, महाराष्ट्राच्या पूर्वेला लागून असलेल्या बोली भाषांचा विशेष अभ्यास झाला पाहिजे इत्यादि ज्या त्यांनी महत्वाच्या सूचना केल्या यावरून त्यांचें भाषाविषयक सूक्ष्म ज्ञान व आस्था ही दोन्ही व्यक्त झाल्याशिवाय राहात नाही.

डॉ. पेंडसे हे वेदांततीर्थ, शास्त्री, (पंजाब युनिव्हर्सिटी) एम्. ए., पी. एच् डी., एम्. ओ. एल्. (Master of Oriental Languages) इत्यादि उच्च पदव्यांनी विभूषित असून, वरील विषयांचे अखंड व्यासंग केलेले असल्यामुळे त्यांचे त्या वरील प्रकट झालेले विचार मननीय असल्यास नवल नाही.

डॉ. पेंडसे यांच्या वृत्तींत तेजस्विता व लेखनांत—वक्तृत्वांत आवेश भरलेला असतो. त्यांचें भाषण ऐकत असतां कोणत्या तरी ज्वलंत भावनेने आपण प्रभावित होत आहोंत असें वाटतें! 'विराट पर्वांतील द्रौपदीचा भूमिका' हा त्यांच्या तेजस्वितेचा व लेखन कौशल्याचा नमुना म्हणून उधृत करण्यासारखा आहे. या लेखांत, त्यांनी द्रौपदीच्या विश्वविमोहक सौंदर्याचें, व्यासांनी महाभारताच्या विराटपर्वांत निर्भयपणे व निःसंकोचपणे वर्णन कां केलें (हें वर्णन मोरोपंताने व आरंभाचे मुक्तश्वरानेहि टाळलें आहे) याचें समर्थन करून, 'राष्ट्रांतील पुरुष जेव्हा पौरुषहीन होऊन नाचगाण्यांत दंग होतात, तेव्हा कीचकासारखे सैनिक व सेनापती राष्ट्रांतील स्त्रियांची अप्रतिष्ठा करतात' हें तत्व व्यासांना कसें सांगावयाचें आहे, व अग्निज्वालेप्रमाणे तेजस्वि द्रौपदी भारतीय स्त्रीचा प्रतिनिधि व प्रातिक कशी ठरते याचें सुंदर विवरण केलें आहे.

डॉ. पेंडसे याच्या लेखनामधून कधी कधी लढाऊ वृत्ति प्रतीत होते. आपण केलेल्या विधानाबाबतींत जागृत असणें व त्यांत कोणी चूक काढण्याचा प्रयत्न केल्यास त्याबाबत पूर्वपक्ष उत्तरपक्ष करणें या गोष्टीस ते साधारणतः तयार असतात. पाङ्गुरंगशर्मा यांनी सह्याद्रींत, अथवा प्रियोळकर यांनी 'योगवासिष्ठ ज्ञानेश्वराचा' या संबंधी जो लेख लिहिला त्याबाबतींत झालेल्या उत्तर प्रत्युत्तरावरून हे दिसून येण्यासारखे आहे. त्यांनी जवळ जवळ सत्तर पर्यंत निरनिराळ्या विषयांवर लेख लिहिले आहे.

नागपूर विद्यापीठाच्या मराठी बोर्डाचे अनेक वर्षे अध्यक्ष, मं. सं. मंडळाच्या कार्यकारी मंडळांतलि सभासद, म. सा. परिषदेच्या नागपूर शाखेचे अध्यक्ष, आणि विशेषतः विदर्भ साहित्य संघाचे १९५२ सालचे अध्यक्ष या अनेक नात्यांनी डॉ. पेंडसे हे विदर्भास सुपरिचित आहेत.

श्री. ना. बनहट्टी

मध्यप्रांतांत, प्राचीन इतिहासांत, भारतीय तत्वज्ञानांत, तर कुणी महानुभावीय वाङ्मयांत पारंगत असलेले विद्वान आहेत. पण प्रा. बनहट्टींचें साहित्याच्या बहुतेक शाखांत वरच्या दर्जाचें कर्तृत्व दिसून येतें. शास्त्रादि रूक्ष विषयांच्या अभ्यासाबरोबरच नाट्यासारख्या ललितकलांतहि ते अवगाहन करतात. त्याचें संशोधनविषयक लिखाण थोडें असून समालोचनात्मक विपुल आहे. त्याचें विषयांचे प्रतिपादन अनेक नावीन्यपूर्ण मुद्यांनी व विशेषतः त्याच्यांतील संयमित पण सुबक लेखनशैलींनी नटलेलें असतें. भाषेंतील समर्पक, अर्थगर्भ व सौंदर्ययुक्त शब्दांचा त्यांच्या लेखनांत, ठिकठिकाणीं आढळ होतो.

त्यांचे 'ज्ञानेश्वरीदर्शन' या ग्रंथांतील 'ज्ञानेश्वरीचा अभ्यास' आणि 'भावार्थ दीपिका' व 'यथार्थ दीपिका' हे प्रसिद्ध लेख, व रेकॉर्डस कमिशन, भारत इतिहास परिषद, प्राच्य विद्यापरिषद् आणि मध्यप्रांत संशोधन मंडळ इत्यादिकांतून वेळोवेळीं वाचलेले शोधनिबंध त्यांच्या संशोधनकर्तृत्वाची साक्ष देण्यास पुरेसे आहेत. भोसल्यांच्या दरबारीं असलेल्या इंग्रज रेसिडेंटाच्या पत्रव्यवहाराबाबत त्यांनी कित्येक शोधनिबंध लिहिलेले आहेत. त्यांचें 'मयूर काव्यविवेचन' 'ज्ञानोपासना व भारतीयांचे कर्तव्य' 'एकावली' (विख्यात साहित्यिकांचीं व्यक्तिचित्रें) 'विष्णुपदी' (विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे लेख) इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

१९३५ सालच्या इंदूर साहित्य संमेलन प्रसंगीं, साहित्यशाखेच्या अध्यक्षपदावरून त्यांनी जे भाषण केलें, तें त्यांच्या फुटकळ लेखनांत सर्वोत्कृष्ट ठरेल असें आहे. त्याचप्रमाणे विदर्भ साहित्य संघाच्या दर्यापूरच्या ९ व्या अधिवेशनांत, अध्यक्षपदावरून त्यांनी जें भाषण केलें, तेंहि अत्यंत उत्कृष्ट असें होतें.

भाषाशास्त्राचे ते तज्ञ असून, त्यांचा बंगाली भाषेचा अभ्यास व गुजराथी भाषेशींहि परिचय आहे व म्हणूनच भारतीय राज्यघटनेच्या मराठी विभागाचे भाषांतरकार म्हणून व मध्यप्रदेश सरकारच्या पारिभाषिक विभागाचे पदाधिकारी, हीं स्थानें त्यांनी भषविलेलीं आहेत. मुंबई, नागपूर, आग्रा, बनारस

इत्यादि विद्यापीठांत त्यांनी सर्वात उच्च अशा पी एच्. डी. च्या परीक्षांपर्यंत परीक्षक या नात्याने काम केलेलें आहे.

संस्थास्थापक

बनहट्टी यांची साहित्यांतील कामगिरी तर उच्च दर्जाची आहेच पण त्यांनी निरनिराळ्या वाङ्मयविषयक संस्था काढून जी समाज व राष्ट्रसेवा केलेली आहे, ती कदाचित् जास्त मोलाची ठरेल!

त्यांनी आतापर्यंत निरनिराळ्या प्रकारच्या संस्था अस्तित्वांत आणून त्या यशस्वी तऱ्हेने चालवून दाखविलेल्या आहेत. व इतर कितीतरी संस्थांशीं त्याचा संबंध आलेला आहे.

१९३९ मध्ये स्थापन झालेल्या महाराष्ट्र नाट्यसंमेलनाचे बनहट्टी हे कार्याध्यक्ष होते. नागपूर येथील अभिनव नाट्यमंडळाचे ते १९३४ ते १९४४ पर्यंत अध्यक्ष होते. हीच संस्था पुढे 'अॅकेडेमी ऑफ ड्रॅमॅटिक आर्ट' नामक व्यापक संस्थेंत सामील करण्यांत आली. याहि संस्थेचे बनहट्टीच मुख्य कार्यवाह होते. कांही वर्षे ते विहंगमचे संपादकहि होते. महाराष्ट्र रंगभूमीचा शतसांवत्सरिक उत्सव १९४३ मध्ये साजरा करण्याच्या कल्पनेचे प्रवर्तक व ती अमलांत आणण्याचा प्रयत्न करणारे योजक बनहट्टीच होत. महाराष्ट्रांत सर्वत्र रंगभूमीचा शतसांवत्सरिक उत्सव साजरा व्हावा, यासाठी त्यांनी अविश्रांत परिश्रम केले. 'महाराष्ट्र रंगभूमीचा सांगोपांग व सोपपत्तिक इतिहास' व 'महाराष्ट्र नाट्यकोश' या ग्रंथांचें काम त्यांच्याच प्रयत्नाने चालू झालें होतें.

विदर्भ साहित्य संघाचे १९३७ पासून ते बरीच वर्षे उपाध्यक्ष होते. मध्यतरी संघाचें कार्य स्थगित होऊन तो नामशेष होण्याच्या बेतांत असतांना, १९४४ सालीं बनहट्टींनी ना. कृ. दिवाणजी वगैरेच्या सहाय्याने त्याची पुनर्घटना केली; व १९४५ मध्ये आकोट येथे संघाचें अधिवेशन भरवून त्याचें पुनरुज्जीवन केलें. संघाचें मासिक युगवाणी काढण्याचीहि कल्पना त्यांचीच असून, तिला मूर्त स्वरूप देण्याचें श्रेयहि त्यांच्याकडेच आहे.

त्यांनी काढलेल्या नवभारत ग्रंथमालेंतून आतापर्यंत २०-२२ च्यावर ग्रंथ प्रकाशित झालेले असून, तिची कामगिरी इतकी भरीव आहे की 'महाराष्ट्राची ज्ञानगंगा' हें नांव तिला शोभून दिसेल. त्यांत ना. गो. चापेकर, श्री. न. चिं केळकर प्रो. गजेंद्रगडकर इत्यादि विद्वानांचे ग्रंथ प्रकाशित झालेले आहेत. प्रा० ग. ह. केळकर यांचा 'शेक्सपिअर व तत्कालीन रंगभूमी,' विठ्ठल रामजी शिंदे यांचा 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' डॉ. केतकर यांचा 'भारतीय समाजशास्त्र' श्री. ल. आजरेकर यांचा 'वनस्पती जीवन' इत्यादि अनेक विविध विषयांवर उद्बोधक व मनोरंजक ग्रंथ आजपर्यंत या मालेने प्रकाशित केलेले आहेत. काकासाहेब कालेलकरांसारख्यांनीहि त्यांचा विद्वत्ती व समाजसेवा याविषयी प्रशंसोद्गार काढले आहेत.

## वा. ना. देशपांडे

श्री. वा. ना. देशपांडे यांच्या संशोधनासंबंधीचे कांही उल्लेख पृष्ठ ४० व ४३ वर आलेलेच आहेत. त्यांत त्यांच्या संशोधनाचे विशेष दर्शविलेले आहेत. आदर्श संशोधनाचे नमुने म्हणून श्री. वा. ना. देशपांडे त्यांच्या ग्रंथांकडे व बऱ्याचशा लेखांकडे अंगुलिनिर्देश करतां येईल. शास्त्रीय दृष्टि, प्रसंगोपात्त कल्पकता इ. त्यांच्या संशोधनांत दिसून येतात. विदर्भांतील प्रमुख महानुभाव संशोधकांपैकी ते एक आहेत. महानुभाव–वाङ्मय–संशोधना-संबंधी त्यांनी 'आद्य मराठी कवयित्री' (वि. वि. १९२७) 'महदंबेचे धवळे' (किर्त्ता १९२७–२८) 'महानुभावियांचा वेद'–दोन लेख (किर्त्ता नोव्हे. डिसें. १९२७) 'शिशुपालवधकर्ता भास्करभट्ट कवीश्वराचार्य' (किर्त्ता आक्टो १९२९) 'एक अपूर्व प्राचीन गद्य ग्रंथ' (विश्ववाणी डिसें. १९३३) 'महाराष्ट्र काव्यदीपिका' (विश्ववाणी जून १९३५) 'वृद्धाचार' (म. सा. प.) 'स्मृतिस्थळचर्चा' (लेखक. म. म. प्रा. द. वा. पोतदार व वा. ना. देशपांडे; 'समाजसेवक' खामगाव १९३९. स्वतंत्र पुस्तिका,) इ. लेख लिहिलेले आहेत.

या शिवाय प्रासंगिक लेख लिहिले त्यांतील कांही असे-'महानुभावीय मराठी वाङ्मय–परीक्षण' (लोकमत–यवतमाळ 'ऋद्धिपूरवर्णन–परीक्षण'

(वि. वि. एप्रिल १९२९) 'आद्यमराठी कवयित्री' (महाराष्ट्र ८-९-३५) 'आद्य कवयित्री महदाइसाच!' (केसरी ११-१२-३६) 'स्मृतिस्थळाचा कर्ता कोण?' (महाराष्ट्र १८-९-३८) वगैरे.

या लेखांतील 'महानुभावियांचा वेद' या लेखांत सूत्रपाठाच्या आधारें भारतीय तत्वज्ञानाच्या पार्श्वभूमीवर, महानुभाव तत्वज्ञानाचा आढावा प्रथमच घेण्यांत आलेला आहे. 'महाराष्ट्र काव्यदीपिका' या लेखांत त्याच मथळ्याचें लक्षधीर कवीचे शके १५४४ पूर्वीचें ओवीबद्ध प्रकरण प्रसिद्ध केलें आहे. या प्रकरणांत ओवी छंदाचें विवरण आलें आहें, हें त्याचें वैशिष्ट्य होय. 'स्मृतिस्थळ-चर्चा' या पुस्तिकेंत प्रथम म. म. दत्तोपंत पोतदार यांचा 'स्मृतिस्थळ' ग्रंथावरील विस्तृत अभिप्राय छापून, त्यांतील विवाद्य मुद्यांबद्दल वा. ना. देशपांडे यांनी खुलासा केलेला आहे.

प्रासंगिक लेखांतहि अवश्य तेथे संशोधन केलेलें दृष्टोत्पत्तीस येतें. उदाहरणार्थ 'ऋद्धिपुर वर्णन-परीक्षणां'त महानुभावीय टीपकार 'दत्त मराठे' यांच्या टीप ग्रंथावरून नवीन माहिती दिलेली आहे.

महानुभाव वा. सं. ग्रंथ

'आद्य मराठी कवयित्री' या ग्रंथांत पहिली मराठी कवयित्री महदाइसा हिचें ज्ञानेश्वरा पूर्वीचे 'धवळे' काव्य व 'मातृकी रुक्मिणी स्वयंवर' हेंहि तिचें दुसरें काव्य-संपादिलें आहे 'स्मृतिस्थळ' हा चौदाव्या शतकांतील प्राचीन मराठी गद्यग्रंथ होय. दोन्ही ग्रंथ शास्त्रीयरीत्या संपादिले असून पाठभेद, शब्दकोश, प्रस्तावना वगैरे सोपस्कारांसह प्रकाशित केलेले आहेत. 'स्मृतिस्थळांत' तर परिशिष्टें देऊन 'स्मृतिसमुच्चय' व 'अज्ञान स्मृति' यांतीलहि जास्तीची माहिती नमूद केली आहे. आणि अशा रीतीने या एकाच ग्रंथांत तीन ग्रंथ आल्यासारखें झालें आहे! 'स्मृतिस्थळा'वरून यादवकालीन राजकीय, सामाजिक व धार्मिक परिस्थितीवर नवीन प्रकाश पडतो आणि या दृष्टीने हा ग्रंथ लीलाचरित्राच्या तोडीचा ठरतो, इतकें म्हटलें म्हणजे पुरे. हे दोन्ही ग्रंथ निरनिराळ्या विद्यापीठांत अभ्यासल्या गेले आहेत.

## इतर संशोधन

'वऱ्हाडी लोकभाषा' (वि. वि. मार्च १९२७) 'नानासाहेब पेशव्यांचें दुसरें लग्न' ('विहंगम, मार्च १९३७) 'नागपूरकर भोसल्याची 'सेनाधुरंधर' पदवी' (अप्रसिद्ध; सारांश महाराष्ट्र २१-४-४०) पहिल्या लेखांत वऱ्हाडांतील मराठी बोलीचें भाषाशास्त्राच्या आधारें निर्वचन करण्यांत आलेलें आहे. वऱ्हाडी बोलींत प्राचीन मराठीचें रूपडें दिसतें, हें यांत सिद्ध केलेलें आहे.

दुसऱ्या लेखांत अप्रसिद्ध देवकाते घराण्याच्या कागदपत्रांवरून त्या घराण्याची माहिती प्रथमच देण्यांत आलेली आहे. तसेच रियासतकार सरदेसाई म्हणतात, तद्वत्, नानासाहेब पेशव्यांचें दुसरें लग्न २७ डिसें. १७६० रोजीं न होतां २८ डिसें. १७६० रोजीं झालें. व ते पैठणास न होतां राक्षस भुवनास झालें, हें सिद्ध केलें आहे.

तिसऱ्या लेखांत 'सेना धुरंधर' पदवी नानासाहेब भोसल्याने मुधोजी भोसल्यास नव्याने—वा पहिल्यानें—दिली, हे कै० या. मा. काळे यांचें विधान खोडले असून, ही पदवी कान्होजी भोसले याला शाहूने ता. २५-५-१७२७ च्या व इतरहि अप्रसिद्ध पत्रांत लावल्याचें दर्शविलें आहे.

## संशोधनाचीं वैशिष्ट्यें

त्या त्या वेळीं उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून शक्य तो कांटेकोर विधानें करण्यांत आलेलीं आहेत. क्वचित खळबळ उडविणारी माहितीहि देण्यांत आलेली आहे. उ० चक्रधराला रामदेव यादवाने देवगिरीस ठार केलें, असें 'लीलाचरित्रा'च्या एका अप्रसिद्ध पाठावरून सांगितलें आहे. (स्मृतिस्थळ प्र० पान २२) नेने-संपादित 'लीलाचरित्रां'त ही माहिती नाही. डॉ. शं. दा. पेंडसे यांच्यासारखे विद्वानहि चक्रधर बदरिकाश्रमाकडे अखेरीस गेला या जुन्या माहितीस अजून चिकटून बसतात. (संताचा संदेह स्वर्गवास 'युगवाणी' दिवाळी-अंक १९५२) हें लक्षांत घेतलें म्हणजे या माहितीचें महत्व पटेल. प्रसंगोपात्त कल्पकताहि प्रगट केली आहे. उ. 'वऱ्हाडी लोकभाषा' लेखांत वऱ्हाडांत चंद्राला 'चांदोमामा' कां म्हणतात, याची उपपत्ती

दिली आहे. वऱ्हाडांत स्त्रियांना 'लक्ष्मी' म्हणतात व लक्ष्मी व चंद्र ही बहीण-भाऊ होत, म्हणून चंद्राला 'चांदोमामा' म्हणतात अशी ही उपपत्ति आहे ! 'आद्य मराठी कवयित्री' मध्ये संहितेंत निरनिराळे कंस वापरले आहेत, हा कल्पकतेचाच भाग होय. 'धवळया'ची कोणतीहि पोथी स्वयंपूर्ण नव्हती व अनेक पोथ्यावरून पाठ तयार करावा लागला. कोणता पाठ कोणत्या पोथींतील आहे, हें स्पष्ट होण्यासाठी विविध कंसाचा उपयोग केला आहे.

वा. ना. देशपांडे यांच्या स्वतःच्या संशोधनाविषयी !

'युगवाणी'च्या जून १९४७ च्या अंकांत वा. ना. देशपांडे यांनी 'महानुभाव-वाङ्मयाचें संशोधन' हा महत्वाचा लेख छापला असून त्यावरून त्यांच्या स्वतःच्या संशोधनावर प्रकाश पडतो, तो असाः— १ कै. राजवाडे व वि. ल. भावे याच्यां लिखाणावरून ते महानुभाव-वाङ्मय-संशोधनाकडे वळले. २ या कामीं त्यांना कोणाचें सहाय्य झालें असेल, तर तें महानुभावीय मंडळीचें झालें. (त्यांत माहूरकर माजी महंत, दत्तराज महानुभाव, हर्लीचे महंत बाळकृष्ण शास्त्री महानुभाव व रितपूरकर महंत गोपिनाथ महानुभाव हे प्रमुख होत. पोथ्या पुरविणें, चर्चा करणें इ. त्यांची मदत झाली) ३ विस्तारांतील 'आ. म. कवयित्री' लेख (पुस्तक नव्हे !) त्यांतीलच 'महदंबेचें धवळे' (पुस्तकांतील पाठ नव्हे !) व 'शिशुपालवधकर्ता भास्करभट्ट बोरीकर' हा, त्यांतलाच लेख त्यांनी दत्तराज महंतांच्या टिपणावरून लिहिला होता. तसें त्यांनी त्या लेखांत नमूदहि केलें आहे. पुढे महंतमजकूर नकल करतांना फरक करतात हें वा. ना. देशपांडे यांनाच प्रथम उमगलें ! म्हणून पहिल्या दोन लेखांत झालेली 'गफलत' भरून काढण्यासाठी त्यांनी अस्सल पोथ्यांवरून 'आद्य मराठी कवयित्री' पुस्तक तयार करून छापलें !

भास्करभट्टावरील लेखांतील 'गफलती' बद्दल ते डॉ. कोलते याजपाशीं बोलले होते. व त्यावरून त्या लेखांतील प्रक्षेपजनक चुका त्यांनी 'भास्कर भट्ट बोरीकर' पुस्तकांत दाखविल्या ! पण ही गोष्ट वा. ना. देशपांडे याजकडूनच आपणास कळली, हें त्यांत कोलत्यांनी (कदाचित् नजर चुकीने) नमूद केलें नाही ! यामुळे त्यांचें पुस्तक वाचून देशपांड्यानां स्वतःला आपली

चूक उमगली नाही असा ग्रह होतो तो अवास्तव आहे! 'शिशुपालवधा 'दि-कांतील शकमित्यांतील प्रक्षेप वा हस्तक्षेप डॉ. कोलते यांस प्रथम उमगले.

वा. ना. देशपांडे यांचे इतर संशोधनपर लेख व 'आद्य मराठी कवयित्री' व 'स्मृतिस्थळ' हीं पुस्तकें अस्सल साधनें स्वतः पाहूनच तयार केलीं आहेत, हा मुख्य मुद्दा विसरतां कामा नये.

देशपांडे यांच्याजवळ कांही महानुभावीय ग्रंथ आहेत व इतिहासाचेंहि त्यांचे अध्ययन अद्ययावत् आहे. पण ग्रंथप्रकाशनाची सोय नसल्यामुळे त्यांनी संशोधन कार्याची तूर्त तरी रजा घेतलेली दिसते! श्री. वा. ना. देशपांडे यांनी युगवाणीच ३-४-५ वर्षे संपादन करून, त्या मासिकाला श्रेष्ठ दर्जा मिळवून दिला आहे.

## डॉ. वि. भि. कोलते

महानुभाव वाङ्मयाचे चिकित्सक अभ्यासक म्हणून डॉ. कोलते यांचें नांव सर्व महाराष्ट्रास विश्रुत आहे. त्यांच्या बहुतेक संशोधनामध्ये संशोधकास लागणारा कष्टाळूपणा, निराग्रही बुद्धि, आधुनिक पद्धतीची मांडणी व व्यवस्थितपणा इत्यादि गुण प्रकट झाले आहेत.

महानुभाव तत्वज्ञान या पाचशें पानाच्या विस्तृत ग्रंथावर नागपूर विद्यापीठाने त्यांना पी एच्. डी. ची पदवी बहाल केली. महानुभावीय तत्व-ज्ञानावरील अनेक अप्रकाशित ग्रंथ अभ्यासून त्यांनी हा ग्रंथ लिहिलेला असल्या-मुळे महानुभावांचें तत्वज्ञान यथार्थपणे समजूत घेण्याची चांगली सोय झालेली आहे. वरील ग्रंथास सरस्वतीबाई देशमूख पारितोषकहि मिळालेलें आहे.

नरेंद्राचें 'रुक्मिणि—स्वयंवर' हा ओवीबद्ध ग्रंथ, व भास्करभट्टाची 'उद्धवगीता' हीं दोन काव्यें व श्रीगोविंद प्रभु चरित्र' हा गद्य ग्रंथ याचेंहि त्यांनी विस्तृत प्रस्तावनेसहित संपादन केलेलें आहे. वरील दोन्हीहि ग्रंथ तेराव्या शतकांतील आहेत 'भास्करभट्ट बोरीकर' हाहि त्यांचा एक विवेचना-त्मक ग्रंथ आहे.

'महानुभाव तत्वज्ञान' या ग्रंथानंतर लवकरच डॉ. कोलते यांनी 'महानुभावाचा आचारधर्म' हा चारशे पानांचा ग्रंथ प्रकाशित करून महानुभाव वाङ्मयांत बराच मोठी भर घातलेली आहे. या ग्रंथाला अधिकृत

अप्रकाशित ग्रंथांतील तळटीपा वगैरे विस्तृत विषयानुक्रमाणिका इत्यादि दिल्यामुळे ग्रंथाचें महत्व वाढलेलें आहे. महानुभाव पंथाविषयीं जे नाना प्रकारचे गैरसमज पसरले होते, यापैकी काहींचा उल्लेख म इया प्रस्तुत ग्रंथांत पानें ४९ इ. वर आलेला आहे) ते दूर होण्यास या ग्रंथाचा चांगला उपयोग झालेला आहे. व अजून येवढ्याच आकाराचा विमर्प हा त्यांचा संकल्पित ग्रंथ आहे.

याशिवाय डॉ. कोलते यांनी 'स्थान पोथी'चे चिकित्सक व मार्मिक प्रस्तावनेसहीत प्रकाशन करून, प्राचीन मराठीचें भूगोलविषयक दालन समृद्ध केलेलें आहे. श्री. ह. ना. नेने यांनी आपल्या एक अभिप्रायवजा लेखांत[1] खुद्द स्थानपोथीचें व डॉ. कोलते यांच्यावरील ग्रंथाचें महत्व वर्णन केलेलें आहे. मध्यप्रांत संशोधन मंडळाच्या वार्षिकदिनप्रसंगीं 'स्थानपोथी' मधील 'रामटेक विषयक अवतरण' व 'स्थान पोथा' विषयी माहिती करून देणारें लहानसे टिपण श्री. ह. ना. नेने यांनी वाचलें होतें. (स्थान पोथी-भोगरामाचीं स्थानें) याप्रसंगीं म. म मिराशी यांनी रामटेक येथील रामदेव-राय यादवाच्या काळचा शिलालेख हा निबंध वाचला होता. वरील कोरीव लेखांत उल्लेखिलेली कांही तीर्थें व देवालयें सांप्रत काळीं नष्ट झालीं असलीं तरी, त्यांचा उल्लेख महानुभावी यांच्या स्थानपोथींत सांपडतो. हे श्री. नेने यांनी दाखविले. दुसऱ्या एका वार्षिकोत्सवांत (म. स. मं च्या) 'लोणारचीं स्थानें' यावर श्री. नेने यांनी निबंध वाचला होता. (स्थानपोथा, अजळापूर ते लोणार पानें ८–१२ ) त्याच प्रमाणे श्री. यशवंतराव गुप्ते यांनी कांही स्थानासंबंधी टाचणें वगैरे भा. इ. स. मंडळाला सादर केलीं होतीं. त्यावर वरील स्थाना-संबंधी 'स्थानपोथी' मध्ये असलेला एक उतारा आणि 'लीळाचरित्रांत' असणारें प्रसंग यांचें एक टाचण करून, श्री. गुप्ते यांचें विवेचन श्री. नेने यांनी पूर्ण केलें होतें. म. म. मिराशी यांनी एका यादवकालीन ताम्रपटा संबंधी वगैरे वाचलेल्या निबंधांत उल्लेखिलेलीं गावें लीलांचरित्र व स्थान पोथी यांत सापडलीं.

डॉ. कोलते यांनी महानुभावासंबंधी 'श्री चक्रधरस्वामींचें शिक्षण व संस्कार' ( श्री. चक्रधर मासिक १९५१ ) 'श्री. चक्रधरस्वामी व ज्ञानदेव'

[1] 'स्थान पोथी' 'युगवाणी' डिसेंबर १९५१ लेखकः–ह. ना. नेने.

(महानुभाव १९५०) 'चक्रधराचें ग्रंथकर्तृत्व' (युगवाणी आक्टोबर १९५१) 'श्री. चक्रधरस्वामींचा पहिला शिष्य–रामदेव विद्यावंत उर्फ दादोस' (श्री चक्रधर मासिक, एप्रिल १९५१) इत्यादि अनेक लेख लिहिलेले आहेत. त्यांचा महानुभाव वाङ्मयावरील परिश्रमपूर्वक विस्तृत प्रपंच लक्षांत घेतां, त्यांच्या त्या वाङ्मयावरील अधिकाराबद्दल संशय उरत नाही.

डॉ. कोलते यांचे 'भास्करभट्ट बोरीकरकृत 'शिशुपालवध' या काव्याचा कालनिर्णय' 'रघुनाथपंडितांचा कालनिर्णय,' ('नलदमयंतीस्वयंवर' कर्ते रघुनाथपंडित हे मोरोपंतांच्या नंतरचे आहेत हे दाखविणारा फुलोर मधील लेख) 'राजनीति आमात्यांची कशी?' ('आज्ञापत्र' हे रामचंद्रपंत अमात्याचे नसून नीळकंठ मोरेश्वर पिंगळे यांचे आहे असें दाखविणारा लेख. प्रकाशन, सरदेसाई स्मारक ग्रंथ) इत्यादि लेख व चर्चा त्यांच्या संशोधन कुशलबुद्धीची साक्ष देणारे आहेत. त्याचप्रमाणे 'कालिदासाच्या यशाचें रहस्य' (विहंगम) 'संत नामदेव' (युगवाणी सप्टेंबर १९५०) 'तत्रापिच चतुर्थोऽङ्कः' (युगवाणी, जानेवारी १९५०) इ. लेख त्यांच्या रसिक बुद्धीचें द्योतक आहेत. 'सोडचिठ्ठी' या नाटिकेंत त्यांची विनोद बुद्धि दिसून येते, तर 'लव्हाळी' या काव्यग्रंथांत ते कविरूपाने दृष्टीस पडतात! वऱ्हाडी बोलीला विद्वानांकडून कांही अंशी तरी मान्यता मिळावी म्हणून 'मीने तूने' सारखे प्रयोग करण्यांत, निरर्थक अनुस्वारांना गचांडी देण्याच्या प्रयत्नांत, किंवा मराठी भाषेविषयी योग्य अभिमान बाळगण्यांत, डॉ. कोलते यांनी कांही वेळी धडाडीहि दाखविली असून, याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

विदर्भ साहित्य संघाच्या ११ व्या वार्षिक संमेलनाच्या अध्यक्षपदावरून (गोंदिया १९४८) डॉ. कोलते यांनी केलेलें भाषण अनेक दृष्टींनी मननीय झालेलें होतें. त्यांत त्यांची स्वभाषेबद्दलची कळकळ, स्पष्टवक्तेपणा इत्यादि विशेष व्यक्त झालेले आहेत, व कांही नवीन मार्गदर्शनहि दिसून येतें.

त्यांत त्यांनी दोन मुद्यांवर विशेष भर दिला. मराठी मध्यप्रांत व महाकोशल यांच्या सरहद्दीवर मराठीची गळचेपी होत आहे. हिंदी ही राष्ट्रभाषा असून त्या दृष्टीने ती आपणा सर्वांस पूज्य आहे. पण याचा अर्थ असा नव्हे

की हिंदीने प्रांत भाषांवर वर्चस्व गाजवावें. दुसरा मुद्दा संयुक्त महाराष्ट्राचा. संयुक्त महाराष्ट्राला थोर महाराष्ट्रीय विचारवंतांनी पाठिंबा दिलेला आहे. हिंदीसंघाची एकता अभंग राहून, संघराज्याचें सामर्थ्य वृद्धिंगत होईल अशाच धोरणाने भाषावार प्रांतरचना तिच्या पुरस्कर्त्यांना हवी आहे, अशा तऱ्हेचे विचार त्यांनी पुढे मांडले. विशेषतः हिंदच्या शासनसंस्थेंत मराठी बोलणाऱ्या सर्व जनतेच्या अस्तित्वांत येईल त्या एकच प्रांताला 'संयुक्त महाराष्ट्र' हें नांव न देतां 'महाराष्ट्र' येवढेच नांव देणें सयुक्तिक होईल. या नवीन प्रांताला जर 'संयुक्त महाराष्ट्र' म्हणून आपण संबोधूं लागलों तर, त्याचेहि अनेक घटक आहेत, अशी कल्पना आपल्या मनांत नेहमी राहील व महाराष्ट्राच्या एकरूपतेच्या दृष्टीने तें अनिष्ट आहे, हा त्यांचा या आशयाचा मुद्दा साधारणतः कोणासहि पटण्यासारखा आहे. त्याचप्रमाणे मराठी भाषेचें संरक्षण करून तिला वैभवसंपन्न करण्याकरता, सर्व महाराष्ट्रियांनी झटलें पाहिजे व हा 'पुणेकर' हा 'वऱ्हाडी' असें मानण्याचा क्षुद्रपणा आपण सोडला पाहिजे, अशा प्रकारचें त्यांनी जें विधान केलें तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. व याकरता त्यांनी पुण्याकडील साहित्यिकांची सडकून हजेरीहि घेतली होती ! 'साहित्याची भाषा बहुजनसमाजाच्या भाषेला जितकी अधिक जुळती असेल, तितकी ती मराठी साहित्याचा आणि बहुजन समाजाचा परस्पर सन्निकर्ष वाढविण्याला अधिक उपयुक्त होईल, हें त्यांचें विधानहि चिंतनीय आहे व त्याप्रमाणे वऱ्हाडी शब्द व वाग्प्रचार यांचें पुनरुज्जीवन करणें इष्ट आहे.

डॉ. कोलते यांना १९४८ च्या विदर्भ साहित्य संघाच्या अध्यक्षपदाचाहि मान मिळालेला होता. विदर्भाच्या तरुण संशोधकांच्या श्रेणींत डॉ. कोलते यांचें स्थान वरच्या दर्जाचें आहे यांत दुमत होण्याचें कारण नाही.

प्रि ह. ना. नेने (पृष्ठ १९७ पॅरा २ पाहा) यांनी महानुभावीयांचा 'लीळाचरित्र' हा ग्रंथ प्रकाशित करून, महानुभाव वाङ्मयांत आपलें नांव संस्मरणीय करून ठेवलेलें आहे. हा एकच ग्रंथ त्यांनी प्रकाशित केला असता तरी श्रेष्ठ संशोधक म्हणून त्यांचें नांव कायमचें राहिलें असतें. त्यांचें बरेचसें संशोधन महानुभावविषयकच आहे. 'मंग्रूळपीर की मंगळपूर' 'नाशिक गोवर्धनाचा जैतमाळ पाटील' 'ज्ञानेश्वरींतील एका ओवीविषयी प्राचीन

मराठीच्या दृष्टीने अधिक अर्थप्रकाश ' (यांत श्री. नेने यांनी 'कातले' शब्दाचा 'श्वेत' असा अर्थ केला; त्यावर बुलढाण्याचे गुप्त यांनी 'कातले' ऐवजी 'कासले' असा भिन्न पाठ सुचवून, त्याचा 'बांधले' 'जुंपले' असा अर्थ केला, पण आपला मूळ अर्थच बरोबर असल्याचे नेने यांनी दाखवून दिलें आहे) ' दुर्भगा प्रमेय ' इत्यादि त्यांचे लेख उल्लेखनीय आहेत. श्री. नेने यांनी विदर्भ साहित्य संघाचे सरचिटणीस या नात्याने कार्य केलेलें आहे.

## श्री. शं. गो. चट्टे

१९३२ सालीं बी. ए. च्या परीक्षेला नेमलेल्या 'भाऊसाहेबाची बखर' व 'दुर्दैवी रंगू' या पुस्तकांचा अभ्यास करीत असतां डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या सांगण्यावरून, श्री. चट्टे यांनी, पानीपतप्रकरणीचा पत्रव्यवहार वाचून काढला. व त्यामुळे ऐतिहासिक कागदपत्रें गोळा करण्याची त्यांना स्फूर्ति झाली. त्या दृष्टीने प्रयत्न करीत असतां, काळु घराण्यांत 'आप्पासाहेबांचा अहवाल' या पांचगावच्या लढाईसंबंधीचीं दोन पत्रें त्यांना उपलब्ध झालीं. त्यापैकीं आप्पासाहेबांच्या अहवालावर म. सं. मं. च्या पाक्षिक सभेंत त्यांनी निबंध वाचला. या अहवालामुळे, तत्कालीन राजकीय घडामोडीवर नवीन प्रकाश पडतो. पांचगावच्या लढाईसंबंधीचीं पत्रें त्यांनी प्रथम वागेश्वरींत प्रसिद्ध केलीं व त्यावर अलिकडे Nagpur Uni. His. Bulletin मध्ये एक लेख लिहिला. मधल्या काळांत म. सं. मंडळांत जीं नाणीं होतीं, त्यांचें वाचन करून त्यावर एक टिपण तयार केलें व तें मंडळाच्या सभेंत वाचलें. कागदपत्रांचें संशोधन करीत असतांनाच त्यांना 'खर्ड्याच्या लढाईचा पोवाडा' व 'वाघोड्याचा जलसा' (पोवाडा) हे दोन पोवाडे मिळाले. ते टीप लिहून रा० यशवंतराव केळकर यांचेकडे पाठविले. त्यांनी ते ऐतिहासिक पोवाडे खंड ३ मध्ये प्रकाशित केलेले आहेत.

'नागपूरकर भोसल्यांची बखर' एम्. ए. च्या अभ्यासक्रमांत नेमली असतां रा. य. न. केळकर यांनी तिच्यांत पाठभेद व अर्थाच्या बऱ्याच चुका दाखविल्यामुळे, श्री. चट्टे यांनी बखरीचें मूळ हस्तलिखित मिळवून, त्या हस्तलिखिताच्या आधारें रा० केळकरांचे पाठ व अर्थ कसे चुकीचे आहेत

तें दाखविलें. त्यानंतर रा० बजाबा बाळाजी नेने यांच्या रोजनिशीच्या आधारें '८० वर्षांपूर्वीचें पुणें' हे दोन लेखांक सह्याद्रिमध्ये लिहिले. Nagpur Uni. His. Bulletin मध्ये ग्रामजोशी घराण्यांतील कागदपत्रांच्या आधारें 'Fresh light on the Deogarh Kingdom' हा लेख लिहिला. इतर कागदपत्रांच्या आधारें 'New light on Pedigree of Shivaji the Great' हा दुसरा लेख लिहिला आहे.

बी. ए. च्या अभ्यासक्रमांत मुक्तेश्वराचे सभापर्व नेमलेले असून, त्यांतील बऱ्याच ओव्यांचे अर्थ लागत नसल्यामुळे, प्रा. शं. दा. पेंडसे यांच्याबरोबर त्यांनी पाठभेदाची चर्चा केली. बऱ्याच प्रयत्नानंतर मुक्तेश्वराच्या सभापर्वाचें हस्तलिखित त्यांना मिळालें व त्यांनी मुक्तेश्वरी सभापर्वातील पाठशुद्धिविषयी वागीश्वरींत लेख लिहिला. कागदपत्रांच्या संग्रहाबरोबरच त्यांनी मराठी काव्येंहि संग्रहित केलीं. त्यांत 'मनन' हिंदी वळणांतील अक्षराची १८३ वर्षांपूर्वीची दासबोधाची प्रत, वामनी ग्रंथ, व इतर मराठी काव्यें मिळविलीं. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाने मुक्तेश्वरी आदिपर्वाची संशुद्ध प्रत काढण्याची योजना केली असता त्यांनी आदिपर्वाची प्रत पाठविली. तसेच अन्वरसहेली, फरिष्ता इत्यादि फारशी ग्रंथाचाहि संग्रह केला. परंतु त्यांचें त्यासंबंधीचें अजून वाचन झालें नाही. याखेरीज मेहकरच्या आगस्ति घराण्यांतील जुना पत्रव्यवहार, परगण्याच्या जमाखर्चाचे हिशेब, इत्यादि साधनें गोळा केलीं आहेत. परंतु त्या सर्वांचें प्रकाशन करण्याची त्यांना अजून योजना करतां आली नाही.

याशिवाय त्यांचे 'नागपुरांतील सरदार घराणीं' (वागीश्वरी विदर्भांक) 'गोंडाच्या इतिहासांतील एक अज्ञात पर्व' (मधुवन-गोंडवन विशेषांक) 'राणी बाकाबाईचा मृत्यु' (मधुवन) विठ्ठलकृत 'रुक्मिणी-स्वयंवर' (पाठभेद-अर्थचर्चा) इत्यादि लेख उल्लेखनीय आहे. तसेच श्री. चट्टे यांच्या कागदपत्रांत 'देवलघाटचे महाजनचे हक्क,' 'लोणार सरकारचे मेहकरचे हिशेब,' शंकराचार्य शृंगेरी यांचें आज्ञपत्र,' मलिकवरचें आज्ञापत्र, 'शेख नियाझखानचें न्यायपत्र' (शरफोर्जा भोसल्याचा आगोदरचा हक्क आहे हें दर्शविणारें) 'खंडेराव लक्ष्मण यांचें आज्ञापत्र,' इत्यादि साधनसामग्री आहे. त्यांनी 'भांडी

व शस्त्रें' यासंबंधीचा संशोधनविषयक लेखहि लिहिलेला असून, नागपूर रेडिओवरून तो ध्वनिक्षेपित झालेला होता.

श्री. चट्टे हे शास्त्री व काव्यतीर्थ असल्यामुळे इतिहासाबरोबरच मराठी प्राचीन काव्य, नाट्यकला, इत्यादि विषयांत त्यांनी थोडे फार संशोधन केलेलें आहे. 'मराठी पद्यवाङ्मयाची घटना' (वागीश्वरी) 'महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास' (डॉ. पेंडसे) यांचें परीक्षण, व गतवर्षी युगवाणींत 'नागपूर येथील नाट्यसंस्था' व 'अमरावती येथील नाट्यसंस्था' हे त्यांनी संशोधनपर लिहिलेले लेख या बाबतींत लक्षांत घेण्यासारखे आहेत.

कांहीकाळ त्यांनी महानुभाव वाङ्मयाचाहि अभ्यासांत घालविला. 'महानुभाव पंथ वैदिक की अवैदिक' असा वाद उत्पन्न झाला असता, एका दिवाणी खटल्यांत, त्यांनी महानुभाव पंथ अवैदिक आहे, अशी साक्ष दिली होती. त्यामुळे त्यांचे सर्व महानुभाव स्नेही व इतरहि कांही पंथाभिमानी यांचा त्यांचेवर रोष झाला होता! सध्या त्यांनी बुद्धवाङ्मय व बुद्धतत्त्वज्ञान या विषयांत लक्ष घातलें आहे.

### डॉ. मा. गो. देशमुख

'मराठीचें साहित्यशास्त्र' या ग्रंथांत ज्ञानेश्वरापासून रामदासापर्यंतचा (१३ ते १७ शतक) मराठी कवींचा काव्यविषयक दृष्टिकोन काय होता, याचें डॉ. देशमुख यांनी विवेचन केलेलें आहे. वरील ग्रंथ तीनशे पृष्ठांचा असून तो १९४० सालीं प्रकाशित झाला. हा नागपूर विद्यापीठाला पी एच्. डी. च्या पदवीकरता सादर करण्यांत आला होता, व त्यांना या ग्रंथावर ती पदवी मिळाली.

डॉ. देशमुख यांनी या ग्रंथाशिवाय मराठी वाङ्मयीन टीका, (Marathi literary criticism) आधुनिक मराठी काव्य, वऱ्हाडचा प्राचीन इतिहास, वाङ्मयीन व ऐतिहासिक अवलोकन (Survey), १७ व्या शतकांतील मराठी काव्य, इत्यादि अनेक विषयावर संशोधनपर निबंध लिहिलेले आहेत. मराठीच्या साहित्यशास्त्रासंबंधी कांही ठिकाणी मौलिक विचार प्रकट करून डॉ. देशमुख यांनी त्यावर कांही अंशी नवा प्रकाश पाडलेला आहे.

मराठी वाङ्मयीन टीकेमधील कांही शास्त्रीय संज्ञांची चर्चा,[1] या विषयावर लिहिलेल्या लेखांत, न. चिं. केळकर यांनी जळगाव येथील अध्यक्षीय भाषणांत, डॉ. देशमुख यांचें 'मराठीचें साहित्यशास्त्र' या ग्रंथासंबंधी उपस्थित केलेल्या कांही मुद्यांना त्यांनी प्रत्युत्तर दिलेलें आहे.

"The Concept of Rekha in Jnyaneshshwari" (N. U. J. Dec. 1941) या लेखांत ज्ञानेश्वरीमधील ज्ञानेश्वरांनी उपयोग केलेल्या रेखा या शब्दाच्या गर्भितार्थासंबंधी (Connotation) चर्चा केलेली आहे.

'गडकरी व केशवसुत' (अभिरुची बडोदा फेब्रु. १९४४) या लेखांत गडकरी व केशवसुत यांच्या काव्यशक्तीबद्दल तुलनात्मक चर्चा आहे.

विदर्भाच्या इतिहासांतील अज्ञात पान, या आशयाच्या लेखांत[2] डोंगरगावच्या कोरीव लेखावर (शके १०३४) कांही प्रकाश पाडलेला आहे. हा कोरीव लेख पहिल्याने डॉ. देशमुख यांना उमगलेला होता व त्यानंतर त्यांचें संपादन म. म. मिराशी यांनी एपिग्राफिका इंडिका २६ मध्ये केलेलें आहे.

'New light on the poetics of Marathi' (Paper read at the Oriental Conference Nagpur and published in Yugwani, Amraoti April 1947) यांत एका अज्ञात महानुभावीय कवीच्या काव्यांत दिसून येणाऱ्या, मराठी काव्यशास्त्रासंबंधीच्या कांही संज्ञाविषयीं उलगडा केलेला आहे.

पुसद येथील विदर्भ-साहित्य-संमेलनाच्या स्वागत समितीचे अध्यक्ष या नात्यानें, त्यांनी केलेल्या भाषणांत पुसद तालुक्यासंबंधीचें वाङ्मयीन, सामाजिक, राजकीय व ऐतिहासिक अवलोकन डॉ. देशमुख यांनी केलें होतें. ते पुढे पुस्तिकेच्या रूपानें १९४६ मध्ये प्रसिद्ध झालें.

सीतास्वयंवराच्या निरनिराळ्या संहितांवर आधारलेली, व पडताळलेली नागेश कवीच्या सीतास्वयंवराची गुणादोषविवेचनात्मक आवृत्ति डॉ. देशमुख

1 " A discussion of some technical terms, in Marathi literary criticism (Chitramayajagat Poona April 1942.)

२ वऱ्हाडशाळापत्रक–मे–१९४४

यांनी स्पष्टिकरणात्मक टीपा व नागेश कवीच्या काव्याचें मूल्यमापन करणाऱ्या प्रस्तावनेसहित संपादित केलेली आहे. ती सुविचार प्रकाशन नागपूरतर्फे प्रकाशित झालेली आहे.

मराठी संतकवींच्या काव्यांतील सौंदर्यस्थळें या विषयावर आकोल्याच्या प्रगति मासिकांत (जानेवारी १९४८) त्यांचा एक लेख प्रकाशित झालेला आहे.

मराठी निबंध (विष्णुशास्त्री ते विनोबापर्यंत) हा नवभारत पुणे सप्टेंबर १९४८, यांत प्रसिद्ध झालेला त्यांचा लेख आहे. त्यांत संस्कृत, मराठी वाङ्मयांतील, निबंधाच्या व इंग्रजी वाङमयांतील, निबंधाच्या (Essay) कल्पनांचा तुलनात्मक उहापोह केलेला आहे.

'एकादशी' या ठाकूर आणि कंपनी लिमिटेड अमरावती इने १९४८ सालीं प्रकाशित केलेल्या निबंधाच्या संग्रहाला त्यांनी प्रस्तावना लिहिलेली आहे.

याशिवाय डॉ. देशमुख यांनी 'वाग्वैजयंतीचें पुनर्मूल्यन' (युगवाणी फेब्रुवारी १९५२) 'वत्सगुल्म महात्म्य' (अभिप्राय) 'बी आणि पिंगा' (युगवाणी आगष्ट १९५१) 'वाङ्मयसमीक्षा आणि साहित्यशास्त्र' (युगवाणी नोव्हेंबर १९५०) 'रसव्यवस्था' (युगवाणी एप्रिल १९५०) इत्यादि अनेक लेख लिहिले आहेत चांदा येथील विदर्भ साहित्य संघाचें अध्यक्षपदहि त्यांनी भूषविलेलें होते.

### श्री. दे. गो. लांडगे

श्री. दे. गो. लांडगे यांनी संशोधनविषयक चांगलें कार्य चालविलेलें आहे. त्यांच्या नागपूर शहराच्या प्रकाशित व्हावयाच्या ग्रंथासंबंधी मागे उल्लेख आलेलाच आहे. त्यांनी आतापर्यंत ऐतिहासिक विषयांशिवायाहि प्रचलित विषयावर इंग्रजी, संस्कृत मराठींत लेख लिहिलेले आहेत. त्यांत 'नागपूरकर भोसल्यांच्या इतिहासाचें सिंहावलोकन' (तरुण भारत) 'नागपूरांतील पुरातन वाडे, बागबगीचे, पुतळे' (महाराष्ट्र) 'नागपूरांतील शास्त्री, पंडित, ज्योतिषी यांची परंपरा' (म. सं. मं. ग्रंथ) 'आजच

नागपूर आकारास कोणी आणलें ?' (तरुण भारत दिवाळी अंक) 'कोल्हटकर घराणें' 'सिताबर्डी' 'कै. मातुश्री बाकाबाई भोसले' (महाराष्ट्र-दिवाळी अंक) 'काळू घराणीं' (हिस्ट्री कॉंग्रेसकडून प्रकाशित) 'नागपूरांतील मंदिरें' 'कै. श्रीमंत यादवराव जामदार' (हितवाद) 'इ. स. १८६४ पूर्वीचें नागपूर शहर' (नगरपालिका वृत्त) 'राजेबहादुर जानोजीराव भोसले' 'परसोजी भोसल्यांचा पोवाडा' इत्यादि नागपूरसंबंधी मराठी व 'Battle of Sitabuldi (Independent Special Number) 'A peep into the topography of Nagpur.' (N. U. H. Bulletin) 'An enthusiast's note on old Nagpur.' (Hitawada Speciol No.) नागपूरसंबंधीचे इंग्रजी निबंध लिहिलेले आहेत.

त्याशिवाय श्री. लांडगे यांनी 'वैभवाच्या चितेवर,' (नागरिक साप्ताहिक ६ लेख) 'बाग प्रांतांतील माध्यंदिन शाखेचा इतिहास' 'भद्रावती' (राष्ट्रशक्ति) 'पटवर्धन घराणें' (तरुणभारत) पंचभाई कुटुंबाचा इतिहास (मधुवन) 'विठ्ठल बल्लाळ सुभेदार व गणपतराव' (महाराष्ट्र) 'तुळजापूर क्षेत्र' (राष्ट्रशक्ति) या इतर अनेक विषयावर मराठी, व 'Christian missionaries at work' (Nagpur Times) 'Development of Nagpur through Nagpur Municipality या विषयावर इंग्रजी निबंध लिहलेले आहेत.

श्री. लांडगे हे मधून मधून संशोधनाचें प्रचारकार्य करीत असतात. त्यांचें एक महत्वाचे कार्य म्हणजे त्यांनी गंगाधरशास्त्री मंग्रूळकर या विद्वानास प्रकाशांत आणलें आहे. याचें जीवन व चरित्र, हा लेख त्या मं. सं. मंडळाच्या वार्षिकोत्सवांत वाचला होता.

नागपूर विद्यापीठांतील संशोधक[1]

या शिवाय विदर्भांतील कांही संशोधकहि विदर्भाच्या संशोधन तरूला चैत्र पालवी आणीत आहेत !

[1] यांत क्वचित इतरहि संशोधक आहेत.

प्रो० चतुर्वेदी यांचें संस्कृत भाषा, व्याकरण, छंद, क्वचित वेद-विषयक, वा कालिदासविषयक संशोधन उच्च दर्जाचें आहे. तें विपुलच नव्हे, तर कित्येक ठिकाणीं मौलिकहि आहे. त्यांनी आतापर्यंत वरील विषयावर तीस एक तरी लेख लिहिलेले आहेत. त्यापैकीं कांही A further note on the 'Varieties of the Anusthubha metre' 'Panini's Vocabulary' (यांत पाणिनीचा कालनिर्णय ख्रिस्तपूर्व ५०० वर्षें वरून ८०० वर्षें मागे नेलेला आहे.) 'Note on the Vartik and its misplaced occurrence in Mahabhashya' ( A volume of studies in Indology ) 'Society in Panini's time' 'Significance of Panini's Sutra' (डॉ. बी. घोष यांचा या विषयावरील दृष्टीकोन खोडलेला आहे.) 'Development of Sanskrit Grammar in the last 2000 years', 'On the authorship of Vedas', 'The Dasharajna battle of the Rigveda' हे होत.

डॉ. सिन्हा यांनी 'Fort William India House Correspondence' विभाग दोन, यांचें संपादन केलेलें आहे. साधारणतः छापील ८०० पृष्ठांचा ग्रंथ. त्याचप्रमाणे त्यांचे 'Development of Indo-Islamic Policy' (एक प्रदीर्घ लेख) इ. लेख महत्वाचे आहेत.

विनयमोहन शर्मा यांचे 'Sahitya Kala' (ग्रंथ) 'Writers and Poets of C. P.', 'The Question of Scripts and Language' (यांत पर्शियन, नागरी, रोमन लिपीमध्ये नागरी ही सर्वांत शास्त्रीय आहे असें दाखविलें आहे.) 'Namadeo the Marathi saint, his influence on the Nirgun School of Hindi poetry" यांत नामदेव चरित्र व तत्वज्ञानासंबंधी उहापोह करून, नामदेवांच्या तत्वज्ञानाचा कबीराच्या तत्वज्ञानावर कसा परिणाम झाला व 'निर्गुणधारा' ही हिंदी संत काव्यांत कबीराने सुरू केली नाही तर, नामदेवाने सुरू केली असें दर्शविलें आहे. यांचे हिंदी साहित्यशास्त्रावर बरेच उत्कृष्ट लेख आहेत.

डॉ. करंबेलकर (वेदांततीर्थ साहित्याचार्य) यांनी 'संस्कृति-प्रदीप' हा चांगल्यापैकी ग्रंथ लिहिला आहे! तसेच त्यांनी अनेक संशोधनात्मक व

महत्वाचे लेख लिहिलेले आहेत. त्यापैकी कांही 'Inscriptional foothold of Indian History', 'योगसूत्रांत ईश्वराचें स्थान', 'ज्ञ आणि पुरुष' 'गढा-मंगलाच्या गोंडराजाची साहित्यभक्ति' इ. होत.

प्रयागदत्त शुक्ल यांनी 'नागपूर के भोसले' हें पुस्तक नागपूरकर भोसल्यावर उपलब्ध ऐतिहासिक कागदपत्राच्या आधारें लिहिलें.

जी. एल्. गुप्ता (जॉइंट ऑनररी सेक्रेटरी, महाकोसल हिस्टॉरिकल सोसायटी) यांनी 'लवंङ्गलता' 'ग्रीसचा इतिहास', 'फ्रान्सची राज्यक्रांति' इ. मराठी ग्रंथांचे हिंदीमध्ये भाषातर केलेलें आहे.

## इतर संशोधक

नरहरशास्त्री खरशीकर यांनी 'विष्णुदास चरितामृत' (प्रथम खंड) प्रकाशित केलेला आहे. या ग्रंथास सोनोपंत दांडेकर यांची प्रस्तावना आहे. या ग्रंथामुळे मराठांतील संतचरित्रांत चांगली भर पडली आहे. त्यांनी यापूर्वी 'कर्णहंस' हाहि ग्रंथ प्रकाशित केला. लिंगायत पंथांतील एक संत शांतलिंग महाराज यांनी लिहिलेला हा ग्रंथ आहे. या ग्रंथाचा विषय तत्वज्ञानाचा आहे. यांत तुलनात्मक चर्चा जरा कमी असली तरी लिंगायत पंथीयाने मराठींत लिहिलेला हा पहिला प्राचीन ग्रंथ म्हणून महत्वाचा आहे. विष्णुदासाची कविता भाग १ ला हाहि यांनी संपादिलेला आहे.

प्रा. पां. कृ. सावळापूरकर मध्यप्रांत मंडळाचे सभासद व कार्यकर्ते यांनी 'चुकलेला इतिहास', 'हिंदुस्थानची सोपपत्तिक राज्यपद्धति' इ. पुस्तकें व विष्णुदास चरितामृत ग्रंथसमीक्षा, गोंडवनाची रूपसंपदा इ. लेख लिहिलेले आहेत. प्रा. भ. श्री. पंडित यांनी 'आधुनिक मराठी कविता' हा ग्रंथ लिहिलेला आहे. त्यांनी संत वाङमयाबद्दल कांही लेख लिहिलेले आहेत. हिंदी वाङमयाचाहि त्यांचा अभ्यास असून, त्याबद्दलचे त्यांचे कांही लेख आहेत. हे कविताहि करतात. वर्धाचे यादवरात्र अणे व काटोलचे भय्यासाहेब खळतकर यांनी मोडी लीपीला आपल्या प्रांतांत मान्यता देण्यांत यावी याबद्दल कळकळीचे प्रयत्न चालविलेले आहेत. श्री. आनंदराव जोशी यांनी मराठींत व हिंदींत पुष्कळ लेखन केलेलें आहे. 'नागपूरांतील कांही अस्तंगत मासिकें', 'लोकरंजन' इत्यादि त्यांचे लेख प्रसिद्ध आहेत.

यवतमाळचे श्री. रंगराव केशव साकळे याचा संतवाङ्मयाचा बराच अभ्यास आहे. प्रांतस्थ, सत्पुरुष, कवी, ग्रंथकार या संबंधी त्यांनी पुष्कळ टिपणें घेतलीं आहेत व त्यांच्या त्या प्रयत्नांतून बरीच माहिती प्रथमच उजेडांत आलेली आहे. 'वामन एक की दोन' अशासारख्या विषयावर त्यांनी मासिकांत व वर्तमानपत्रांत अभ्यासपूर्ण लेख प्रकाशित केलेले आहेत. सध्या त्यांचें वय ८३ वर्षांचें असून देखील त्यांचें वाचन वगैरे चालूच आहे.

द. बा. महाजन यांचे 'Battle of Sakharkheda' (Indian H. C. Jaypur.) 'विदर्भांतील आदिवासी कोरकू', 'जिजाऊचें माहेर', 'वऱ्हाडांतील गोंडाची राजसत्ता' इत्यादि लेख प्रकाशित झालेले आहेत. त्यांनी विष्णुदासाची कविता भाग २ रा याचे संपादनांत भाग घेतला आहे.

श्री. ना. ना. हूड यानी 'गोविंदाग्रजांची काव्यसृष्टि' ( मधुवन ) 'डॉ. केतकर' ( मधुवन ) आस्तिक (परीक्षण) इत्यादि दीर्घ लेख व 'गोंडवनाचीं आकर्षणें' ( मधुवन ) व 'टिळक, बालकवी व विनायक' ( मधुवन ) 'अनामिका' ( सुषमा ) 'आराधना' ( सुषमा ) इ० लेख लिहिलेले आहेत. शेवटील दोन काव्यपरीक्षणें असून नवकाव्याच्या पार्श्वभूमीवर लिहिलेलीं आहेत. वरील लेखांत ('गोंडवनाचीं आकर्षणें' हा लेख सोडून) संशोधनात्मक भाग नसून समालोचनात्मक मात्र बराच आहे.

बा. सां. भटागरे यांनी शिरपूर येथील बागबाच्या टेकडीसंबंधी कांही लोकगीतें व लोककथा संग्रहीत केल्या. 'घुघुसची लढाई' (नवें जग) यांत चंद्रपूरचा गोंडवंशीय राजा रामशहा उर्फ भूपतिराव यांच्यासंबंधी माहिती आहे.

### मराठवाड्यांतील संशोधक

मराठवाड्यांतील संशोधकांनीहि संशोधनकार्यांत कांही अंशी वाटा उचललेला आहे.

र. म. भुमारी (मराठी विभागाचे प्रमुख; उस्मानिया विद्यापीठ) यांनी १९५१ सालीं 'साहित्य आणि संशोधन' हा ग्रंथ प्रकाशित केलेला आहे. त्यांनी व र. मु. जोशी, एम. ए. यांनी सरकारी संशोधनखात्यांत बरेचसें कार्य केलें आहे. दत्तोपंत कुळकर्णी यांचें 'तुळजाभवानी' आणि

काटे वकील, शेलू यांचें 'संपूर्ण भूषण' हीं दोन्ही पुस्तकें स्थानिक संशोधना-संबंधींचीं आहेत. नारायणराव नांदापूरकर यांनीहि संशोधनविषयक कार्य केलेलें आहे. खाजगी व वैयक्तिक प्रयत्नाच्या दृष्टीने नांदेडचे रा. वि. अ. कानोले यांनी नांदेड शहर व त्याच्या पंचक्रोशीमधून जुन्या ग्रंथांचा संग्रह केलेला आहे. वामन पंडितासंबंधी त्यांनी नावीन्यपूर्ण माहिती संशोधिली आहे. श्री. पोहनेकर (साहित्यविशारद) यांनी परळी वैद्यनाथ या भागांत बरेचसे ऐतिहासिक कागदपत्र मिळविले. त्यांत छत्रपती शिवाजी महाराजांचें, शाहूमहाराजांचें व पेशवेकालीन अशीं तीन अभयपत्रें आहेत व त्यानंतर तेथील संशोधनकार्य प्रगत करण्याकरता तेथील संशोधकांनी एक संशोधन शाखाहि अस्तित्वांत आणलेली आहे. श्री. पोहनेकर यांनी युगवाणींतील एका लेखांत मराठवाड्यांतील संशोधनाचा आढावा घेणारा एक लेख लिहिलेला आहे. बीडवरून सुप्रसिद्ध पंडित घराण्यांतील बहुमोल संस्कृत साहित्य, परतूड येथील जुना संग्रह याचें संकलन मंडळाकडून करणें सुरू आहे. उस्मानिया विद्यापीठाचे मराठीचे प्रा. कै. चिंतामण निळकंठ जोशी यांचा 'श्रीधरचरित्र व काव्यविवेचन' हा आठशे पानांचा, विपुल माहितीने भरगच्च भरलेला ग्रंथ त्यांच्या चिरंजीवांनी पूर्ण करून प्रकाशित केला. म. म. द. वा. पोतदार यांनी या ग्रंथाला पुरस्कार लिहिलेला आहे व 'बहुमोल' ग्रंथ म्हणून ग. त्र्यं. माडखोलकर यांच्यासारख्या श्रेष्ठ साहित्यसमीक्षकाने त्याची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे !

### पश्चिम विभागांतील संशोधन

### राजवाडे संशोधन मंडळ

धुळ्याचे शं. श्री. देव यांच्या महनीय कार्याविषयी सर्वांस माहिती आहे. विशेषतः रामदासांच्या वाङ्मयाच्या संबंधीचें त्यांचें कार्य बरेच व्यापक झालेलें आहे.

राजवाडे संशोधन मंडळाच्या संशोधकांनी, चित्रकाच्या सदापर्णी हरित-गार तरूप्रमाणे संशोधन कार्य नेहमीच टवटवीत ठेवलें आहे.

श्री. भा. वा. भट, वकील, धुळे, हे राजवाडे मंडळाचे गेलीं २६ वर्षे चिटणीस असून, त्यांनी मंडळाच्या सर्व कार्यावर देखरेख व आर्थिक व्यवहाराची

बाजू सांभाळलेली आहे. श्री. देव व चांदोरकर यांच्या सहकार्याने त्यांनी सत्कार्योत्तेजक सभा वगैरे संशोधनात्मक चळवळींत प्रारंभापासून भाग घेतला. राजवाडे यांच्या संशोधनकार्याला त्यांनी सुरवातीपासून आतापर्यंत हरएक प्रकारे साह्य करून—राजवाडे संशोधन मंदिर उभारण्यांत, राजवाडे कोष व इतर अप्रकाशित वाङ्मय प्रकाशित करण्यांत वगैरे—तें मंडळ समुन्नत करण्यांत आपलें आयुष्य वाहिलेलें आहे. त्यांनी खालील ग्रंथ लिहिले आहेत (१) महाराष्ट्र धर्म (२) ऐतिहासिक पुरुषांच्या मुद्रांचें प्रदर्शन (३) मराठेशाहींतील व्यवहारनिर्णय पद्धति (४) समर्थ-शिवाजी अन्योन्य संबंध (५) समर्थ व समर्थ संप्रदाय यांचें अभिनव दर्शन (६) शिवाजीची राजनीति (७) राजवाडे चरित्र वगैरे. राजवाडे चरित्र ग्रंथांत जरासा विस्कळितपणा भासत असला, तरी हा ६२४ पृष्ठांचा ग्रंथ राजवाड्यांसंबंधी—व्यक्ति व कार्य—च्या विपुल माहितीने भरलेला आहे.

मो. रा. जोशी हे राजवाडे संशोधन मंडळाचे आधारस्तंभ सभासद असून त्यांनी विविध विषयावर अनेक लेख लिहिले आहेत. त्यांनी मराठ्याच्या इतिहासावर आपलें लक्ष विशेष केंद्रित केलें. व छोटीं चरित्रें लिहिलीं. 'नारोशंकर राजेबहादूर' यांच्या चरित्राची साधनसामग्री एकत्रित केली. इंदूरच्या किबे घराण्याचे संस्थापक व प्रसिद्ध मुत्सद्दी तात्या जोग यांच्या चरित्राचीं साधनें हा यांचा ग्रंथ मंडळाने नुकताच प्रकाशित केला. शिवाय 'अहिल्याबाई होळकर' 'तिकिटाची कुळकथा,' 'स्वामिनिष्ठ खंडोबल्लाळ' 'ऐतिहासिक आख्यायिका' इत्यादि त्यांचे इतर ग्रंथ प्रसिद्ध आहेत. हे मंडळाच्या ग्रंथालय शाखेची व्यवस्था पाहतात.

गो. रा. गोगटे ( वकील भुसावळ ) मंडळाचे तहाहयात सभासद; यांनी अनेक ग्रंथांचें संपादन केलें असून टिपणें व निबंध लिहिलेले आहेत. विवेक सिंधूची चिकित्सक आवृत्ति यांनी तयार केली असून, ती मंडळाने नुकतीच प्रकाशित केली आहे. गरीब नाथकृत 'पंचीकृत विवेक' इत्यादि यांनी संपादित केलेले ग्रंथ आहेत.

वि. ह. निजसुरे; जगन्नाथ शंकर शेट स्कॉलर; संस्कृत, मराठी भाषा, व्युत्पत्ति, व्याकरण व वेदांत यांचे व्यासंगी. मंडळाचे तहाहयात सभासद.

'विलास मंजिरी' हा बुद्धिबळावरील संस्कृत ग्रंथ संपादिला आहे. त्यांनी अनेक निबंध व चर्चात्मक लेख लिहिले आहेत.

भा. रं. कुळकर्णीः—मंडळाचे क्यूरेटर. यांनी (१) आजच्या हिंदू जीवनातील धृववस्तीचे अवशेष (२) लग्न सिस्टिम ऑफ धि वेदांग ज्योतिष ( इंग्रजींत ) (३) अहिराणी भाषा व संस्कृति (४) विक्रम संवताच्या द्विविध आरंभाची वैदिक पार्श्वभूमी इत्यादि ग्रंथ लिहिलेले आहेत. 'ऋग्वेदांतील ज्योतिषमूलक कालनिर्णायक गमकें' या ग्रंथास पुण्याच्या कै० दत्तोपंत आपटे स्मारकमंडळाने १२५ रु. पारितोषक दिलें आहे. लोकमान्य टिळकांच्या ग्रंथानंतरचा हा ठळक प्रयत्न म्हणून फार महत्वाचा आहे. याशिवाय अनेक संशोधनात्मक लेख मराठी, हिंदी, इंग्रजींतून प्रकाशित केलेले आहेत. ते मंडळाच्या प्रकाशन, प्रचार व संशोधन या भागाचें कार्य करीत असतात.

येथवर विदर्भ संशोधनाचें विवेचन केलें. त्यावरून विदर्भ वाङमयाच्या 'अप्रदा' अरण्यानीला ( अरण्य देवता ) अनेक संशोधक-क्षेत्रपांनी कांही अंशीं धनधान्य युक्त केलेलें आहे असें दिसून येईल. 'सुर्नातिसह इंद्र,[1] स्वस्तिसह वरुण[2] व ऊर्जयन्तिसह अग्नी[3] या देवदेवता विदर्भसंशोधनक्षेत्रश्रीवर आपापले वरदहस्त धरोत, व यापेक्षाहि ती अनंत पटीने धनधान्य युक्त होवो अशी, शुभेच्छा येथे व्यक्त करून, लेखणीस विश्राम देतों.

**स मा प्त**

---

१ इंद्र तासाला आधार देतो ऋ. ५७-६-७. २ वरुण आकाशांतून पाऊस पाडतो. ऋ. ६-४८-१४. ३ अग्नी सर्व वनस्पतींत प्रविष्ट होतो. ऋ. ८-४३-९

# शुद्धिपत्र

[ महत्वाच्या स्थळाचें शुद्धिपत्र दिलें आहे. इतर कांही थोडीं अशुद्धें वाचकांच्या सहज लक्षांत येतील. ]

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २३ | १७ | लागलेला | लाभलेला |
| २४ | ३ | रेकॉड्र्स कमिशन | रेकॉर्ड्स कमिशन |
| ३६ | १८ | जणास | जनास |
| ४७ | शेवटची | ज्याते | ज्योत |
| ६१ | १९ | एपिग्राफिआ | एपिग्राफिका |
| ७२ | १४ | 'फ्लॅनेल' | फ्रॅनेल |
| ७८ | १४ | Econography | Iconography |
| ८२ | ६ | पाश्वविद्यापरिषद् | प्राच्यविद्यापरिषद् |
| ९२ | १५ | Thair | Their |
| १०२ | शेवटच्या दोन ओळी | राष्ट्रकूट | चालुक्य |
| १०३ | पहिल्या दोन ओळी | ग्रीक | पर्शियन |
| १०५ | | या पृष्ठावरील टीप पॅरिग्राफ दोनची आहे. पॅरिग्राफला सुरवातीला व शेवटी अवतरण चिन्हें पाहिजेत. | |
| ११२ | ५ | संशाधन-सजीवनी | संशोधन-संजीवनी |
| ११५ | १८ | झिगेरबाली | झिग्राबान |
| १३० | १० | स्वतःतीच | स्वतःचीच |
| १३१ | २२ | अमनुष | अमानुष |
| १३६ | १६ | फर | फार |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १४३ | १६ | तसि | तीस |
| १४३ | १७ | आर्धिक | आर्थिक |
| १४३ | ३ | For | Far |
| १६९ | ११ | वर्षात | वर्षांव |
| १७५ | ६ | कोत | कोन |
| १७६ | २१ | अनार्थ | अनार्य |
| १८९ | १३ | शं. बा. शास्त्री | शं. बा. दीक्षित |
| १९९ | २६ | धारसेन | धरसेन |
| २०० | ४ | पांड्येय | पांडेय |
| २०१ | ३ | विदर्भ संशोधकांत | छत्तीसगडांतील संशोधकांत |
| २०१ | १४ | प्रांतात | प्रांतांतून |
| २२४ | २२ | बहुतेक | कांहीं |
| २३० | टीप | दीड हजार | एक हजार |
| २३८ | १ | नाहा | नाही. |
| २४८ | १९ | गृाहत | गृहीत |
| २५२ | १२ | संशोनात्मक | संशोधनात्मक |
| ,, | २५ | कैतुक | कौतुक |
| २५८ | १४ | कांही वर्षे ते (श्री. ना. बनहट्टी) विहंगमाचे संपादकहि होते, या ओळीपुढे विहंगम मासिकाचे आद्य संपादक प्रा. या. मु. पाठक हे होत. त्यांनीच हें मासिक अस्तित्वांत आणलें. त्यांच्या 'शशिमोहन' या उत्कृष्ट दीर्घकाव्याचा काव्यग्रंथ प्रकाशित आहे. हा मजकूर पाहिजे. | |
| २७४ | १८ | 'भारताचा राज्यकारभार' यापुढे काव्यप्रकाश (अनुवादित) इ. ग्रंथ हा मजकूर पाहिजे. | |

# वर्णमालात्मक सूची

(येथे फक्त महत्त्वाच्या व्यक्तींचा उल्लेख केला आहे.)

---

क्ष

# विषय वर्गिकरणात्मक सूची

[ येथे फक्त महत्वाच्या विषयांचा उल्लेख केला आहे ]

---

टीपः—

(१) **धर्मविवादस्वरूप** या ग्रंथाबद्दल ५००रु.चें बक्षिस डॉ. के. ल. उर्फ भाऊजी दप्तरी यांना महाराष्ट्र साहित्य परिषदेनें दिलेलें नसून, तें सांगली येथील दक्षिण महाराष्ट्र सभेनें दिलेलें आहे. (पृष्ठ २४१ टीप)

(२) पृष्ठ १६ वरील, 'संशोधनाचा म्हणण्यासारखा प्रयत्न ...... ..............असें त्यांच्या मनानें घेतलें', हा मजकूर तेथे नको आहे.

(३) **चक्रधराचें चरित्र** हा डॉ. वि. भि. कोलते यांचा आणखी एक ग्रंथ नुकताच प्रकाशित झालेला आहे.

(४) श्री. वि. अ घाटे, तळेगांव दशसहस्र, यांनी तळेगांवच्या मूर्ति-संबंधी माहिती मिळवून, त्यांचा स्वहस्तें काढलेला चित्रसंग्रह तयार केला आहे.

---

डॉ. भाऊजी दप्तरी, डॉ. शं. दा. पेंडसे, डॉ. य. खु. देशपांडे, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर व श्री. शं. गो. चट्टे यांनी या ग्रंथावर आपले अभिप्राय दिले, याबद्दल लेखक त्यांचा फार आभारी आहे.

---

# प रा ग

(म रा ठी - इं ग्र जी का व्य ग्रं थ)

कवि - श्री. नारायण नागोराव हूड

नागपूर युनिव्हर्सिटीने एम्. ए. व बी. ए. (ऑनर्स) या परीक्षांना 'टेक्स्ट' म्हणून नेमलेला काव्यग्रंथ.

किंमत तीन रुपये



आनंद प्रकाशन, यवतमाळ

- आ गा मी प्र का श न -

# नि रा भा स

(का व्य ग्रं थ)

कवि - श्री. नारायण नागोराव हूड

खालील तीन प्रदीर्घ काव्यें; भावगीतें व खंडकाव्यांनी युक्त

| | | |
|---|---|---|
| ख ळ य ज्ञ (रूपकात्मक) | नाट्यकाव्य | (प्रगत श्रेणींतील मुक्तछंद; विषय- लोकशाही समाज-सत्तावाद; ओळी एक हजार) |
| शो भ ना | नाट्यकाव्य | (विषय- दिव्यप्रीति; ओळी एक हजार) |
| तत्वज्ञानात्मक | काव्य | (नवीन दृष्टिकोनांतून लिहिलेलें; ओळी एक हजार) |

प्रदीप मुद्रणालय, धनतोली, नागपूर